


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

'नवी क्षितिजे' हे मराठीतील एक महत्त्वाचे नियतकालिक (त्रैमासिक) असून ते सद्यस्थितीत कार्यरत नाही. संस्थेच्या उपरोक्त प्रकल्पातंर्गत 'नवी क्षितिजे' ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करता येणे शक्य असल्याने सदर नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून संस्थेच्या संकेतस्थळावर उपलब्ध करून देण्यासाठी राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सदर नियतकालिकाचे संपादक व मालक स्मृतिशेष श्री. नाना जोशी ह्यांच्या कन्या श्रीमती शर्मिला जोशी ह्यांना विनंती करण्यात आली होती.

सदर विनंतीस श्रीमती शर्मिला जोशी ह्यांनी मान्यता दिल्यामुळे आणि सदर नियतकालिकाचे अंक उपलब्ध करून दिल्यामुळे 'नवी क्षितिजे' ह्या नियतकालिकाच्या (त्रैमासिक) अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देणे शक्य होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे/ नियतकालिकांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था, मुंबई आणि नवी क्षितिजे संपादक-मंडळ यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे, कलावंतांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्व राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे नसतील.

अनुक्रमणिका




# नवी क्षितिजे

अंक अठ्ठेचाळीसावा १९९६

**संपादक**

श्री. नाना जोशी

**रचना**

हेमचंद्र कराडकर

**अक्षरजुळणी**

अभिजित पंडित

**मुद्रण व्यवस्था**

विजय एंटरप्रायझेस,
'भाग्यरेखा', जुना बेलापूर रस्ता,
कळवा, ठाणे.

**मालक, मुद्रक, प्रकाशक**
**आणि पत्रव्यवहार**

श्री. नाना जोशी
४ - अ, सोमणनगर,
क्रांतीवीर भाई बालमुकुंद मार्ग,
मुंबई - ४०० ०१२

## अनुक्रमणिका

**साहित्य आणि समाजशास्त्र**

राजकीय कादंबरी - दोन दृष्टिकोन
डॉ. प्रतिभा कणेकर

**राज्यशास्त्र व राजकारण**

उदारमतवादाचा शेवट
इमॅन्यूएल वॉलरस्टीन

**संगीत**

संगीताचे अर्थमाहात्म्य
श्री. ह. देशपांडे

**विज्ञान**

गणित विज्ञानाची भाषा
चित्रा नित्सुरे

**समाजशास्त्र व इतिहास**

भारतीय भोजनातील फळे
सुमती जोशी

**जीवशास्त्र**

स्त्रीला हवे असते काय?
प्रतिभा टिल्लू

**समाजशास्त्र व इतिहास**

कहाणी साखरेची
सुमती जोशी





## संपादकीय

या अंकात डॉ. प्रतिभा कणेकर यांनी राजकीय कादंबरीसंबंधी विवेचन केले आहे. राजकीय कादंबरी ही सर्वसाधारण कादंबरीपासून वेगळी काढता येईल का? राजकीय कादंबरीची खास लक्षणे कोणती या प्रश्नांची चर्चा या लेखात वाचावयास मिळेल. डॉ. इमॅन्यूएल वॉलरस्टीन, यांनी उदारमतवादाचा शेवट का व कसा झाला हे सांगितले आहे. त्याचबरोबर डाव्या चळवळीपुढची आव्हाने कोणती आहेत, याचाही निर्देष केला आहे. सौ. सुमती जोशी यांनी साखरेचा सामाजिक इतिहास आपणापुढे मांडला आहे. सौ. चित्रा नित्सुरे यांचा गणित विज्ञानाची भाषा या लेखमालेतील तिसरा लेख, आणि सौ. प्रतिभा टिल्लू यांचा स्त्रीला हवे असते तरी काय? या लेखमालेतील दुसरा लेख देण्यात आलेला आहे. संगीत या विषयासंबंधी श्री. श्री. ह. तथा बाळासाहेब देशपांडे यांनी केलेल्या विवेचनाचा पुढील भाग येथे देत आहोत. श्री. देशपांडे यांच्या लेखात अनेक नावे आली आहेत. त्यातील अपरिचित नावांपैकी बहुतेक नावे ही पाश्चिमात्य संगीतकार, रचनाकार अथवा भाष्यकार यांची आहेत. वाचकांना हे सर्व लेख आवडतील अशी आशा आहे.

पंचेचाळीस ते अठ्ठेचाळीस या मालेतील हा 'नवी क्षितिजे'चा अठ्ठेचाळिसावा अंक. या अंकाबरोबर वर्गणी संपली आहे याची वाचकांनी नोंद घ्यावी.

डॉ. प्रतिभा कणेकर, सौ. सुमती जोशी, सौ. चित्रा नित्सुरे, सौ. प्रतिभा टिल्लू, श्री. बाळासाहेब देशपांडे या सर्वांनी वेळात वेळ काढून लिहिले त्याबद्दल त्यांचे मन:पूर्वक आभार.

'नवी क्षितिजे'सारख्या अनियतकालिकाचे वर्गणीदार झाल्याबद्दल सर्व वर्गणीदारांचे मन:पूर्वक आभार. श्री. सांगलीकर, श्री. धिरजलाल शहा, श्री. ठाकूर यांनी 'नवी क्षितिजे'ला फारशी आर्थिक विवंचना करावी लागणार नाही याची काळजी घेतली. यासाठी त्यांचा आभारी आहे. श्री. अभिजित पंडित यांनी उशिरा का होईना, पण अंक सुबकपणे छापून दिला. आमचे तरुण चित्रकार मित्र हेमचंद्र कराडकर यांनी रचनेची बाजू सांभाळली, श्रीमती विमलाबाई गुर्जर यांनी मुद्रित संशोधनाचे किचकट काम विनातक्रार पार पाडले, याबद्दल त्यांचा आभारी आहे.

MOORESTOWN NEW JERSEY येथील ELEANOR S. KEHEMEN यांनी नेहमीप्रमाणे 'नवी क्षितिजे'साठी अनेक ग्रंथ पाठविले; त्याबद्दल त्यांचे आभार.

संपादक

### नवी क्षितीजे संबंधी

* सुट्या अंकाची किंमत रु. १५०
* ४५, ४६, ४७ व ४८ अशा चार अंकांची किंमत रु. २००
* प्रत्येक अंकाची पृष्ठसंख्या १७० ते १७५
* वर्गणी मधल्या अंकापासून स्वीकारली जाणार नाही. थोडक्यात ४६ या अंकासाठी वर्गणी पाठविल्यास ४५ व्या अंकापासून अंक पाठविण्यात येईल

अनुक्रमणिका

# साहित्य आणि समाजशास्त्र

## राजकीय कादंबरी — दोन दृष्टिकोन

– प्रतिभा कणेकर

"नावाच्या पट्ट्या लावणे, वर्गीकरण करणे किंवा सैल, अघळपघळ व्याख्या करणे, विशेषत: कादंबरीसारख्या अजस्त्र वाङ्मयप्रकाराबाबत तरी-ही गोष्ट मला रुचत नाही." हे उद्गार 'Politics And The Novel' चे लेखकIrving Howe यांचे आहेत. आपल्या ग्रंथात स्तॉंदाल, डोस्टोएवस्की, ऑरवेल, कोस्लर यांच्या कादंबऱ्यांची चिकित्सा करताना त्यांनी राजकारण व साहित्य यातील नात्याचा शोध घेण्याचा प्रयत्न केला आहे. 'राजकीय कादंबरी' अशी एखादी बंदिस्त चौकट निर्माण करण्यापेक्षा अनुभवजन्य दृष्टिकोनावर भर द्यावा अशी लवचिक भूमिका घेत Howe त्यांनी 'ज्या कादंबरीत राजकारण आणि साहित्य' या नात्याचा पुरेश्या न्याय्य रीतीने शोध घेता येतो, अशा कादंबरीला 'राजकीय कादंबरी' म्हणजे योग्य ठरेल असे भाष्यही केले आहे. आपले म्हणणे स्पष्ट करताना त्यांनी 'राजकीय कादंबरी'चे काही निकषही मांडले आहेत. त्यांचे विवेचन प्रस्तुत लेखाच्या पूर्वाधात मांडले आहे. तर उत्तरार्धात Howe यांच्या विवेचनाचे खंडन करीत आपली 'राजकीय कादंबरी' विषयीची भूमिका मांडणारे Boyers Robert यांचे विवेचन दिले आहे.'Atrocity And Amnesia : The Political Novel since 1945' या ग्रंथाच्या पहिल्या दोन प्रकरणातून Robert Boyers यांनी सैद्धांतिक मांडणी केली आहे.

प्रथम Irving Howe यांच्या मतांचा परिचय देत आहे :

साहित्यप्रकारांची 'राजकीय', 'मानसशास्त्रीय' अशा पद्धतीने वर्गवारी करणे वाङ्मयीन विश्लेषणाच्या दृष्टीने सोयीचे असले तरी अशी वर्गवारी वाङ्मयीन प्रकारातील मूलभूत भेद अधोरेखित करीत नसते असे त्यांचे ठाम मत आहे. म्हणून 'अ टेल ऑफ टू सिटीज'ला राजकीय कादंबरी म्हणता येईल का? या प्रश्नाला त्यांनी 'ज्याला या कादंबरीचा राजकीय कादंबरी म्हणून विचार करायचा असेल त्याने तसा करावा असे संदिग्ध उत्तर दिले. Howe म्हणतात की, "पण या घटनेचा लहानसा फायदा असा झाला की, मी ज्या तऱ्हेचा विचार सुचवत होतो त्यासाठी सिडने कार्टोनची ही गोष्ट हा योग्य विषय नव्हता."

मग 'राजकीय कादंबरी' अशी वर्गवारी केव्हा करता येईल? "ज्या कादंबरीत राजकीय कल्पना प्रभावी भूमिका बजावतात किंवा ज्यात राजकीय वातावरण हे प्रभावी कोंदण असते अशी कादंबरी म्हणजे राजकीय कादंबरी" अशी त्यांनी 'राजकीय कादंबरी'ची व्याख्या केली

आहे व त्यातील 'प्रभावी भूमिका' या संज्ञेचे स्पष्टीकरणही केले आहे. 'ज्या कांदबरीत राजकीय विचारांचा वा राजकीय वातावरणाचा प्रभाव आहे परंतु त्यामुळे तिच्या आकृतिबंधावर कुठलाही विपरित परिणाम होत नाही, किंबहुना या घटकामुळे तिचे विश्लेषण करण्यास मदतच होते अशी कादंबरी म्हणजे राजकीय कादंबरी होय.'

एखाद्या कादंबरीत राजकीय वातावरण किंवा राजकीय विचार प्रभावी ठरतात म्हणजे नेमके काय घडते? 'राजकीय कादंबरी' ही संज्ञाच मुळात अस्तित्वात कशी येते? याचा शोध घेण्यासाठी त्यांनी इंग्रजी कादंबरी वाङ्मयाच्या विकासाचा आढावा घेतला आहे. तो त्यांच्याच शब्दांत असा मांडता येईल –

ज्या काळात मध्यमवर्ग हा समाजातील एक मोठा वर्ग होता परंतु तो पूर्णपणे राजकीय सत्ता काबीज करू शकला नव्हता अशा काळात कल्पनारम्य कथा बहराला आल्या. या कथा बहुतांशी बोधवादी आणि समाजातील चांगल्या गोष्टींचे वर्णन करणाऱ्या होत्या. अशा कथानकांमधील कारस्थानी नायकाच्या(Rogue Hero) चित्रणातून अप्रत्यक्षपणे समाजबदलाच्या शक्यता सूचित होत होत्या. हा मस्तवाल नायक आपल्या कारस्थानांमधून परंपरावादी वर्गाची बंधने जरी तोडत होता तरी त्यांच्या नैतिक औचित्याच्या कल्पनांना तो निर्भिडपणे आव्हान देत नव्हता. तर १९ व्या शतकात जे सामाजिक अभिसरण चालू होते त्याचे उपहासात्मक प्रतीक म्हणजे तो होता. त्या वेळच्या मध्यमवर्गीय क्रांतीचे प्रतिबिंबही या कादंबऱ्यांतून उमटत होते. हा कारस्थानी नायक ज्या वातावरणात वावरत होता ते वातावरण विस्तारवादी व सहनशील असे होते. त्याने आवेगाने केलेल्या कृती समाजात चालून जात होत्या. प्रयोगशीलता ही नव्या जीवनपद्धतीची भूक आहे हे त्याने विक्षिप्तपणे आणि अप्रत्यक्षपणे व्यक्त केले.

१९ व्या शतकातील कल्पनारम्य कादंबरीकडून सामाजिक कादंबरीकडे येताना असे दिसते की कल्पनारम्य कादंबरीतून व्यक्तिगत कृती प्रतिबिंबित होत होत्या. तर सामाजिक कादंबरी व्यापारीवर्गाच्या राजकीय विजयोत्सवाच्या कृतींच्या अभिसरणाने प्रभावित झाली होती. कारस्थानी नायक अजून स्वत:ला समाजांतर्गत जीवनाचा भाग म्हणून मानत नव्हता. तो आपल्या विक्षिप्त जिज्ञासेने समाजाच्या विविध स्तरांवर वावरत होता; तर राजेशाही प्रवृत्तींचा प्रभाव आणि नवीन आलेल्या व्यापारीवर्गाची जीवनपद्धती या नायकाच्या संवेदनशीलतेचा अपमान करीत होत्या. तेव्हा तो गंभीरपणे स्वत:ची व स्वत:च्या मूल्यांची पारख करू लागला.

मध्यमवर्गीय समाज जसा आपली पूर्वापार संगती घालवून बसू लागला तशी सामाजिक कादंबरी एकतर पारंपारिक मध्यमवर्गीय मूल्ये, विचार, भावना यांच्या चित्रणाच्या गाळात रुतू लागली नाहीतर तिच्या अनेक दिशांनी चिरफळ्या उडाल्या. त्यातली एक टोकाची दिशा म्हणजे व्यक्तिगत संवेदनशीलता अभिव्यक्त करणे.

सामाजिक कादंबरीने बऱ्याच अंशी सामाजिक स्थिरता गृहीत धरली. जीवनरीतींमधील सूक्ष्म छटा किंवा विस्तृत जीवनातील एक तुकडा यांचे चित्रण करायचे तर समाज असा लेखणीच्या

सुरीखाली येण्याजोगा स्थिर असला पाहिजे. १० व्या शतकाच्या पूर्वार्धात फक्त इंग्लंडमध्ये अशी स्थिरता जाणवण्याजोगी होती.

आदर्श म्हणता येईल अशी सामाजिक कादंबरी जेन ऑस्टिनने लिहिली. नेपोलियन असला काय आणि नसला काय, तिच्या नजरेला समाज स्थिर असल्यासारखा दिसत होता. परंतु लवकरच अशी स्थिती आली की समाज असा कुणाच्याही नजरेखाली स्थिर राहण्याजोगा राहिला नाही. कादंबरीकारांचे लक्ष समाजातील विविध स्तरातील श्रेष्ठ-कनिष्ठतेकडून संपूर्ण समाजाच्या नियतीकडे गेले. ज्याला मी 'राजकीय कादंबरी' म्हणतो ती याच काळात लिहिली गेली. अशा कादंबरीत समाजाचा 'विचार' वेगळ्या पद्धतीने आला होता. हा विचार त्यातील पात्रांच्या जाणिवांना भेदून गेला होता. तो त्यांच्या वर्तनातून स्पष्ट दिसत होता. त्यांना स्वत:ला काही संयुक्तिक अशा राजकीय निष्ठा होत्या. ती पात्रे आता समाजाला पाठिंबा द्यायचा की विरोध करायचा अशा रीतीने विचार करू लागली होती. विभाजित झालेल्या समाजातील 'ह्या' किंवा 'त्या' खंडासाठी एकत्र होऊ लागली होती. एखाद्या विचारप्रणालीच्या नावाने ती असे वागत होती.

या दृष्टीने फ्रान्सचा विचार करता असे दिसते की, त्या युगाचा अंत स्ताँदाल आपल्या लेखनातून अधोरेखित करीत होता. तिथे सामाजिक क्रांती अचानक आणि हिंसक पद्धतीने झाली होती. समाजात सर्व तऱ्हेच्या विसंगती अतिशय टोकदार स्थितीत होत्या. त्या विषयीच्या जाणिवाही इंग्लंडपेक्षा अधिक नेमक्या होत्या. अशा काळात स्ताँदाल कादंबऱ्यांनी सांगून टाकले होते की, 'व्यक्तिगत पौरुषत्व सिद्ध करण्याचे दिवस संपले आहेत आणि सामूहिक विचारप्रणालीचे युग आले आहे.'

स्ताँदॉलपर्यंतच्या कादंबरी वाङ्मयाचा एक धावता आलेख वाचकांपुढे काढून झाल्यानंतर त्याच्या कादंबऱ्यांच्या अनुषंगाने Howe यांनी 'राजकीय कादंबरी'चे स्वरूप स्पष्ट करण्याचा प्रयत्न केला आहे.

"कुठल्याही कादंबरीत असते त्याप्रमाणे राजकीय कादंबरीत मानवी वर्तनाचे व भावानांचे दर्शन तर असायलाच हवे, शिवाय आधुनिक विचारप्रणालीतील (Ideology) काही अवघड अशा समस्यांची बीजेही तिने आपल्या प्रवाहात शोषून घेतली पाहिजेत. कादंबरी मानवी अनुभवांचे रूप शब्दांकित करण्याचा प्रयत्न करीत असते; अन् कुठलीही विचारप्रणाली ही अमूर्तच असते. तिला कलाकृतीतील संवेदनात्मक ठशांशी जोडून घेण्याचा प्रयत्न केल्यास ती त्यापासून फटकूनच राहताना दिसते. राजकीय कादंबरी एखाद्या विचारप्रणालीला साक्षात् अनुभवासमोर आणते. एरवी अनेक कादंबरीकारांना असे वाटत असते की, अमूर्त विचार कलेला भ्रष्ट करतात म्हणून त्यांना कलेपासून एका सुरक्षित अंतरावर ठेवले पाहिजे. Howe यांचे मत मात्र यापेक्षा वेगळे आहे. शत्रूवर चाल करून येणाऱ्या सैन्याप्रमाणे जर विचारप्रणाली कादंबरीत येत असतील तर त्या कादंबरीच्या कलात्मकतेला हानी पोहोचवतील परंतु सहजपणे, मुक्तपणे येणारे विचार

कादंबरीच्या रचनेत एकजीव होतात. किंबहुना गंभीर प्रकृतीच्या कादंबरीला ते आवश्यकच असतात. ते भावनांचे प्रचंड स्फोट घडवतात, वाचकाला अस्वस्थ करतात, कल्पनेपलीकडच्या जगाकडे घेऊन जातात. इतर लेखकांपेक्षा राजकीय कादंबरीकाराला या दृष्टीने अधिक सजग राहावे लागते. मानवी भावनांचे निखळ स्वरूपात आकलन करावयाचे आणि त्यांना शब्दरूप द्यावयाचे ही गोष्ट एरवीही प्रयत्नसाध्यच आहे. एरवी भावनांच्या दिशा बदलत असतात आणि त्या नियंत्रित नसतात. परंतु एखाद्या अमूर्त विचाराच्या दडपणामुळे त्या नियत होत असतात याचे भान राजकीय कादंबरीकाराला ठेवावे लागते.

त्याला एकाच वेळी अनेक कल्पनांचा मागोवा घ्यावा लागतो; त्यांना परस्परविरोधी, तरी परस्परावलंबी रूपात पाहावे लागते. राजकीय घटनांना आपल्या कलाकृतीत सौंदर्यपूर्ण घटकांत रूपांतरित करण्यासाठी त्यांच्यावर पकड मिळवावी लागते. वास्तव जीवनातील काही कल्पनांनी कदाचित त्याला कादंबरीलेखनाला प्रवृत्त केले असेल, परंतु वास्तवात या कल्पना त्यांच्या शुद्ध रूपात असतात. एकदा त्या कलाकृतीत आल्या की त्या अशा अमूर्त पातळीवर राहात नाहीत. राजकीय कलाकृती अशी ऊब निर्माण करते की अमूर्त कल्पना पात्रांच्या हालचालींमध्ये विरघळून जातात. जॉर्ज इलियटने एका पत्रात लिहिले आहे की, ''काही विशिष्ट कल्पना मूर्तरूप करण्याच्या माझ्या प्रयत्नात त्या जणू प्रथम हाडामासाच्या होऊन माझ्यापुढे उलगडतात.'' अमूर्त कल्पना किंवा विचारप्रणालींना सचेतन करायचे, त्यांना असे गुण बहाल करायचे की, त्यातील पात्रांना आपले मनोविकार चेहऱ्यावर दाखविण्याची क्षमता यावी; हे राजकीय कादंबरीकारापुढे मोठेच आव्हान असते. दुसरी महत्त्वाची गोष्ट म्हणजे त्याला अशा भासचित्रांची निर्मिती करावी लागते की त्यातून कल्पना किंवा अमूर्त विचारप्रणालींना स्वतंत्र गती प्राप्त होईल आणि कादंबरीतील पात्रे चैतन्यपूर्ण होतील; स्वतंत्रपणे विकास पावू लागतील.

एखादी राजकीय विचारप्रणाली उचलून धरण्याचा वा नाकारण्याचा, कुठलाही हेतू लेखकाच्या मनात असला तरी केवळ स्वतःच्या कल्पनेवर त्याला आपली कलाकृती उभारता येत नाही. मानवी मनोविकार आणि अनुभव यांची अभिव्यक्ती करण्यासाठी तो बांधला गेलेला असतो. तो कथाविषयात राजकारण अशा रीतीने गुंफतो की पात्रांच्या अनुभवांशी त्याचे व्यामिश्र नाते निर्माण व्हावे. त्यातून तो एखादा 'फॉर्म्युला' निर्माण होऊ देत नाही. अर्थात् असा 'फॉर्म्युला' निर्माण होऊ न देणे, ही अत्यंत अवघड गोष्ट आहे; परंतु ती तो करून दाखवतो. त्याला पूर्वकल्पित विचारप्रणाली आणि भावनिक गुंतागुंत यातील नाते मांडण्याचाच प्रयत्न करायचा असतो; कादंबरीकार तो अनेक तऱ्हांनी करतो. डोस्टोएवस्कीच्या 'द पझेस्ड'मध्ये काहीशा विकृत आणि अत्यंत जिव्हाळ्याच्या भावना विचारप्रणालीला असंभवनीय कल्पनेत कशा बदलून टाकतात ते दाखवले आहे. मालरॉक्सच्या 'मॅन्स फेट' मध्ये शूरांच्या हौतात्म्यासाठी विचारप्रणाली भावनांचे वक्रीकरण करते असा अनुभव येतो. तर कोस्लरच्या 'डार्कनेस अॅट नून' आणि जेम्सच्या 'द प्रिन्सेस कॅसमासिमा' मध्ये भावना एखाद्या राजकीय विचारप्रणालीचा किती

जीवघेण्या पद्धतीने ऱ्हास करतात ते दाखवले आहे.''

Howe ना 'द पझेस्ड' ही राजकीय कादंबरीविश्वातील सर्वात महान कादंबरी वाटते. राजकीय कादंबरी वाचकाशी कोणत्या तऱ्हेचे नाते जोडते, याचे विवेचन त्यांनी या कादंबरीच्या संदर्भात मांडले आहे. डोस्टोएवस्कीने काही विचारांची बांधिलकी स्वीकारूनच ही कादंबरी लिहिली. त्यावेळी कलामूल्यांपेक्षा ह्या वैचारिक बांधिलकीकडे त्याचा कल अधिक होता असे त्याने स्वत:च म्हटले आहे. परंतु तिला निश्चितच कलात्मक रूप लाभले आहे. अशी कलात्मक राजकीय कादंबरी वाचकावर कोणता परिणाम करते? Howe म्हणतात की, ''राजकीय कादंबरी आपली मनुष्य स्वभावांचा अनुभव घेण्याची क्षमता समृद्ध करते आणि त्याचवेळी आपल्या राजकीय जाणिवा प्रगल्भ करते. ती तुमचे प्रत्यक्ष राजकीय मतपरिर्वन करणार नाही. 'द पझेस्ड' वाचून कुणा निष्ठावान समाजवाद्याच्या श्रद्धा बदलणार नाहीत. परंतु त्याच्या श्रद्धांची जात आणि अर्थच्छटा पूर्वी होत्या तशाच निश्चित राहाणार नाहीत.'' असे का घडते?

कारण राजकीय कादंबरी तुमच्या व्यक्तिभावरहित असलेल्या विचारप्रणालींचा बुरखा फाडून तिला व्यक्तिगत पातळीवरील भावनांच्या निकट सान्निध्यात आणून ठेवते. तीत एक तऱ्हेचे आंतरिक द्वंद्व असते. 'आहे त्यापेक्षा काहीतरी वेगळे असावे' असा तिला ध्यास लागलेला असतो. राजकीय कादंबरीकार बौद्धिक चळवळीची एक व्यामिश्र व्यवस्था निर्माण करतो. त्यात त्याची स्वत:ची राजकीय मतप्रणाली प्राधान्याने कार्यरत असली तरी ती एकमेव नसते व सर्व घटनांना गती देईल अशी प्रभावशाली नसते. किंबहुना आपल्या कल्पनांच्या विरोधात उभा करायला त्याला प्रतिपक्ष हवाच असतो. आपल्या प्रेरणा, आपले हेतू तावून सुलाखून घेण्यासाठी विरोधाचा खडक असणे त्याला आवश्यकच वाटत असते.

जेव्हा राजकीय कादंबरीकार अमूर्ताला अनुभवांच्या प्रवाहासमोर आणत असतो तेव्हा एका–परीने आदर्शातील विशुद्धतेला प्रत्यक्ष कृतींमधील प्रदूषितासमोर आणत असतो. अशा वेळी राजकीय कादंबरी ही वेशिष्ट्यपूर्ण अशी अराजकीय कलाकृती होते. मात्र त्यात 'कल्पना' हा घटक अतिशय महत्त्वाचा आहे. हे आडमुलखातील असेल परंतु त्यामुळेच कादंबरीत आकर्षण व ताण निर्माण होतात.

आता प्रश्न येतो राजकीय कादंबरीच्या मूल्यमापनाचा. या संदर्भात Howe यांनी नि:संदिग्ध शब्दांत सांगून टाकले आहे की, 'राजकीय कादंबरीच्या मूल्यमापनाचे निकष हे अखेर इतर कुठल्याही कादंबरीसाठी असतात तेच असले पाहिजेत.' आपल्या जीवनावर ती किती प्रकाश टाकते? ती किती प्रमाणात आपल्याला नैतिक दृष्टी देते? ह्या प्रश्नांची वाचकाला समाधानकारक उत्तरे मिळण्यावर या कलाकृतीचे यशापयश अवलंबून असेल. राजकारणाइतकी दुसरी कुठलीही गोष्ट आपल्या भावनांचा बारकाईने शोध घेत नाही. कुठल्याही कादंबरीतील निंद्य अशा राजकीय मतप्रणालीवर आपण पटकन आपली प्रतिक्रिया व्यक्त करत असतो. त्यामुळे 'आपल्या मतांच्या चाळणीतून एखादा लेखक किती सत्य मांडू शकतो?' हीच त्याची मोठी परीक्षा ठरते आणि

लेखकाने मांडलेल्या मता-मतांच्या गलबल्यातून किती सत्य, वाचक स्वीकारू शकतो यावर त्याची परीक्षा होते. लेखक व वाचक दोघेही आपापल्या मतांना उत्कटपणे अभिव्यक्ती देत असतात. लेखक जरी विशिष्ट राजकीय प्रणालीने मोहित झालेला असला तरी तिच्यापलीकडची नैतिक व्यवस्था शोधण्याची त्याला उत्कट इच्छा असावी लागते; तरच स्वागतशील वाचक आपल्या स्वत:च्या राजकीय प्रणालीशी बांधील राहिला तरी कादंबरीकाराने निर्माण केलेल्या व्यवस्थेशी तोही सहमत होतो.

Howe यांनी प्रस्तुत लेखातून 'राजकीय कादंबरी'चे लवचिक, ऐसपैस असे नमुनारूप स्वीकारले असले तरी काही मुद्दे वाचकांपुढे विचारार्थ मांडले आहेत :

१) ही कादंबरी अमूर्त विचारप्रणालींना किंवा कल्पनांना चैतन्यशील पात्रांमध्ये रूपांतरित करते.

२) तिच्यात राजकीय कल्पना प्रभावी भूमिका बजावतात.

३) तिच्यात राजकीय विचारप्रणाली ही मानवी संवेदना व अनुभव यांच्या समोरासमोर येते.

४) राजकीय कादंबरी आपला मनुष्यस्वभावाचा अनुभव घेण्याची क्षमता समृद्ध करते.

५) तिच्या मूल्यमापनाचे निकष इतर कुठल्याही कादंबरीपेक्षा वेगळे नसतात.

Howe यांनी 'राजकीय कादंबरी'संबंधीचे वरील विवेचन केले तेव्हा त्यांच्यासमोर प्रामुख्याने १९ व्या शतकाच्या उत्तरार्धातील व विसाव्या शतकाच्या पूर्वार्धातील कादंबऱ्या होत्या. परंतु १९४५ नंतरच्या प्रमुख राजकीय कादंबऱ्यांचे मूल्यांकन करण्यासाठी Howe यांची समीक्षादृष्टी उपयोगाची नाही अशी भूमिका घेऊन Robert Boyers यांनी Howe यांच्या मताचे खंडन केले आहे.

Robert Boyers यांच्यासमोर प्रामुख्याने व्ही. एस्. नायपॉल, गॉर्डिमर, गॅब्रियल गार्सिया मार्क्वेझ, गुंतर ग्रास, ऑरवेल, कोस्लर हे लेखक आहेत. यातील शेवटच्या दोघा लेखकांच्या लेखनामागे कोणतीही विशिष्ट राजकीय सैद्धांतिक भूमिका नाही व इतरांनी राजकारणाचा वापर नेपथ्याप्रमाणे(Settings) केला आहे. या सर्वांच्या लेखनप्रेरणाही आधीच्या लेखकांपेक्षा वेगळ्या आहेत; तेव्हा या कादंबऱ्यांकडे पूर्णत: वेगळ्या अंतर्दृष्टीने पाहाणे आवश्यक आहे असे Boyers यांना वाटते.

त्यांचा Howe वरचा मुळातील आक्षेप असा आहे की Howe ना 'राजकीय कादंबरी-विषयीची सैद्धांतिक मांडणी फारशा स्वाभाविकपणे करता आलेली नाही. Howe यांचा लवचिक राहाण्याचा आग्रह आणि त्यांचा प्रत्ययवादी दृष्टिकोन म्हणजे काही विशिष्ट कलाकृतींना दिलेल्या तोंडदेखल्या प्रतिक्रिया आहेत.' एखाद्याला 'अ टेल ऑफ टू सिटीज' राजकीय वाटत असेल तर त्याने तिचा त्या पद्धतीने विचार करावा, अशी जी Howe यांनी भूमिका घेतली आहे ती देखील Boyers यांना मान्य नाही. एखाद्या कलाकृतीचे वाचन केवळ तिच्यापुरते करता येईल का? आपल्या हातातील कादंबरीविषयी विचार करताना आपण आधी वाचलेल्या कादंबऱ्यांच्या

संदर्भातच तिचा विचार करणार. आपण एखाद्या प्रकारची कलाकृती वाचत असतो तेव्हा आपले 'साकल्याचे पूर्वज्ञान' (An anticipated sense of the whole) जागृत होत असते. प्रथम त्या कलाकृतीशी या जाणिवेचे बरेच दूरचे नाते असते, परंतु संहितेतील काही संकेत, प्रतिमापुंज, किंवा संहितेत गुंफलेली रूपके यांच्यातून ते चढ्या क्रमाने दृढ होत जाते. तेव्हा एखाद्या कलाकृतीची, तिला इतरांपासून वेगळे काढून चर्चा करणे त्यांना युक्त वाटत नाही.

एखाद्या राजकीय कादंबरीचे मूल्यमापन करण्याचे निकष इतर कुठल्याही कादंबरीच्या मूल्यमापनाच्या निकषासारखेच असतात, हे Howe यांचे मतही Boyers यांना पूर्णत: मान्य नाही. जरी कुठल्याही कलाकृतीचे अंतिम मूल्यमापनाचे निकष ठराविक (Standard) असतात तरी राजकीय कादंबरीत ज्या वैशिष्ट्यपूर्ण शब्दसंहती निर्माण झालेल्या असतात त्यांचा वेगळा विचार केला पाहिजे असे त्यांना वाटते. तसेच त्या कादंबरीतील कल्पना आणि विचारप्रणाली यांच्या अनुषंगाने केलेले वाचन वाचकाला वेगळा अनुभव देऊन जाते. अशा कादंबरीत 'वातावरण' हा घटक अधिक प्रभावी असतो आणि विशिष्ट विचारप्रणालीचे चित्र वाचकाच्या मनाची पकड घेत असते. अशावेळी इतर कलाकृतींच्या वाचनातून मिळणाऱ्या अनुभवापेक्षा हा अनुभव त्याला वेगळा काढावाच लागतो.

Howe यांच्या विवेचनाशी अशा काही मुद्यांबाबत मतभेद व्यक्त केल्यानंतर Boyers यांनी Howe यांच्या विवेचनातील दोन मुख्य संज्ञा स्वीकारल्या आहेत. एक म्हणजे 'राजकीय कादंबरीत अमूर्त कल्पनांना एक तऱ्हेची स्वतंत्र गती असते' आणि दुसरी, 'अमूर्त कल्पना चैतन्यशील पात्रांमध्ये रूपांतरित होतात'. या संज्ञांमध्ये आणखी काही संकेतांची त्यांनी भर घातली आहे.

१) राजकीय कलाकृतीत राजकीय घटनांना, कथानकामागे सोडलेले पडदे एवढेच स्थान नसते. त्या महत्त्वपूर्ण असतात.

२) राजकीय कलाकृतीतील पात्रांचे व्यक्तिगत जीवन (Personal fate) सामाजिक किंवा राजकीय रचनाक्रमांनी घट्ट बांधलेले असते आणि ज्यांना राजकीय कारस्थाने करता येतात किंवा राजकीय समीकरणे मांडता येतात अशाच व्यक्ती फक्त त्यांचे नियंत्रण करू शकतात.

३) या कलाकृतीत सामान्य जगाचे चित्र वेगळ्या रीतीने रेखाटण्याचा प्रयत्न असतो. त्यात केवळ आकस्मित घटनांची मालिका नसते किंवा प्रतिमा, खुणांच्या निशाण्या (emblems) यातून नेहमीपेक्षा लेखकाला काही अधिक व्यक्त करायचे असते.

या तीन निकषांची भर घालून Boyers यांनी डोरिस लेसिंग या लेखिकेच्या 'द टेम्प्टेशन ऑफ जॅक ओर्ने' या कादंबरीकेची समीक्षा करून दाखविली आहे. "या कलाकृतीत घटनांच्या अनेकविधतेचा अभाव आहे, ती अनेक पात्रांचा परिचय करून देत असली तरी तीत फक्त मुख्य पात्राचाच पुरेसा विकास झाला आहे, तिच्या कथानकाचे केंद्र सरकते आहे असे वाटत

असले तरी 'राजकीय संघर्षातून निर्माण झालेल्या तणावाभोवती' कोंदण मात्र नीटसपणे बसले आहे. 'जॅक ओर्ने'मधील कल्पना तुकड्या तुकड्यांनी आणि जाणीवपूर्वक परंतु आधीच ठरवल्याप्रमाणे खूपच सपाट व सोप्या होऊन येतात.'' अशा या कलाकृतीच्या आकृतिबंधाच्या मर्यादाBoyers यांनी प्रथमच स्पष्ट केल्या आहेत. आणि तरीही 'राजकीय कलाकृती' म्हणून विश्लेषणासाठी या कादंबरीकेची निवड केली आहे.

प्रस्तुत कादंबरीकेतील काही उताऱ्यांची निवड करून त्या अनुषंगाने त्यांनी 'राजकीय कलाकृती' विषयी काही विवेचन केले आहे. ते जाणून घेण्यासाठी त्यांनी केलेली 'जॅक ओर्ने'ची समीक्षा पाहाणे योग्य ठरेल.

'ओल्ड गार्ड' ही समाजवादी विचारांची संघटना आहे. जॅक ओर्ने हा 'ओल्ड गार्ड' या संघटनेतील एक आदर्शवादी व्यावसायिक कार्यकर्ता आहे. तो एक धाडसी पत्रकारही आहे. आता तो उतारवयाचा आहे. त्याचे वडील नुकतेच वारले आहेत. आणि या घटनेमधून आपल्या सर्व जीवनकार्याचे पुनर्मूल्यांकन करण्याच्या मन:स्थितीत तो येऊन ठेपला आहे.

पहिला उतारा असा आहे –

जॅक हॉस्पिटलमधून घरी परततो आहे. इंग्लंडच्या हिरव्यागार, सुखद प्रदेशातून त्याची रेलगाडी चालली आहे. गाडीत भेटलेल्या एका आकर्षक तरुणीशी त्याचा संवाद चाललेला आहे.

''ती जॅकच्या विश्वात नवखी नव्हती. त्याच्या मित्रांची नावे आपल्या खाजगी मालकीची असावीत अशा पद्धतीने ती घेत होती. जणू स्वत:ला घडवण्यासाठी तिने त्यांना खाऊन टाकलेले होते. पूर्वी जॅकने सुद्धा केअर, हार्डी, मार्क्स, फ्रॉईड, मॉरिस यांना असेच गिळून टाकले होते. आताच्या 'ओल्ड गार्ड' प्रमाणेच त्यांचा इतिहास, त्यांची मते, त्यांचे अधिकार तिच्याही मालकीचे होते. तिच्या मते वॉल्टर केटिंग, बिल, मोना हे चबुतऱ्यावरील पुतळ्यांसारखे होते. एकेकजण मतांची एकेक पायरी निर्देशित करीत होते. मात्र जेव्हा तिने त्याला त्याचे नाव विचारले तेव्हा त्याने सांगितले, 'जॅक सॅबेस्टाईन', 'जॅक ओर्ने' नाही सांगितले. कारण त्याला वाटले की, मतांच्या बाबतीत तिचे पूर्वज ठरतील अशांच्या स्मारक मंदिरात ती आपली प्रतिष्ठापना करेल आणि मग पूर्वजांवर होते तशीच टीका आपल्यावरही होईल.

पूर्वी एकदा, एका लहानशा क्रांतीच्या वेळी, जॅक सॅबेस्टाईन याच नावाने तो युक्रॅडरच्या एका बंदिस्त जागेतून निसटला होता. त्यावेळी कदाचित तो मारलाही गेला असता. आता जर त्याने त्या मुलीला ही हकीकत सांगितली असती तर ''आपल्यापुढून इतिहासात परत जाणारा माणूस'' म्हणून तिने त्याच्याकडे अतिशय कौतुकाने पाहिले असते.''

दुसरा उतारा –

१९७० –७१ च्या भारत-पाकिस्तान युद्धात निर्वासितांचे जिणे वाट्याला आलेल्यांच्यासाठी मोर्चा काढण्याची तयारी चालू आहे. मोर्चा ही या कथानकातील एकमेव राजकीय कृती ठरते.

"ती नावे शेकडो पत्रांच्या अग्रभागी, विनंतीपत्रांवर, निषेधपत्रांवर, अर्जांवर सतत दिसत होती. तुम्ही एक नाव वाचलेत की इतर नावांची तुम्ही सहज कल्पना करू शकाल. वास्तविक या सर्वांचे पूर्वजीवन (background) कितीतरी वेगवेगळे ! त्यांचे वर्ग, त्यांचे देश, त्यांचे वंशदेखील ! काहीजण साम्यवादी तर काहींनी साम्यवादाशी संघर्ष केलेला. कुणी मजूर पक्षाचे, कुणी उदारमतवादी, काही शाकाहारी आणि युद्धविरोधी, काही अनाथ मुलांचे पालक, आफ्रिका आणि भारतातील खेड्यांमधले बांधकाम कंत्राटदार, निर्वासितांचे साहाय्यक आणि दैवी, मानवी संकटातून वाचलेले काहीजण ! त्यांच्यात पत्रकार होते आणि संपादक होते. अभिनेते होते आणि लेखक होते.

तीच मंडळी कार्यकारी मंडळावर होती, समित्यांवर होती आणि निम-धर्मार्थ संस्थांच्या मंडळांवरही होती. तेच शहर-विधिमंडळाचे सभासद होते. कायदेमंडळाचे सभासद होते, अनुबोधपट कार्यक्रमाचे निर्माते होते. ते कोरिया आणि केनयाच्या, सायप्रस आणि सुवेझच्या, हंगेरी आणि कोंगोच्या, नायजेरिया, ब्राझील, दक्षिण आफ्रिका आणि ऱ्होडेशिया आणि आयर्लंड आणि व्हिएतनाम .........आणि आता बांगला देशाच्या नव्वद लाख निर्वासितांच्या भावना आणि मतांमध्ये ते सहभागी झाले होते.

एकदा जेव्हा ते आपला दृष्टिकोन व्यक्त करण्यासाठी एकत्र जमले तेव्हा त्यांचा दृष्टिकोन हा अल्पसंख्यांकांचा होता. आपले मत लोकांपर्यंत पोहोचवणे त्यांना अवघड किंबहुना अशक्य वाटत होते. आता असे काहीतरी घडले होते की ते अद्याप सगळ्यांना कळले नव्हते. ते एखाद्या गोष्टीबाबत स्वत:ला व्यक्त करायला जायचे आणि असे पुन्हापुन्हा घडायचे की बहुसंख्यांकांनी इतरत्र मांडलेल्या पारंपारिक विचारांशी त्यांचे विचार जुळलेले असायचे. एकेकाळी समाजपरिवर्तन कसे करायचे याविषयी ते आक्रमक, आशावादी विचार मांडत, पण सध्या ते बचावाच्या पवित्र्यात होते. एकेकाळी त्यांनी आदर्श समाजव्यवस्थेचे भविष्य पाहिले होते. आता त्यांना संकटांची चाहूल लागे. संकटे थांबवणे त्यांना शक्य नव्हते, आणि त्यांची तीव्रता कमी करण्यासाठी ते झटत.

तिसरा, अखेरचा उतारा –

आपल्या घरातील तरुण पिढीचा स्त्रीमुक्ती, ख्रिश्चिॲनिटी, शाकाहार इ. बद्दलचा वाद जॅक ऐकतो आहे. दिवसभरातली बेसूर मन:स्थिती क्षुल्लकपणात विरघळून जावी म्हणून तो वाट पाहात होता. पण ते त्याला शक्य वाटत नव्हते. त्याचा कडव्या वृत्तीचा मुलगा आणि त्याचे मित्र यांचं अर्वाच्च वागणं पाहाण्याचा भयानक अनुभव त्याने नुकताच घेतला होता. तो त्याला पुन्हा पुन्हा आठवत होता आणि त्याला चीड आणत होता. एकीकडे आधीच्या घटनांवरून

'सगळ्या राजकीय चळवळींच्या चिरफळ्या उडाल्या आहेत आणि समाजवादाचाही अटळ शेवट झाला आहे' अशा निर्णयाला तो आला होता. समाजवादाच्या या ढलप्या निघाल्यामुळेच तरुण पिढीने इतिहासाचा अभ्यास करायला नकार दिला होता. कारण इतिहास त्यांच्यापासूनच सुरू होत होता. खरोखरच, इतिहास जॅक आणि त्याच्या मित्रांपासून सुरू होत होता.

त्यांचे बोलणे जागतिक चर्च कॉन्फरन्सच्या तात्त्विक वादविवादासारखे चालले होते. त्याला माहीत होते की हे बोलणे जर एखाद्या सिद्धांताकडे आले आणि काही ऐतिहासिक व्यक्तिमत्वांबद्दल त्यांनी मतभेद व्यक्त केले तर त्याच्या श्रद्धा, समाजवाद ........ कोलमडून पडेल. तो पाहात राहिला. मुलींचे, पुतणीचे बोलणे लक्षपूर्वक ऐकू लागला. त्याच्या मनात आले की, ह्यांना असेच जगायला मिळाले तर दोन, तीन ..... दहा वर्षांनी, दृष्टिकोन यांच्यावर आपलाच हक्क शाबीत करतील.

या उताऱ्यांच्या आधारे **Boyers** लेसिंगच्या कलाकृतीकडे 'राजकीय कथा' म्हणून का पाहायचे? या प्रश्नाचा शोध घेतात.

कथेच्या केंद्रस्थानी असलेली व्यक्ती जॅक स्वत:ला एक राजकीय व्यक्ती मानतो. आपण स्वीकारलेल्या विचारप्रणालीच्या संदर्भात तो स्वत:ला तोलतो आणि इतर व्यक्तींविषयीचा त्याचा दृष्टिकोन त्या राजकीय प्रणालीत कितपत चपखल बसल्या आहे यावर अवलंबून असतो. जॅकचा भाऊ सेड्रिक तसा साधारण चांगला माणूस आहे परंतु मूलभूत राजकीय मतांविषयीची त्याची अलिप्तता पाहून जॅक त्याला आपल्या सहकाऱ्यांपेक्षा कमी दर्जाचा ठरवतो.

राजकीय कल्पनांना येथे स्वत:ची एक स्वतंत्र गती लाभली आहे. मात्र त्यांना नकारात्मक महत्त्व असावेसे वाटावे अशा पद्धतीने त्या रचल्या गेल्या आहेत.

जॅक जेव्हा आपल्या 'ओल्ड गार्ड'च्या सहकाऱ्यांबद्दल विचार करतो तेव्हा स्वतंत्र व्यक्ती म्हणून त्यांचा विचार करण्याऐवजी सामूहिकरीत्या त्यांची जी ओळख आहे, त्यातील त्यांच्या विचारप्रणालीशी असलेल्या कमी-अधिक बांधिलकीच्या स्वरूपातच तो त्यांना पाहतो. त्याला असे वाटते की, आपल्या वर्तुळाबाहेरील लोकही आपल्याला असेच न्याहाळत असले पाहिजेत. रेल्वेत भेटलेल्या तरुणीला तो आपले खरे नाव सांगत नाही याचे कारणही हेच !

तो स्वत:ला ऐतिहासिक व्यक्ती मानतो. आपण स्वीकारलेल्या कल्पना फार लोकप्रिय नसल्या तरी आज अस्तित्वात आहेत. परंतु त्या कल्पनांमध्ये सुधारणा घडवू शकतील अशी माणसे त्याला भोवताली दिसत नाहीत.

मग आता अशा कल्पनांशी कसे नाते ठेवायचे? दुसरा पर्याय म्हणजे त्यांच्यातून अलिप्त होणे, या कल्पनांविषयीच शंका घेणे किंवा त्यांच्यापासून दूर जाणे. जॅकला भेटणाऱ्या प्रत्येक माणसाच्या चेहऱ्यावर त्याला एक दिखाऊपणाचा मुखवटा दिसतो आणि त्याच्या मनात येते की, या कल्पना मुळी अस्तित्वातच राहिलेल्या नाहीत. आपल्याला बांधून ठेवण्याची त्यांची क्षमता संपून गेली आहे. जर अखेर सगळाच दिखाऊपणा असेल, प्रत्येक माणूस स्वत:ला

इतरांपासून वेगळा समजत असेल, आत्मतुष्ट असेल, स्वत:लाच मोठा मानत असेल, इतरांना आपल्या कल्पनात सहभागी करून घेणार नसेल तर सगळे वादविवाद आणि संघर्ष निरर्थक म्हणावे लागतील. माणसाला फक्त सत्ता पाहिजे आहे, हे लक्षात घेतले तर मग कल्पनांना स्वतंत्र गती असणार कुठे? काही विशिष्ट हेतूंसाठी त्या अस्तित्वात आल्यात आणि त्यांची गरज संपल्यावर त्या बाजूला टाकल्या जातील. त्या जर पारंपारिक वाटल्या तर त्याचा अर्थ इतकाच की त्या बहुउद्देशीय असतात आणि विविध क्षमता अंगी असणारी माणसे त्यांचा गैरवापर करतात. जी कल्पना सर्वाधिक संख्येने सत्तेकडे घेऊन जाते ती कल्पना सर्वात जवळची.

लेसिंगच्या कलाकृतीत दोन कल्पनाव्यूह (View of ideas) परस्परांना पर्यायी अशा रीतीने आले आहेत. काहींचा ती सुचवते की, दृष्टिकोन असा असतो की, कल्पना या दृढ असतात. अशा माणसांवर कल्पनांचा इतका प्रभाव असतो की, कोणतीही कृती स्वत: घेतलेल्या अनुभवाने न करता ते ती कल्पनेवरील विश्वासाने व पर्यायाने सवयीने करतात. त्यालाच ते तत्त्व म्हणतात, तर काहीजण आपल्याला जे काही हवे आहे ते प्राप्त करून घेण्याची करामत म्हणून कल्पनांकडे पाहतात. ते एकतर तुच्छतावादी तरी असतात किंवा स्वत:च स्वीकारलेल्या बेगडी कल्पनांमुळे इतके निराश झालेले असतात की जे काही ते पाहातात त्या सगळ्याचेच त्यांना भय वाटते. लेसिंग जणू सुचवते, "ह्या कल्पनांकडे नीट बघा. त्या दिसतात तशा नाहीत. जे त्या स्वीकारतात किंवा ज्यांचा त्या ताबा घेतात त्यांच्या पदरी अखेर घोर निराशाच येते."

Howe चे आणखी म्हणणे असे की, 'राजकीय कादंबरीत राजकीय वातावरण लेखकाच्या इच्छेनुसार कथानकामागे सोडलेल्या पडद्यापेक्षा अधिक महत्त्वाचे असते.(**In political novels political intrigue will be more than a backdrop for the dramas of sensibility their authors wish to unfold**). लेसिंगच्या कलाकृतीच्या संदर्भात या संकेताचा विचार केला पाहिजे. जॅक ओर्नें ही एक हळुवार कथा आहे. तो हळुवारपणा मुख्यत्वे कथानायकाच्या जीवनसंघर्षात आहे. हा संघर्ष कुठल्याही राजकीय घटनेमुळे निर्माण झालेला नाही तर त्याच्या वडिलांचा मृत्यू आणि त्याच्या कुटुंबातील व्यक्तींबरोबर त्याची होणारी परस्परक्रिया यातून आकाराला आला आहे. इथे राजकीय कल्पना कथेच्या पाठीमागे सोडलेल्या पडद्याप्रमाणे असण्याची इच्छा सूचित होते का? राजकीय घटनांचे रेखाटन हे वरवरचे आहे का? कथांतर्गत वातावरण राजकीय अस्वस्थतेने भारलेले आहे, एवढे करण्यातच लेसिंग समाधानी आहे का? आणि वेगवेगळ्या व्यक्तिमत्त्वांतील संघर्षाची मुख्य मेख इतरत्रच कुठे आहे, असे आहे का? एवढे मात्र खरे की लेसिंगला जॅकचाच मानसिक शक्तिपात (Break down) दाखवण्यात अधिक रस आहे आणि आपल्याला अशा निष्कर्षाला यावे लागते की, राजकीय चळवळीत भाग घ्यायला तो काही काळ असमर्थ होतो हे दाखवण्यासाठी तिला त्याचा शक्तिपात दाखवण्यात रस होता. राजकारणाशिवाय जॅक ओर्नेंच्या व्यक्तिमत्त्वात खास, वैशिष्ट्यपूर्ण काय होते?

लेसिंग आपल्या कादंबरीकेत राजकीय परिस्थितीचे सूक्ष्म तपशील देत नाही किंवा कादंबरीकेतील पात्रांना आंतरराष्ट्रीय घडामोडींवर चर्चा करायला लावत नाही. परंतु ती व्यक्तिगत पातळीवरील वेगवेगळे संघर्ष असे चितारते की ते राजकीय व्हावेत. जॅकला आपल्या भावा-बहिणीबद्दल असमाधान आहे कारण त्यांची राजकीय मते अस्पष्ट आहेत. जॅक आणि त्याचा मुलगा यांच्यातील संघर्ष अशाच सत्त्वाभोवती (Spirit) गुंफला आहे. प्रत्येकाचे आपले असे पक्के दृष्टिकोन आहेत आणि दुसऱ्याला समजून घेण्याची त्यांच्यात कुवतच नाही. इथे 'पिढीतील दुरावा' तर आहेच परंतु तो केवळ दोन पिढ्यांतील संघर्षाशी संबंधित नाही. बापलेकातील बोलाचाली आपल्याला स्पर्शून जाते; कारण मुलाचे वागणे बघताना तो जॅकसारख्या चांगल्या माणसाच्या तर्कशुद्ध आणि सुंदर / चांगल्या (decent) आवाहनाला केवळ वैयक्तिक पातळीवरील प्रतिकार आणि अविश्वासामुळे कसा विरोध करतो ते आपल्या लक्षात येते म्हणून !

'जॅक ओर्नें' या कलाकृतीचा राजकीय कलाकृती म्हणून का विचार करायचा? हा प्रश्न विचारार्थ पुढे मांडून Boyers यांनी 'संपूर्ण कादंबरीकेचे केंद्रवर्ती सूत्र राजकीय असून ते आपल्याला त्याच दिशेने या कलाकृतीचा विचार करायला लावते' असे स्पष्ट केले आहे. ते म्हणतात की, "कादंबरीतील हा अंतर्गत अर्थ आपल्याला दुसरीकडे कुठेही भरकटू देत नाही. जॅकला गाडीत एक तरुण स्त्री भेटते. ह्या प्रसंगातून 'जॅक ही एक राजकीय व्यक्ती आहे आणि आपल्या चळवळी आता दिशाहीन झाल्या आहेत याची त्याला काळजी वाटत आहे' ही माहिती आपल्याला पुरवली जाते. तिच्या प्रकाशातच आपण या कलाकृतीचा विचार करतो. आपल्याला ज्या राजकीय आठवणी, आदर्श, योजना यांची हळूहळू ओळख करून दिली जाते तीच आपल्याला 'जॅकची या सगळ्या गोष्टींशी जी गाठ पडली आहे त्यांच्यापासून त्याचे माघारी फिरणे, निराश होणे, हे दाखवण्यात या घटना नाट्यात्म करण्याचा लेसिंगचा हेतू आहे,' अशी कल्पना करण्यास भाग पाडते. 'जॅकची त्या तरुणीशी गाठ पडणे,' यातून लेसिंगला केवळ वृद्ध होत चाललेल्या माणसाचे तरुणाशी नाते तुटत जाणे एवढेच दाखवायचे नाही. या प्रसंगातून लेखिका राजकीय कल्पनेला मूर्त रूप देते. राजकीय कल्पनांना वातावरणात रूपांतरित करते, त्यांचे साधारणीकरण करते, त्यांना प्राक्कथांच्या रूपात आणते आणि या प्रसंगाकडे पाहाण्याची आपली दृष्टी एकदा तयार झाली की ती पुढच्या वाचनावर परिणाम करते. मग ती आपल्याला जॅक ओर्नेकडे 'मानसशास्त्रीय कादंबरी' म्हणून पाहू देत नाही. प्रमुख पात्राचे अंतर्मन, त्याची गोंधळलेली मन:स्थिती, आपल्याला नेमकेपणाने राजकारणाचा विचार करायला समर्थ करते. लेसिंगची हीच अपेक्षा असते; अखेरीस तिच्या अपेक्षेप्रमाणे आपण अशा निष्कर्षाला येतो की, "जे लोक राजकीय ध्येयांशी आणि आदर्शांशी प्रत्यक्षपणे कमी-अधिक प्रमाणात बांधील असतात त्यांना शेवटी स्वत:च्या बाबतीत आणि ज्यांच्या नावे उज्ज्वल भविष्याचा शोध घेण्याचे ठरवलेले आहे त्यांच्या बाबतीत निराश व्हायला सिद्ध व्हावेच लागते."

जॅक ओर्नेची क्रमाक्रमाने, नेटकेपणाने दाखविलेली मानसिक निराश स्थिती हृदयस्पर्शी होते कारण ती इतर कितीतरी मोठ्या प्रवाहांशी संबंधित आहे.

अर्थात कुठल्याही कादंबरीत मूलत: मुद्दे लहान किंवा मोठे नसतात. ज्या पद्धतीने लेखकाने त्यांची योजना केलेली असते त्यावरून ते कमी-अधिक महत्त्वाचे ठरतात, असा कुणी मुद्दा मांडला तर त्या अर्थाने या कलाकृतीला राजकीय म्हणता येणारही नाही.

इथे जॅकचा मानसिक शक्तिपात खरे तर, त्याने दीर्घकाळ जपलेल्या राजकीय आकांक्षा आणि दृष्टिकोनांच्या पडझडीच्या तुलनेत कमी महत्त्वाचा आहे. परंतु या कलाकृतीतील सातत्यभावाविषयी आपण जागरूक असतो. राजकीय परिप्रेक्ष्यात सहभागी न होणारे काही घटक आहेत की काय याकडे आपले लक्ष असते. कुठल्याही कादंबरीत मानसशास्त्रीय, राजकीय, नैतिक अशा विविध घटकांनी एका निश्चित ध्येयासाठी एकजीव व्हावे अशी आपली अपेक्षा असते. ह्या ध्येयाची शब्दांतून अगदी कबुलीच मिळाली पाहिजे असे नाही परंतु कथनात्मक संकेत आणि प्रवाह यांच्या एकजीव होण्याच्या खटपटीत या उद्दिष्टाने अधोरेखित केले पाहिजे. आणि ती कलाकृती जर खरोखर राजकीय कादंबरी असेल तर तिने समाज, सामूहिक कृती आणि सत्तेचे वाटप / विकेंद्रीकरण या घटकांना एकत्र करून आपले ध्येय सूचित केले पाहिजे.

Boyers यांनी 'राजकीय कादंबरी'चे पूर्णपणे नवे प्रारूप विकसित केले आहे असे त्यांच्या विवेचनावरून म्हणता येणार नाही. किंबहुना Howe च्याच काही कल्पना स्वीकारून त्यांचे त्यांनी 'जॅक ओर्ने'चे विश्लेषण करताना उपयोजन केले आहे. मात्र Howe यांच्या 'कुठलीही कादंबरी राजकीय म्हणून वाचता येईल' या लवचिक दृष्टिकोनाला शह देऊन एखादी कलाकृती 'राजकीय' म्हणून वाचण्यासाठी लेखकाने कलाकृतीतूनच वाचकाची तशी मानसिकता तयार करणे आवश्यक आहे हा विचार मांडला आहे.

त्यांनी दुसऱ्या प्रकरणात इतर कादंबऱ्यांच्या तुलनेत राजकीय कादंबरीत 'काळ' व 'अस्तित्व'(Time and Being) या संकल्पना वेगळ्या रीतीने कशा येतात या संबंधीचे केलेले विवेचनही सूक्ष्म आणि मूलगामी आहे. राजकीय कादंबरी 'अस्तित्वा'चा विचार कोणकोणत्या घटकांच्या आधारे करते यासंबंधीचे विवेचनBoyers यांनी काही कादंबऱ्यांची उदाहरणे देत केले आहे. त्या घटकांपैकी 'बदल', 'गैरहजर कारण', 'नीतिविषयक संकेत' आणि 'राजकीय संस्कृती' हे घटक महत्त्वाचे वाटतातBoyers च्या विवेचनाचे सार असे- इतर कुठल्याही कलाकृतीपेक्षा राजकीय कादंबरी 'काळ आणि अस्तित्व' यांच्या संबंधाचा विचार अधिक सखोलपणे करते. इतर कलाकृती वर्तमान परिस्थितीलाच वास्तव मानू शकतात. परंतु राजकीय कलाकृती ही दोन कालांमधील तुलना करण्यात, दोन कालांमध्ये कोणत्या 'कल्पनां'चे हेतू बदलले आहेत, कोणत्या कल्पनांनी बदलायचे नाकारले आहे यांचा विचार करत असते. माणसाची बदल हवा असण्याची इच्छा ही त्याच्या अस्तित्वाविषयीच्या दृष्टिकोनाचे फळ असते किंवा ती म्हणजे त्या दृष्टिकोनाचा परिणाम असतो.

फ्रेडरिक जेम्सनच्या मते माणसाला सुधारण्याची तीव्र इच्छा असते. या इच्छेचे परिणाम म्हणजे बदल करणे, नवा आकार देणे, पूर्वीचे नाहीसे करणे किंवा पूर्वीपेक्षा वेगळे करणे होय. राजकीय कादंबरी 'मानवी जीवन' हे समस्यात्मक मानते. वस्तू, व्यक्ती, संस्था यांची लेखक अशा तऱ्हेने रचना करतो की त्यांत पूर्वीपेक्षा आज बदल घडलेला आहे, त्या पुन्हाही बदलणार आहेत असे वाटावे. या बदलामधूनच तो 'अस्तित्वा'ची एक प्रतिमा उभी करतो.

इतर कादंबऱ्यांमधून एखादी गोष्ट कशी होती किंवा ती कशी आहे याचेच चित्रण असते. अशा कलाकृतींमध्ये विशिष्ट गोष्टी, रूढी, आठवणी यांचे अस्तित्व जिथे गृहीत धरलेले आहे असे घट्ट जग, त्या जगाचा एक भाग असलेली पात्रे आणि कथा यांच्याशीच लेखकाची बांधिलकी असते. अगदी 'कथा' या घटकाला फाटा देणारे आणि वास्तवासंबंधीची स्वतंत्र दृष्टी वेगळ्या प्रकारे मांडणारे कादंबरीकारही याला अपवाद नसतात. राजकीय कादंबरीचा मात्र सामान्य माणसांच्या जगाशी एक तऱ्हेचा करार झालेला असतो. अशा कलाकृतीतील पात्रांना त्यांच्याभोवती जे चाललेले आहे त्याच्याविषयी कधीकधी तिरस्कार वाटतो, कधी ती फक्त भविष्यासाठी जगतात. परंतु ती अगदी आताची, खरीखुरी वाटतात. जगातल्या गोष्टी 'कल्पनां'च्या आधारे कशा चालतात हे दाखवताना या कलाकृतींच्या Being बद्दलच्या, संवेदना विकसित होत असतात. आणि म्हणूनच जगाला धक्का देणाऱ्या सत्ता आणि 'कल्पना' यांच्यातील संबंधाचा ऱ्या शोध घेऊ शकतात.

राजकीय कादंबरीकार माणसांनी गच्चं भरलेल्या या जगात आपल्याला ढकलतो कारण याच जगात किंवा जगाच्या या माध्यमातूनच आपल्याला मुक्ती मिळणार आहे असा त्याचा विश्वास असतो. ज्या लेखकाला या जगाविषयी प्रेम नसते किंवा जगाचे अपूर्णत्व जो सहन करू शकत नाही असा लेखक वर्तमानासंबंधी एखादी काल्पनिक कादंबरी लिहील. ज्याला आपल्या कल्पनेतील जगात आणि वास्तव जगात विसंगती वाटत असेल असा एखादा वादविवादात्मक असे काहीतरी लिहील पण त्याला राजकीय कादंबरी लिहिता येणार नाही. काहींची या वास्तवाला नकार देण्याची सहज प्रवृत्ती असते. काहींना आपले अंतर्विश्व फुलवण्याची ऊर्मी असते; परंतु अशा व्यक्ती राजकीय कादंबरीकडे वळणाऱ्या नसतात.

राजकीय कादंबरीकार विघ्नांचे स्वागत करतो. त्याला कादंबरीत असे जग निर्माण करायचे असते की ज्यात अपयश आहे, परंतु त्यात बदलाचे हेतू आहेत, बदलाचे परिणाम आहेत आणि बदलाच्या शक्यताही आहेत. ह्या जगाचे प्रश्न जाणणे, या जगातले प्रश्न कसे सुटतात ते पाहाणे, सुधारणा करण्याच्या प्रयत्नांना काही शक्ती कशा हट्टीपणे प्रतिकार करत राहातात ते न्याहाळणे यात त्याला रस असतो, त्याचेच प्रतिबिंब राजकीय कादंबरीत पडते.

राजकीय कादंबरीतील Time आणि Being कडे घेऊन जाणारा एक घटक म्हणूनBoyers यांनी 'गैरहजर कारण' (absent cause) ही संकल्पना मांडली आहे व या संकल्पनेचे विस्तृत विवेचनही केले आहे. Absent cause म्हणजे काय? ते खरोखर अस्तित्वात असते का? ते

मानल्याने काय होते? प्रत्येक कलाकृतीत त्याचे अस्तित्व एकाच स्वरूपाचे असते का? असे अनेक प्रश्न उपस्थित करत ते त्याविषयीची कल्पना स्पष्ट करतात.

'अनुभवाला येईल अशा तऱ्हेने हा घटक कुठेच अस्तित्वात नसतो. कादंबरीतील नाते संबंधांची ही अशी व्यवस्था असते की तिचे सर्व बाजूंनी वर्णन करता येणार नाही. परंतु आपण कादंबरी वाचतो त्यावेळी कलाकृतीतील पात्रे जेथे वावरत आहेत अशा वर्तमानकाळाकडे आणि कदाचित आपण त्याला पकडू शकू असे वाटत असलेल्या इतर घटकांपासून अति दूर असणाऱ्या 'गैरहजर कारण' या घटकाकडे आपले एकदमच लक्ष जाते. हे 'गैरहजर कारण' आपल्याला दृश्यमान झालेय असे आपण केव्हा म्हणू शकू? कुठल्या अर्थाने? तर कथानकात, 'आत्ता, 'इथे', जे काही घडतेय त्याचे कारण नेमकेपणाने स्पष्ट करता येत नाही पण तरीही त्याची तिथे गरज आहे हे जाणवते. येथे Boyers यांनी Gunter Grass च्या The Tine Drum मधील एक प्रसंग उद्धृत केला आहे. नाझींची मिरवणूक चालली आहे आणि ऑस्कर जोरजोरात ड्रम वाजवतो. ती मिरवणूक मोडते. ऑस्कर ड्रम का वाजवतो? उघड कारण सांगता येईल, ते म्हणजे ड्रम वाजवायला आवडते. पण येथे 'गैरहजर कारण' जाणवते ते असे, नाझींची मिरवणूक ही त्याला सामूहिक संमोहनाचा प्रकार वाटतो व विध्वंसक हिंसा हे त्याला त्यावरचे उत्तर वाटते. हे उत्तर म्हणजे परिणाम स्पष्ट करणारे कारण ठरते.

आपल्याला असे 'गैरहजर कारणा'चे अस्तित्व मानायला लागते कारण राजकीय कादंबरी एखाद्या गोष्टीविषयीची माहिती कलाकृतीत पूर्णपणे अंतर्भूत करत नाही; अशा वेळी 'गैरहजर कारणा'ची कल्पना आपल्याला या विषयाचे काय ज्ञान असायला हवे याची जाणीव देते. याचा अर्थ असा नाही की, जे मांडायचे आहे ते मांडायला कलाकृतीत शब्द अपुरे पडतात. 'गैरहजर घटक' का मानायचे? याचे स्पष्टीकरण करताना Boyers यांनी पुन्हा दोन संकल्पना मांडल्या आहेत. त्यातील एकीला ते master code असे म्हणतात. यासाठी आपल्याला 'मुख्य संकेत' किंवा 'संकेत' असा शब्द वापरता येईल. आता Boyers यांच्या विवेचनाकडे वळू या.

कादंबरीलेखनासाठी कुठलेही तयार असे संकेत किंवा कथेचे नमुने शुद्ध रूपात उपलब्ध नसतात. ते अत्यंत श्रमपूर्वक निर्माण केलेल्या कथानकाचे आकार असतात. कथानकाच्या विकासाच्या रचना असतात किंवा कथानकातील संघर्षांची उलगडलेली रूपे असतात. राजकीय कादंबरीत असे संकेत आपल्या राजकीय नेणिवेला आवाहन करतात. आपल्यापुढील संहिता कथात्मक कार्य करत असते. ती आपल्याला मानवी वर्तनाची गोष्ट सांगत असते. माणसांचे विचार, त्यांचे हेतू, त्यांची संस्कृती या सर्वांमधून त्यांचे वागणे घडत असते. ही माणसे अमुक एका तऱ्हेने वागतात कारण ती त्याहून वेगळी वागू शकत नाहीत. आपण जेव्हा त्यांच्या वागण्याचे स्पष्टीकरण करायला जातो तेव्हा मुख्य कारणांसाठी दुय्यम कारणे शोधत असतो; आणि आपल्या वाचनासाठी आपल्याला अचूक बैठक मिळाली आहे अशी स्वत:ची समजूत घालत असतो. त्यासाठी आपण अनेक तऱ्हांच्या मूळ कथांचा (Proto-narratives) आणि

मुख्य संकेतांचा आधार घेत असतो; तेही आपल्याला मदत करत असतात. संहितेत जे अनेक तऱ्हेचे संघर्ष चित्रित झालेले असतात त्यांना ते प्रमाणभूत उत्तरे पुरवत असतात. अर्थात आपण काही या मूळ कथानकांचा जाणीवपूर्वक व पद्धतशीर मार्गाने उपयोग करून घेत असतो असे नाही. आपल्या नकळतच हे घडत असते; कारण संकेत आणि कथानक यांची अशी घट्ट वीण तयार झालेली असते की आपल्या मनात काही शंका निर्माण होऊ नयेत.

इतर सामान्य, कौटुंबिक कादंबऱ्यांमधून संकेत आणि कथानक यांचे एकमेकांवर कुरघोडी करणारे नमुने फारसे दिसत नाहीत; कारण तिथे एकेरी कथा असते. 'मनुष्यप्राणी हाच मुळात समस्यात्मक आहे' याची जाणीव अशा कादंबऱ्यांत नसते. राजकीय कादंबरी अटळपणे 'बदला'शी संबंधित असते, तरी ती नेहमीच समस्यात्मक कथा मांडते आणि म्हणूनच कारणांचा, शक्यतांचा आणि आधी लक्षातही येऊ नयेत अशा परिणामांचा ती विचार करायला लावते. यासाठी ती रचनेचे वेगवेगळे नमुने योजत असते. संहितेतील स्पष्टपणे दिसणाऱ्या संघर्षांना हे नमुने कधीही पुरेशी निर्णायक उत्तरे देत नाहीत, परंतु अवघड वाटणाऱ्या समस्यांकडे कसे पाहायचे ते दाखवतात. अनेकदा लेखक-वाचकांनी यापूर्वी नाकारलेले प्रमुख संकेतही अशा कादंबऱ्यांना स्वीकारायला लागतात. उदा. मार्क्सचा **'Providential History'** हा संकेत व हेगेलचा **'Catastrophic Vision of History'** हा संकेत, हे दोन्ही संकेत कितीही नाकारले तरी आपल्या राजकीय नेणिवेत ते कार्यरत आहेतच आणि अनेक महत्त्वाच्या राजकीय कादंबरीकारांनी आपल्या कथात्म रचनांमध्ये ते श्वासोच्छवासाइतके अनिवार्य म्हणून स्वीकारले आहेत.

राजकीय कादंबरीत वाचकाने या मुख्य संकेतांवर पूर्णपणे भार टाकायचा नसतो; परंतु त्यांच्याशी नाते जोडायचे असते. असे करत असताना तो संहितेला योग्य प्रतिसाद देऊ लागतो व त्याला 'गैरहजर कारणा'ची जाणीव होऊ लागते. मात्र आता ते आपल्या हाती आले आहे असे वाटून वाचक त्याची व्याख्या करायला जातो तेव्हा मात्र त्याची फसगत होते. सहजपणे व सातत्याने विकसित होत जाणारी संहिता आणि त्यात छायारूपाने वावरणारा मुख्य संकेत यांच्यातील विसंगतीमधून निर्माण होणारे नवे प्रवाह आपल्या लक्षात येत आहेत, आणि त्यांच्या तेवढ्यापुरत्या स्पष्टीकरणांच्या अपुरेपणावर आपण चर्चा करू शकतो आहोत; व त्यासाठी 'गैरहजर कारण'च आपल्याला उपकारक ठरते आहे. एवढे आपल्याला कळते.

प्रत्येक कलाकृतीनुसार आपली 'गैरहजर कारणा' विषयीची जाणीव बदलती असते. **Bellow** च्या **'The Dean's December'** मध्ये, संहितेत हा घटक कसा जाणवतो याचे विस्तृत विवेचन**Boyers** यांनी केले आहे. या कादंबरीत आल्बर्ट कॉर्ड हा एक पारंपरिक मध्यमवर्गीय मानवतावादी गृहस्थ आहे. शिकागोमधील काळे लोक शिवीगाळ, हिंसाचार या त्यांच्या सवयींमधून बाहेर का पडू शकत नाहीत याचा त्याला शोध घ्यायचा आहे. यासाठी वैज्ञानिक संशोधनाचा टेकू मिळणाऱ्या अनेक सिद्धांतांचा तो विचार करतो आहे. या कादंबरीतील हे मुख्य

पात्र ज्या स्पष्टीकरणविषयक सिद्धांतांच्या प्रेमात पडले आहे ते वाचकांनी स्वीकारावेत असे या कादंबरीला वाटत नाही. वाचकाला निश्चितपणे माहीत असते की, ह्या मागे राजकीय कारणे आहेत. मग आल्बर्ट कॉर्ड या सामाजिक, राजकीय प्रश्नांची उत्तरे विज्ञानात का शोधतो आहे? नेहमीचे राजकीय उपाय करून थकल्यानंतर देखील मोठ्या शहरांमधील परिस्थिती अधिकाधिक विघडतच चालली आहे. उदारमतवाद्यांनी कितीही शिकवून जर ही विचित्र परिस्थिती काही प्रतिसादच द्यायला तयार नसेल तर त्यामागे दुसरेच एखादे निर्विवाद सत्य असले पाहिजे असे मानण्यासाठी आपली दृष्टी तयार केली जाते.

अशा कादंबरीचे एक रचनारूप आपल्यापुढे अशा एका सज्जनाची गोष्ट मांडेल की तो काहीतरी चांगले करण्यासाठी अतिशय प्रयत्न करतो आहे आणि कुणीच त्याची दखल घेत नाहीत. त्याचे प्रयत्न असफल ठरतात आणि आपल्या सद्सद्विवेकबुद्धीला स्मरून तो आपले आपले काम चालू ठेवतो आहे. दुसरे एक अगदी भिन्न रचनारूपही त्यात गवसेल. एक शास्त्रज्ञ वेड लागल्याप्रमाणे अद्याप सिद्ध न झालेले एक प्रमेय सिद्ध करू पाहातोय, त्यासाठी काहीही करण्याची त्याची तयारी आहे. हे करत असताना आपले मुळातील साध्य काय आहे तेच तो विसरून जातो; आणि वर्तमान प्रेरणा जिथे घेऊन जातील तिथेच तो व्यग्र होऊन जातो. अर्थात कॉर्ड काही शास्त्रज्ञ नाही परंतु शहरातल्या काळ्यांच्या प्रश्नाने तो बेचैन झालेला आहे. काळ्या लोकांचे हे सामूहिक अध:पतन त्याला दोन-चार काळ्या व्यक्तींविषयी वाटणारा जिव्हाळा थांबवू शकत नाही. स्पेंग्लरचे 'जग महासंकटाच्या दिशेने झपाट्याने निघाले आहे' हे विधानच हा सिद्धांत आपल्यात सामावून घेते.

आणखीही काही सुसंगत नमुनारूपे इथे दृग्गोचर होतात. Bellow 'गैरहजर कारणा'चा एक ठसा असा निर्माण करतो की गतिमान असलेल्या अनेक प्रश्नांशी त्याची मुलाखत होते. ते कुठले? जिथे या मानवतावाद्याला 'निर्विवाद सत्या'पुढे आपल्या सुंदर भावना फारच अप्रस्तुत आहेत असे वाटावे, अशी एक विशिष्ट 'निकड' निर्माण होते, तिथेच हे 'गैरहजर कारण' असते. कॉर्डच्या संशोधनाच्या प्रयत्नामागे राजकारण कुठे आहे? असा प्रश्न ही कादंबरी पुन्हा पुन्हा उपस्थित करते आणि Bellow एक गोष्ट सुचवतो की, 'राजकारणाला नकार हाही एक राजकीय निर्णयच असतो, व असे काही राजकीय उपाय त्यांच्या मर्यादेत, तरी परंतु अधिक उपकारक ठरतात.' यातूनच Bellow ची मानवी जीवनाविषयीची अत्यंत विकसित जाणीवही व्यक्त होते.

कुठल्याही कादंबरीत 'गैरहजर कारणा'प्रमाणेच 'काळ' आणि 'मानवी अस्तित्व' या संकल्पनांकडे घेऊन जाणारे इतरही काही घटक असतात. उदा. कादंबरीतील पात्रे आणि वातावरण यांच्यातील न्याय्य नाते उभे करण्यासाठी कादंबरीकाराला एक नैतिक बैठक तयार करावी लागते. राजकीय कादंबरीत पात्राचे व्यक्तिगत जीवन आणि राजकीय जीवन यांच्या आंतरसंबंधांतून कादंबरीकाराला अंतिम न्यायाकडे जायचे असते. पात्राचे खाजगी जीवन राजकारणापासून पूर्णत:

भिन्न दाखवणे ही कलाकृतीची एक उणीव ठरते. याचा अर्थ राजकीय कादंबरीने पात्रांचे खाजगी जीवन चितारूच नये असा नाही. परंतु कलाकृतीला जी राजकीय व्यवस्था येऊन भिडलेली आहे तिचे परिणाम या कलाकृतीतील व्यक्तींच्या खाजगी जीवन चित्रणातही दिसले पाहिजे. हे व्यक्तिजीवन चितारण्यातही कादंबरीकाराचे एक तऱ्हेचे नीतिपर आकलन व्यक्त तर असते, शिवाय कादंबरीने 'काळ व अस्तित्व' यातील नाते कसं पेलले आहे हेही वाचकांच्या लक्षात येत असते.

कादंबरीतून येणारा नैतिक विचार हा 'लोकांनी कसे वागावे' या विषयीच्या आदर्शांचे चित्र उभे करत असतो; आणि तसे करणे हे राजकीय कादंबरीचे नेहमीच एक लक्षण झाले आहे. राजकीय कलाकृतीने नेहमीच नैतिक भाष्याची मागणी केली आहे. तसे करणे ही साधी गोष्ट नाही. कारण जी कादंबरी 'बदला'शी निगडित असते तिला कथांतर्गत कृतींच्या चित्रणापेक्षा कुठून तरी, अति दुरून अस्तित्वात नैतिक आज्ञार्थांना अधोरेखित करणे नेहमीच अवघड जाते. ज्याला आपण नैतिक विचार म्हणतो तो एका अर्थी 'पूर्वानुभवाने सिद्ध केलेले शहाणपण' अशा स्वरूपाचा असतो.

राजकीय कादंबरीत ते कसे दाखवलेले असतात? प्रथम आपल्यापुढे काही ठोस घटना किंवा कृती असतात. उदा. दोन भिन्न पक्षांतील किंवा वर्गांतील संघर्ष. कादंबरीतील व्यक्ती त्यातील कुठलीतरी एक बाजू घेतात; कारण एकतर त्या त्याच विचारसरणीत जन्माला आलेल्या असतात किंवा अमुक एका बाजूसाठी त्यांनी झगडावे म्हणून त्यांची कुणीतरी निवड केलेली असते; थोडक्यात, कादंबरीच्या उद्दिष्टाच्या दृष्टीने त्या आपल्या वाट्याला आलेले ओझे वाहात असतात. नीत्शेने नीतीची व्याख्या अशी केली आहे –'**The sedimented or fossilized trace of the concrete praxis of situations of domination**'. तेव्हा राजकीय कादंबरीत अशा ठळक परंपरा दिसत असतात. कादंबरीकार ह्या परंपरांकडून 'नीती'कडे कसा सरकतो आहे ते वाचकाच्या लक्षात येते. त्यामुळे आपल्याला या रूढ परंपरांच्या अश्मिभूत झालेल्या खुणा दिसत नसतात तर परंपरांचे नीतीमध्ये रूपांतर कसे होत चालले आहे ते दिसत असते. अर्थात् रूपांतरातून उदित झालेले नैतिक संकेतही काही सुस्पष्ट नसतात. कदाचित कादंबरीतील पात्रांना कळतही नसते की आपण कसे आणि कुणासाठी नैतिक संकेत स्वीकारत आहोत. आपणही कथेचा विकास न्याहाळण्यात गुंग असतो. जेव्हा आपल्या लक्षात येते की हे नैतिक संकेत कलाकृतीत जे प्रवेश करत आहेत आणि विशिष्ट 'नैतिक आदर्श' म्हणून विकसित होत आहेत ते कादंबरीकाराच्या इच्छेनेच, त्यावेळी 'आशय' आणि 'परंपरा' यातील नाते आपल्याला अधिक चांगल्या रीतीने उमजू लागते.

'राजकीय कादंबरीत 'नैतिक संकेत' इतर घटकांइतके सुस्पष्टपणे हजर नसतात' हा मुद्दा स्पष्ट करण्यासाठी**Boyers** यांनी **Malraux** च्या**Man's Fate** चे येथे उदाहरण दिले आहे. ही कलाकृती दहशतवाद्यांच्या मोहिमांवर आधारित आहे. ही कादंबरी वाचून कदाचित एखाद्या

लहानशा गटाला अशी एखादी दहशतवादी मोहीम आखावीशी वाटेल. अशी मोहीम कदाचित त्याला त्याच्या ध्येयाकडे घेऊन जायला मदत करेलही. स्वत: लेखकाने या कादंबरीलेखनाच्या निमित्ताने अनेक दहशतवाद्यांच्या भेटी घेतल्या तेव्हा त्यांच्यातील 'माणूस' त्याला भेटला. परंतु लेखकाने कादंबरीची रचना अशा पद्धतीने केली की त्यातून नैतिक न्यायाचीच मांडणी व्हावी. एखाद्याने शत्रूला जीवे मारायचे ठरवले असेल तर त्याने तसे करावेही परंतु आपण कोणती कृती करतो आहोत याची स्पष्ट जाणीव त्याला असावी. तसेच आपल्या निर्णयाची जबाबदारी आपली स्वत:ची असते याचीही जाणीव त्याला असावी. अशा नैतिक पूर्वकल्पना कादंबरीतून नक्कीच मांडल्या जातात. कादंबरीतील घटनांमधून असे सुचवले जाते की, अशी नैतिक मूल्ये असतात, अस्तित्वात असतात. ती का अस्तित्वात असतात तेही राजकीय कादंबरी दाखवून देते. इतर कलाकृतींमध्ये काही स्थिर नैतिक आज्ञा एखाद्या ठळक घटनेमधून प्रतिबिंबित होत आहेत असे वाटत असते; अशा 'नैतिक संकेतां'पेक्षा राजकीय कादंबरीतील नैतिक संकेत वेगळे असतात.

पारंपरिक कादंबऱ्यांमधून नैतिक हक्क अशा तऱ्हेने निर्माण झालेले दाखवले जातात की जणू तिथे प्रत्येक चांगल्या आणि तर्कशुद्ध विचार करणाऱ्या माणसाला आपण कोण आहोत याचे ज्ञान असते. तसे राजकीय कादंबरीत नक्कीच घडत नाही. Malraux च्या कादंबरीत कुणीही पात्र 'अमुक गोष्टीतून असे एखादे नैतिक मूल्य आकाराला येते आहे' असे म्हणत नाही. कादंबरीची रचनाच अशी असते की नैतिक मूल्य कथानकाचे सहचर म्हणूनच आकारला येत जाते. एखाद्या विशिष्ट कल्पनेतून किंवा प्रसंगातून ते व्यक्त होत नाही. कथेतच नीतिविचार मुरलेला असतो आणि म्हणून कथेमधून तो वेगळा करताच येत नाही.

याचा अर्थ, एखादे नैतिक प्रमेय मांडले जाणे, हे काही राजकीय कादंबरीचे व्यवच्छेदक लक्षण ठरणार नाही. परंतु राजकीय कादंबरीला एक प्रकाची नैतिक बैठक असते व त्यातून मांडले गेलेले शहाणपण 'मानवी अनुभवाची शाश्वत लक्षणे कोणती असावीत' याविषयीची जाणीव प्रतिबिंबित करते.

राजकीय कादंबरीला जे अनेक पैलू असतात, त्याकडे आपले लक्ष जावे अशी कादंबरीकाराची इच्छा असते.

राजकीय कादंबरीतून जो नीतिविषयक विचार मांडलेला असतो तो एकापरीने सर्वमान्य राजकीय संस्कृती कशी असावी याविषयीचे भान देणारा असतो. सर्वच राजकीय कादंबऱ्या असे भान देतात, असे म्हणता येणार नाही. कारण एकतर अशी सर्वमान्य राजकीय संस्कृती कुठे अस्तित्वातच नसते; तेव्हा ती तशी वर्णन करणे म्हणजे अक्षरश: वेडेपणा आहे असे काहींना वाटत असते. अर्थात् कादंबरीत जे संघर्ष दाखवलेले असतात, जे वादविवाद चित्रित होतात त्यांच्यावरून वाचकांनीच अशा संस्कृतीचा शोध घ्यावा असे राजकीय कादंबरी सुचवीत असते. ज्या आदर्श राजकीय संस्कृतीसाठी आजवर लढाया लढल्या गेल्या ती आज अस्तित्वात नाही,

भविष्यकाळातही ती असणार नाही. ती फक्त ध्येयविषय आहे. ती खरोखरच अस्तित्वात येईल असे कुणाला वाटत नाही. मात्र तिच्यासाठी आत्म्याची सतत धडपड चाललेली आहे.

कदाचित याचमुळे कुठल्याही महत्त्वाच्या राजकीय कादंबरीने, जिचे आकृतिविशेष सूक्ष्म बारकाव्यांनिशी वर्णन करता येतील, अशा आदर्श संस्कृतीची संभाव्यता व्यक्त केलेली नाही; तिच्या काही छटा फक्त रेखाटल्या आहेत.

परंतु ज्यांना अशा शक्यताही दाखवता येत नाहीत, त्या कलाकृती गुदमरल्यासारख्या असतात. त्या फक्त छळणुकीच्या इच्छांचे चित्रण करतात. अशा कादंबऱ्यांतून 'मानवी अस्तित्व' ही केवळ कादंबरीची एक बंदिस्त चौकट असते.

Howe यांनी राजकीय कादंबरीचे जे प्रारूप मांडले आहे त्यापेक्षा Boyers यांचे प्रारूप पूर्णत: भिन्न आहे असे म्हणता येणार नाही. किंबहुना 'राजकारण आणि साहित्य' या विषयावरील मांडणी करताना Howe यांच्या नजरेतून ज्या जागा निसटल्या त्या Boyers यांनी अतिशय चिकित्सक दृष्टीने भरून काढल्या आहेत. त्यांचे 'काळ' व 'मानवी अस्तित्व' यांचे नाते राजकीय कादंबरीतून कसे व्यक्त होते याविषयीचे विवेचन त्यांची 'मानवी अस्तित्वा'कडे पाहाण्याची दृष्टी किती प्रगल्भ आहे याचे भान देते.

---

## तळटीपा

१) सिडने कार्टोन ही चार्लस डिकन्सच्या 'अ टेल ऑफ टू सिटीज' या कादंबरीतील एक व्यक्तिरेखा. ही कादंबरी इ. स. १८५९ मध्ये प्रसिद्ध झालेली आहे. इ. स. १७७५ ते १७९२ पर्यंतचा, फ्रेंच राज्यक्रांतीचा काळ ह्या कादंबरीत चित्रित झाला आहे. कादंबरीतील कथानक प्रामुख्याने लंडन आणि पॅरीसमध्ये घडते.

कथानकाला प्रारंभ इ. स. १७७५ मधील हकिकतीपासून होत असला तरी तत्पूर्वीची फ्रान्समधील दडपशाही डॉ. मॅनेटीच्या रूपाने वाचकांसमोर येते. डॉ. मॅनेटी, चार्लस डार्ने व मॅडम डिफार्जे हे येथील दहशतवादाचे प्रत्यक्ष बळी. डॉ. मॅनेटींची कन्या ल्यूसी हिला मि. लॅरींनी लंडनला आणल्यामुळे ती तारुण्यापर्यंत सुरक्षित जीवन जगली. परंतु तिचे वडील डॉ. मॅनेटी यांनी मॉन्सियरला विरोध केल्यामुळे त्यांचा फ्रान्समध्ये इतका मानसिक, शारीरिक छळ झाला की ते आता मनोरुग्ण बनले आहेत. मोठ्या शर्थीने त्यांची पॅरिसमधून सुटका करून त्यांना लंडनला आणले जाते. कालांतराने ल्यूसीचा लंडनस्थित, उमद्या चार्लस डार्नेशी विवाह होतो. तिला कल्पनाही नाही की तिचा पती मॉन्सियरचा पुतण्या आहे आणि आपल्या घराण्याने चालवलेला जनतेचा छळ त्याला न रुचल्यामुळे तो लंडनला येऊन स्थायिक झाला आहे. इकडे फ्रान्समध्ये सामान्य माणसे एकत्र येऊन दहशतवादाविरुद्ध उभी राहातात. १७८९ मध्ये बॅस्टिलचा

तुरुंग फोडतात आणि आता हे नवे रिपब्लिक जुन्या सत्ताधाऱ्यांना व त्यांच्या अधिकाऱ्यांना तुरुंगात डांबतात, त्यांना क्रूरपणे मारून टाकतात. चार्लसची इस्टेट पॅरिसमध्ये आहे व त्याच्या सारावसुलीचे काम करणारा अधिकारी तुरुंगात डांबला गेला आहे. त्याचे चार्लसला पत्र येते म्हणून चार्लस पॅरिसला जातो अन् तोही तुरुंगात पडतो.

सिडने कार्टोनचा वास्तविक या कुठल्याही घटनांशी काहीही संबंध नाही. तो लंडनमधील एक वकील आहे. अत्यंत पिणारा, बेशिस्त जीवन जगणारा असा. परंतु वृत्तीने तो प्रेमळ आहे. ल्यूसीवर तो एकतर्फी परंतु मन:पूर्वक प्रेम करतो आहे. म्हणून ल्यूसीचा नवरा, चार्लस संकटात सापडला आहे हे कळल्यावर तो पॅरिसला जातो. त्याची निष्ठा कुठल्याही राजकीय प्रणालीशी नाही तर केवळ ल्यूसीवरील प्रेमाशी आहे. आपण बरेचसे चार्लस डार्नेसारखे दिसतो हे जाणवल्यामुळे बरसाड या गुप्तहेराची मदत घेऊन नाट्यमयरीत्या चार्लसची सुटका करतो व स्वत: त्याच्या जागी तुरुंगात जातो. दुसऱ्या दिवशी चार्लसऐवजी त्याला ठार मारले जाते. मृत्यूला सामोरे जाण्याची त्याची ही कृती, शूर कृती (Heroic deed) ठरते. (ल्यूसीवरील प्रेमासाठी अशीच मृत्यू कवटाळणारी दुसरी व्यक्ती म्हणजे मिस् प्रोस). सिडने कार्टोनला या कादंबरीचा नायक म्हणता येणार नाही परंतु अखेरच्या त्याच्या शूर कृतीमुळे 'अ टेल ऑफ टू सिटीज' ही सिडने कार्टोनची गोष्ट असे Howe यांनी म्हटले असावे.

२) कल्पना हा शब्द इंग्रजीतीलidea या शब्दाचा सममूल्यक म्हणून योजला आहे. परंतु तो इंग्रजीतील idea या शब्दांतील सर्व अर्थच्छटा व्यक्त करू शकत नाही. idea हा शब्द प्लेटो, डेकार्ट्स, लॉक, बर्कले अशा अनेक तत्त्ववेत्त्यांनी योजला आहे. प्लेटोच्या म्हणण्याप्रमाणे idea ही बुद्धीने आकलन करता येते. ती 'काला'त अस्तित्वात नसते. ती अस्तित्वात येऊ शकत नाही व अस्तित्वात येण्याची थांबत नाही. मनुष्याच्या मनात उद्भूत झालेले विचार असे त्यांचे स्वरूप असते. डेस्कार्टस्च्या मते शरीरावर परिणाम करणाऱ्या शरीरबाह्य गोष्टींमुळेideas मनुष्याच्या मेंदूवर उमटत असतात. idea साठी form, Shape असे शब्दही वापरले गेले आहेत. idea मध्ये इंद्रिससंवेद्यता तर असतेच परंतु त्यातून इंद्रियसंवदेनेखेरीज एखादी अमूर्त गोष्ट स्वतंत्रपणे दर्शवावयाची असते. बाह्य जगातील घडामोडींचे विश्लेषण करताना व्यक्तिमनावर उमटलेला अमूर्त विचाराचा ठसा असे याचे स्वरूप सांगता येईल.

३) Howe यांनी इंग्रजी कादंबरीवाङ्मयाचा काढलेला हा आलेख आहे. भारतीय व विशेषत: मराठी कादंबरीच्या संदर्भात अर्थातच असा विकासक्रम सांगता येणार नाही. या सर्व प्रवाहांचा परिचय मराठी कादंबरीला एकदमच झाला व १९ व्या शतकातील सामाजिक जीवनातून बीजे उचलून इथली कादंबरी आकाराला येत गेली.

'मराठी कादंबरी'चा विषय बाजूला ठेवला तरी Howe चा इंग्रजी कादंबरीच्या विकासक्रमाविषयीचे विवेचन सर्वच पाश्चात्य समीक्षक, लेखकांना मान्य आहे असे म्हणता

येणार नाही. प्रख्यात कादंबरीकार मिलन कुंदेरा यांच्या The Art of the Novel (Faber and Faber, London, Boston, 1988) या ग्रंथात त्यांनी वेगळा विचार मांडला आहे. इंग्रजी कादंबरी ही आधुनिक युगाला समांतर इतिहास म्हणून उदयाला आली असे त्यांचे मत आहे. त्यामुळे ह्या कादंबरीचा अवकाश त्यांना विलक्षण छोटासा आणि मर्यादित वाटतो. ते डॉन क्विझोट कादंबरीवाङ्मयाचा प्रारंभबिंदू मानताना दिसतात. हायडेगरची 'Being and Time' ची कल्पना चार शतकातील युरोपियन कादंबरीतून प्रत्यक्षात आली आहे, सुव्यक्त झाली आहे. मानवी अस्तित्वाचे वेगवेगळे पैलू आपापल्या परीने या कादंबरीवाङ्मयातून एकामागून एक उलगडले गेले आहेत. Cervantes आणि त्यांच्या समकालीनांनी माणसाच्या धाडसी वृत्तीचा शोध घेतला आहे. रिचर्डसनपासून मानवी मनाची गुपिते उघड करण्याची, भावनांना निरखण्याची सुरुवात झाली. बालझॅकपासून माणसाच्या इतिहासात रुतलेल्या मुळांचा शोध घेतला गेला. फ्लॉबर्टपासून आजवर अज्ञात असलेल्या नित्याच्या भौतिक जीवनालाच स्पर्श केला गेला. टॉलस्टॉयने मानवी वर्तन आणि निर्णय घेणे यात जी अतार्किकता घुसते त्यावर लक्ष केंद्रित केले इ. इ.

त्यांना म्हणायचे आहे की, कादंबरीने आधुनिक युगाच्या प्रारंभापासून माणसाला/मनुष्यत्वाला साथ दिली आहे. 'Passion to know' ही माणसाची वृत्ती सतत कादंबरीतून व्यक्त झाली आहे. युरोपच्या जडणघडणीनेच युरोपियन कादंबरीचा इतिहास घडविला आहे असे निःसंदिग्ध विधान त्यांनी केले आहे.

४) येथे Robert Boyers यांनी E. D. Hirsch यांच्या 'An anticipated sense of the whole' या संकल्पनेचा आधार घेतला आहे. बोलणे आणि समजणे यातील कालदर्शक विशेष नाते यांनी स्पष्ट केले आहे ते असे – बोलत असताना शब्द एकामागून एक क्रमाक्रमाने ऐकणाऱ्याच्या कानावर पडतात. नंतर कानी आलेले शब्द आधीच्या आणि आता नुकत्याच अनुभवलेल्या शब्दांबरोबर आपल्या जाणीवेत हजर राहू शकत नाहीत. अशा वेळी बोलणारा किंवा ऐकणारा त्याच्याकडे असलेल्या साकल्याच्या पूर्वज्ञानाच्या आधारेच नवे शब्द संपूर्णाच्या संदर्भात कार्यरत असलेला भाग म्हणून समजून घेऊ शकतो.

५) Being ला पर्यायी शब्द म्हणून 'अस्तित्व' हा शब्द येथे योजला आहे. परंतु Being मधून 'व्यक्ती', 'व्यक्तीचे जगणे', 'मानवी जीवन', 'मानवी वर्तन', 'सजीव' असे अनेक अर्थ व्यक्त होतात. त्यामुळे पुढील विवेचनात संदर्भानुसार तसतसे प्रतिशब्द योजले आहेत. तर अनेक ठिकाणी कोणताच पर्याय पुरेसा योग्य न वाटल्याने Being हाच शब्द वापरला आहे.

६) Boyers यांनी Necessity असा शब्द योजला आहे. मुख्य पात्राच्या कृतीमागील प्रेरणा सुस्पष्ट तर दिसत नाही परंतु एक तऱ्हेच्या आंतरिक निकडीतून ते पात्र एखादी कृती करते. ही

आंतरिक निकड वाचक समजून घेण्याचा प्रयत्न करतो तेव्हा तेच 'गैरहजर कारण' असल्याचे त्याच्या लक्षात येते असेBoyers सूचित करतात.

---

## प्रचंड आकड्यांच्या कथा

१) प्रख्यात शास्त्रज्ञ आर्किमिडीज यानेThe sand reckoner (वाळूच्या कणांची मोजदाद) या नावाचा प्रवंध लिहिला होता. सिरॅक्यूझच्या राजाला त्याने तो अर्पण केला. सिसलीच्या समुद्र काठावरच्या वाळू कणांची कोणालाही मोजदाद करता येणार नाही असे त्या काळी सांगितले जात होते. ते काम मानवी शक्तीच्या पलीकडचे आहे असा त्या संबंधात युक्तिवाद केला जात असे. आर्किमिडीज याने आपल्या प्रबंधात हा युक्तिवाद खोडून काढला, आणि असे सांगितले की त्याना ते मोजता येतील, इतकेच नव्हे तर याही पुढे जाऊन सांगितले की, जगातल्या सर्व वाळू कणांची मोजदादही त्यांना करता येईल. हे करण्यासाठी त्यानी गणित शास्त्रात एक नवीन पद्धतही तयार केली. त्याने जगातील वाळू कणांची संख्या $१०^{४०}$ एवढी प्रचंड आहे असे अनुमान बांधले होते.

आधुनिक संशोधनाने हिशोब करून, सांगितलेला आकडा, आर्किमिडीजनी सांगितलेल्या आकड्याच्या जवळपास येणारा आहे !

२) पदार्थ विज्ञान शास्त्रात कालमापनासाठी दोन नैसर्गिक अशी परिमाणे वापरतात. त्यापैकी एकाचे नाव हूबल टाईम (Hubble Time). विश्वात जे बदल होतात, त्याचा काळ मापण्यासाठी या परिमाणाचा वापर करतात. दुसऱ्या परिमाणाचे नाव आहे न्यूक्लीअर टाईम. प्रकाश किरणास, प्रोटानच्या आरपार जाण्यास जो वेळ लागतो त्याला न्यूक्लीअर टाईम म्हणतात. या दोन परिमाणात तसा कसलाच संबंध नाही. परंतु या दोन्हीही काळांची तुलना केल्यास त्याचे प्रमाण $१ : १०^{४०}$ असल्याचे आढळते.

३) गुरुत्वाकर्षण आणि इलट्रोमॅग्नेटिझम या दोन पदार्थ विज्ञान शास्त्रातील शाखांचा संबंध असलाच तर तो काकतालीय न्यायाच्या स्वरूपाचा आहे. या दोन्ही विभागात, गणिते करताना एक संरचनात्मक संख्या (structural constant) गृहीत धरावी लागते. ही संख्यादेखील $१०^{४०}$ एवढीच आहे.

४) अणुशास्त्र आणि या विश्वाची अगदी सुरुवातीची औष्णिक परिस्थितीचा (The rm modynamics) अभ्यास या दोन अगदी बंदिस्त व भिन्न अशा ज्ञान शाखा आहेत. परंतु या शास्त्राच्या अभ्यासातून जी संख्याशास्त्रीय संख्या निर्माण होते तीही $१०^{४०}$च असते.

५) प्रचंड आकड्यांच्या कथात, असे योगायोग कितीतरी आहेत. या योगायोगांची संख्याही इतकी प्रचंड आहे की, नोबेल पारितोषिक विजेते पॉल डिरॅक यांनी १९३८ साली त्या संबंधात भाषण करताना म्हटले की, "निसर्गात काही सखोल असे संबंध असल्याकारणाने हे अशा प्रकारचे योगायोग आढळतात, असे आपणास गृहीत धरता येईल."

---



अनुक्रमणिका

# राज्यशास्त्र व राजकारण

## उदारमतवादाचा शेवट

**- इमॅन्यूएल वॉलरस्टीन**

विद्यमान इतिहासात १९८९ – ९१ ही इतिहासाला कलाटणी देणारी, महत्त्वाची व निर्णायक अशी तीन वर्षे. या विधानाशी जवळ जवळ प्रत्येकजण सहमत होईल. पण कलाटणी मिळाली ती नेमकी कशाला? नेमकी केव्हापासून? हे प्रश्न उपस्थित होतात याचे कारण या छोट्या कालखंडात अनेक महत्त्वाच्या घडामोडी झाल्या. १९८९ साल हे पूर्व युरोपमधील तथाकथित कम्युनिस्ट राजवटी जमीनदोस्त होण्याचे वर्ष. १९९१ साली सोव्हियट युनियन हा देश इतिहासजमा झाला. पर्शियन गल्फ वॉर (खाडी–युद्ध) या नावाने ओळखल्या जाणाऱ्या युद्धाचा कालखंडही याच तीन वर्षातला.

इ. स. १९९१ साली सर्व जगातून कम्युनिस्ट राजवटींचा शेवट होणे, आणि 'खाडी–युद्ध' या दोन घटनात, तसा संबंध दिसत नसला, तरी त्या दोन घटनात फार घनिष्ट संबंध आहे. असे असले तरी त्या दोन्ही घटनांची प्रकृती अगदी स्पष्टपणे वेगळी आहे हेही लक्षात ठेवले पाहिजे. कम्युनिस्ट राजवटींचा अंत हा एका (पहिल्या) पर्वाचा शेवट, याउलट खाडी–युद्ध हा दुसऱ्या एका पर्वाचा आरंभ झाल्याचे दर्शविते. एक पर्व आपला प्रभाव आवरता घेत आहे, तर दुसरे आपला प्रभाव पडण्यास सुरुवात झाल्याचे दर्शविते. पहिल्या पर्वाची अखेर झाल्याकारणाने त्याचे पुनर्मूल्यांकन करण्याची आवश्यकता निर्माण झालेली आहे. दुसऱ्या पर्वास आताच कोठे सुरुवात होत असल्याकारणाने त्याचेही मूल्यांकन करणे जरुरीचे आहे. ज्या पहिल्या पर्वाचा शेवट होत आहे, त्या पर्वाच्या सुरुवातीच्या काळात अनेक आशा निर्माण झाल्या होत्या. त्या आशांनी आपल्याला कसे चकविले याचा इतिहास म्हणजे त्या पर्वाचा इतिहास. आपल्या मनात अनेक प्रकारच्या गोष्टींबद्दल भीती असते. त्या सर्वांचाच आविष्कार आजवर तरी झालेला नाही, ही भीती आहे. हे नुकतेच आरंभ झालेले पर्व त्या भीतीचे कथानक सांगणार आहे.

प्रख्यात इतिहासकार व समाजशास्त्रज्ञ ब्रोडेल यांनी आपणास एका गोष्टीचे वारंवार स्मरण दिलेले आहे. त्यांच्या मते घटना या मातीसमान ( events are dust ) . अगदी महान घटनासुद्धा. एका परिकल्पनांच्या लयीत त्या घटना समाविष्ट केल्याशिवाय आपणास त्या घटनांचा अन्वयार्थ लावता येणार नाही. तसेच फार मोठ्या काळखंडात ज्या प्रवृत्ती प्रकट होतात, त्या प्रवृत्तींच्या अनुषंगाने त्या घटनांचा अर्थ स्पष्ट होत असतो. या दोन्ही गोष्टी विचारात घेतल्या नाहीत, तर एखाद्या विशिष्ट कालखंडात घडलेल्या घटनांपासून आपणास काहीच अर्थबोध प्राप्त होणार

नाही. परंतु हे बोलणे व लिहिणे सोपे आहे. त्यानुसार प्रत्यक्ष कृती करणे फारच कठीण ! त्याचे कारण असे आहे की एकदा आपण ती लय व त्या प्रवृत्ती यांच्या चौकटीत घटनांची तपासणी करावयाचे ठरविले, की त्याबरोबरच आपणास आणखीही काही गोष्टी करणे भाग पडते. प्रथम त्या परिकल्पना नेमक्या कोठच्या हे निश्चित करावे लागते. तसेच कोणत्या संरचना व चौकटी या प्रस्तुत आहेत हेही निश्चित करणे अगत्याचे होते.

कम्युनिस्ट राजवटींचा अंत या घटनेपासूनच आपण सुरुवात करू या. मी या घटनेस एका पर्वाचा शेवट असे म्हटले आहे. आता प्रश्न असा उपस्थित होईल की नेमक्या कोठच्या पर्वाचा शेवट? १९४९-१९८९ हा दुसऱ्या महायुद्धोत्तर कालखंडाचा शेवट म्हणजे हे पर्व का? १९१७-१९८९ या कालखंडातील कम्युनिस्ट राजवटींचा कालखंड म्हणजे हे पर्व का? फ्रेंच राज्यक्रांतीपासून सुरुवात झालेला, १७८९ ते १९८९ हा कालखंड हा फ्रेंच राज्यक्रांतीच्या पर्वाचा शेवट का? इ. स. १४५० साली आधुनिक जागतिक राज्यपद्धतीस सुरुवात होऊन, नंतरच्या काळात ती वर्धिष्णू होती. इ. स. १४०० ते १९८९ या कालखंडात त्या वर्धिष्णू होत असलेल्या जागतिक राज्यपद्धतीचा हा अंत आहे असे समजायचे का? कम्युनिस्ट राजवटींचा अंत होऊन एका पर्वाचा शेवट झाला असे मी म्हणतो; तेव्हा त्यात वर उल्लेखिलेल्या सर्व गोष्टींचा अंतर्भाव असतो. या पर्वाचा अन्वयार्थ वर उल्लेखिलेल्या प्रत्येक घटनासमूहांच्या अनुषंगाने करता येईल.

काही काळ १४००-१९८९ हा कालखंड आपण बाजूस ठेवू या. आपण या 'पर्वाचे' विश्लेषण १७८९-१९८९ या कालखंडाला नजरेसमोर ठेवून, त्यांच्या अनुषंगाने करू या. या कालखंडात १८४८ साली घडलेल्या युरोपीय क्रांत्या आणि त्याच क्रांतीकारी मार्गाने पुढे गेल्यानंतर १९६८ साली युरोपमध्ये घडलेल्या घटना, हे दोन्हीही घटनासमूह समाविष्ट आहेत. या ठिकाणी एका मुद्याची खास करून जरूर नोंद घेतली पाहिजे. १९१७ सालची रशियन राज्यक्रांती, १८४८ ते १९६८ या घटना क्रमांचा विचार करताना जमेस धरलेली नाही. आपणास या कालखंडाची प्रकृती काय असे कोणी विचारल्यास त्याचे उत्तर आपणास काय देता येईल? औद्योगिक क्रांती ही या कालखंडाची प्रकृती होती का? बुर्झ्वा क्रांती (?) ही त्याची प्रकृती होती का? युरोपच्या राजकीय जीवनाचे लोकशाहीकरण ही त्याची प्रकृती होती का? 'आधुनिकीकरण' ही त्याची प्रकृती होती का? ही सर्वच भाष्ये सर्वांनाच आता चांगलीच परिचित आहेत. तसेच ती सर्वच भाष्ये त्यामानाने चांगलीच संयुक्तिक आहेत.

१४९० ते १९८९ या कालखंडात ज्या घटना घडल्या त्याची जी वेगवेगळी संविधाने आहेत, त्यांचा उल्लेख मी वरील परिच्छेदात केला आहे. त्या संविधानांची मांडणी थोडी वेगळ्या प्रकारे केली तर त्यात कदाचित अधिक नेमकेपणा येईल. आपण १७८९ ते १९८९ या कालखंडाचे वर्णन 'उदारमतवादी' तत्त्वप्रणालीचा विजय व तिच्या प्रभुत्वाचे पर्व असे केल्यास, त्यात काही निष्कर्ष अनस्यूत आहेत असे आढळून येईल. १९८९ हे तथाकथित कम्युनिस्ट

राजवटींचा अंत झाल्याचे वर्ष. ते वर्ष वस्तुत: 'उदारमतवादाची' एक तत्त्वप्रणाली स्वरूपात इतिश्री झाल्याचे वर्ष आहे. अनुस्यूत असलेल्यां निष्कर्षांपैकी हा एक निष्कर्ष. हे विधान सकृत्‌दर्शनी अर्थातच कोणालाही संयुक्तिक वाटणार नाही. सर्वांच्या मते, हे संतापजनक असेच विधान ठरेल. हा संताप येण्यामागेही तशीच कारणे आहेत. एकतर विद्यमान जगात खुल्या बाजारपेठेचे तत्त्व आता शास्त्रपूत ठरले आहे. ('उदारमतवादी' तत्त्वप्रणालीतले हे एक महान तत्त्व). दोन, मानवी हक्कांचे महत्त्वही सर्वांना मान्य झाले आहे. (उदारमतवादी तत्त्वप्रणालीतील हे आणखी एक महत्त्वाचे तत्त्व). या 'अशा वास्तव' जागतिक पार्श्वभूमीवर उदारमतवाद एक तत्त्वप्रणाली म्हणून निकालात निघालेला आहे, हे मान्य करणे म्हणजे, बुद्धी, तर्क व अनुभव या सर्वांनाच रजा देण्यासारखे आहे. हे वरवर पाहाता अगदी बरोबर आहे. परंतु मी जो युक्तिवाद व प्रतिपादन करणार आहे, तो समजावून घेण्यासाठी आपणास आरंभापासूनच सुरुवात करावी लागेल !

१७८९ साली फ्रान्स या देशात प्रचंड राजकीय उलथापालथ झाली. तिला आपण फ्रेंच राज्यक्रांती हे नाव दिलेले आहे. एक राजकीय घटना या स्वरूपात ही राज्यक्रांती अनेक अवस्थांतून गेली. राज्यक्रांती झाल्यानंतर सुरुवातीच्या काळात राज्यकर्त्यांना आपण नेमके काय करणार आहोत याविषयी त्यांच्या मनात गोंधळ होता. म्हणूनच या राज्यकर्त्यांच्या वागण्यात व धोरणात एक प्रकारची अनिश्चितता होती. त्यानंतर जॅकोबिन नावाने ओळखल्या जाणाऱ्या गटाच्या हातात सत्ता आली. या अवस्थेनंतरच्या काळात डिरेक्टरी नावाने ओळखली जाणारी व फारच अल्पकाळ टिकलेली राजवट आली. या अवस्थेनंतर सरतेशेवटी नेपोलियन बादशहाचे राज्य आले. नेपोलियन बादशहाला पदच्युत केल्यानंतरही "नेपोलियन बादशहाची" राजवट एका अर्थाने चालूच राहिली होती असा युक्तिवाद आपणास करता येईल. उदा. फ्रान्समध्ये झालेली १८३० सालची क्रांती, त्या मागून १८४८ ची राजकीय उलथापालथ आणि सरतेशेवटी १८७० च्या घडामोडी. ही घटनामालिका थेट दुसऱ्या महायुद्धात फ्रान्सवर झालेल्या जर्मन राजवटीचा प्रतिकार करण्यासाठी निर्माण झालेली रेझिस्टन्स ही गुप्त संघटना व चळवळ येथपर्यंत नेऊन भिडवता येईल. या सर्व कालखंडात व त्यात झालेल्या चळवळीत, संघर्षात, स्वातंत्र्य, समता, बंधुत्व हीच घोषवाक्ये होती. आधुनिक जगाच्या उभारणीसाठी दिलेली ती निर्णायक महत्त्वाची अशी हाळी होती. परंतु प्रत्यक्षात घडले वेगळेच. या सर्व गदारोळातून बाहेर आलेले आधुनिक जग हे ज्यात अजिबात स्पष्टता नाही असे कमालीच्या गोंधळाचे जग ठरले.

फ्रान्स हा देश फक्त विचारात घेऊन, फ्रेंच राज्यक्रांतीचा ताळेबंद मांडला तर तोही सरळसोट नाही. त्यात अनेक चढउतार आहेत हे आपल्या लक्षात येईल. फ्रेंच राज्यक्रांतीने, फ्रेंच जीवनात अनेक प्रकारचे बदल झाले. त्यातले काही बदल खरे व अस्सल होते. ते बदल फ्रेंच समाजात स्थिरावले. ते बदल झाल्याकारणाने पूर्वस्थिती कधीही परत आली नाही. परंतु काही बदल असे होते की, त्यामुळे फ्रेंच समाजात आमूलाग्र असा बदल झाला आहे असे वरवर पाहाता वाटावे. तथापि प्रत्यक्षात त्या समाजात काहीही सामाजिक बदल झालेला नव्हता. पुराण्या राजवटी



अनुक्रमणिका

( Ancient Regime ) पासून चालत आलेली अनेक धोरणे व समाजातंर्गत संरचना तशाच पुढे चालू राहिल्या.बदललेल्या परिस्थितीतही पूर्वीच्या धोरणातील सातत्य, क्रांतीकारी प्रक्रियांच्या द्वारे कार्यवाहीत येण्याचे चालूच राहिले होते. प्रख्यात लेखक टॉकव्हील, यांनी आपल्या लेखनातून, हे अनेक वर्षापूर्वी फारच स्पष्टपणे दाखवून दिलेले आहे. फ्रेंच राज्यक्रांतीनंतरही हे सारे घडले हे जरी खरे असले तर काही बाबतीत, या क्रांतीनंतरच्या फ्रेंच समाजाने क्रांतीपूर्व समाजव्यवस्थेपासून निर्णायकपणे फारकत घेतलेली होती, फ्रेंच समाजाच्या त्यावेळी चिरफळ्या झाल्या होत्या. ते काहीही असो. फ्रेंच राज्यक्रांतीच्या ताळेबंदाविषयी प्रस्तुत विवेचनात आपल्याला कर्तव्य नाही. त्या क्रांतीची द्विशताब्दी नुकतीच साजरी होऊनही गेली. म्हणूनच देशभक्तीने बोलण्याचा, तीच ती गुळगुळीत झालेली वाक्ये, संकल्पना, वापरण्याचा काळ मागे पडलेला आहे.

या आधुनिक जगाची एक विशिष्ट राज्यपद्धती व समाजरचना आहे. या दोन्हीवर फ्रेंच राज्यक्रांतीचा काय परिणाम झाला याचा विचार या विवेचनात प्रस्तुत आहे. फ्रेंच राज्यक्रांती संबंधातली सर्व प्रकारची माहिती व तिचा अन्वयार्थ लक्षात घेऊन त्या दोन्ही गोष्टींवर त्या क्रांतीचा काय व किती प्रभाव पडला याविषयी विचार करण्याची माझी इच्छा आहे. फ्रेंच राज्यक्रांतीने युरोपीय नागरिकांच्या मानसिकतेत बदल घडवून आणला. आधुनिकतेची तिने युरोपमध्ये स्थापना केली. आता 'आधुनिकता' हा या विद्यमान जगाचा युगधर्म झालेला आहे. 'आधुनिकता' हा शब्द एका विशिष्ट समाजशास्त्रीय अर्थाने वापरतात. आधुनिकता म्हणजे जे नवे ते सारे चांगले असले पाहिले हा त्या शब्दाचा अर्थ याठिकाणी अभिप्रेत आहे. याचे कारण आपण सर्वजण, आपल्या अस्तित्वाच्या हरएक पातळीवर, प्रगतीच्या जगतात आपले जीवन व्यतीत करीत असतो. आधुनिकता या शब्दाला विषेशकरून राजकीय जीवनात अर्थ प्राप्त झालेला आहे. सामाजिक बदल ही इत:पर असाधारण ( abnormal ) गोष्ट नाही. ती आता तशी सर्वसाधारण ( normal ) गोष्ट झालेली आहे. थोडक्यात समाजात होणारे बदल हे क्षणभंगुर असतात हे मान्य झाले आहे. भांडवलशाही अर्थव्यवस्थेच्या संरचनेत एक समाजप्रकृती व मूल्यपद्धती अनुस्यूत आहे. या दोन्हींचा प्रसार सार्वत्रिक झाला आहे. इतका सार्वत्रिक झाला आहे की ही प्रकृती आणि मूल्यपद्धती या दोघांबरोबर व्यवहार करावा लागतो, म्हणून अनेकजण अस्वस्थ होतात. पण अशा व्यक्तींनाही ही समाजप्रकृती व मूल्यपद्धती यांचा सार्वत्रिक प्रसार झाला असल्याकारणाने जाहीर चर्चेच्या प्रसंगी त्या विचारात घ्याव्याच लागतात.

विद्यमान जगातील राजकीय जीवनात सामाजिक बदल ही एक सर्वसाधारण (normality) गोष्ट आहे हे मान्य झाल्याचा उल्लेख वर आलाच आहे. प्रश्न असा आहे की या बदलासंबंधी आपण काय करणार आहोत? हा प्रश्न उपस्थित होण्याचे एक कारण आहे. ते कारण म्हणजे जे कोणी सत्तास्थानावर असतात, ज्यांच्या हाती सत्ता असते, ते सर्वजण सत्तात्याग करावयास नाखूष असतात. सर्वसाधारण सामाजिक बदल कशा प्रकारे हाताळावा या संबंधात अनेक



अनुक्रमणिका

दृष्टिकोन आहेत. आपण ज्यास आधुनिक जगाच्या तत्त्वप्रणाली (idealogies ) म्हणून संबोधतो, त्या तत्त्वप्रणालीत त्या प्रश्नांचे उत्तर अनुस्यूत आहे. सनातन तत्त्वप्रणालीने (Conservatism ) या जगाच्या राजकीय मंचावर प्रथम प्रवेश केला. समाजात बदल होतच असतो, हे या तत्त्वप्रणालीस मान्य आहे. पण याचा संभाव्य व अपेक्षित वेग कमी कसा करता येईल, हा बदल दीर्घकाळपर्यंत रोखून कसा धरता येईल, आणि बदल झालाच तर त्याची व्याप्ती कमीत कमी कशी करता येईल या सर्वांसाठी ही तत्त्वप्रणाली व दृष्टिकोन प्रयत्नशील असतो. या ठिकाणी एका मुद्याची नोंद सर्वांनीच घ्यावयास हवी. सनातन तत्त्वप्रणालीच्या कोणत्याही गंभीर प्रकृतीच्या भाष्यकाराने, समाज अजिबात बदलत नाही असे कधीही सुचविलेले नाही. नोंद घेतली पाहिजे असे म्हटले याचे एक कारण आहे, ते म्हणजे फ्रेंच राज्यक्रांतीचा परिणाम होऊन आधुनिकता आली व तिच्याबरोबर सामाजिक बदल, ही सर्वसाधारण गोष्ट आहे असे मानले जाऊ जागले. पण ही अवस्था येण्याअगोदरच्या काळात, सामाजिक बदल शक्य नव्हते, असे सनातन तत्त्वप्रणालीच्या भाष्यकारांनी अगदी ठोसपणे सांगितले होते.

सनातन-तत्त्वप्रणाली संबंधात अशी सामाजिक प्रतिक्रिया होणे क्रमप्राप्तच होते. उदारमतवाद (Liberalism ) हे ती प्रतिक्रिया व्यक्त करणाऱ्या तत्त्वप्रणालीचे नाव. या तत्त्वप्रणालीनुसार, जुन्या राजवटीत (Ancient Regime ) या समाजव्यवस्थेबरोबर झालेली फारकत, ही निर्णायक व कायम स्वरूपाची होती. समाजात ज्यांचे वर्णन अवैध व अशिष्टसंमत (illegitimate ) हक्क असे करतात, त्यांचे पर्व संपले होते, असा त्या तत्त्वप्रणालीचा दावा होता. उदारमतवादी तत्त्वप्रणालीत जो राजकीय कार्यक्रम अनुस्यूत होता, त्या कार्यक्रमानुसार परिपूर्णतेस पोचलेल्या आधुनिक जगाची निर्मिती होणार होती. हे उद्दिष्ट मान्य करून घेण्यासाठी सामाजिक संस्थात आणखी 'सुधारणा' करण्याच्या मार्गाचा अवलंब करण्यात येणार होता.

जगाच्या मंचावर 'समाजवाद' या तत्त्वप्रणालीने सर्वात शेवटी प्रवेश केला. उदारमतवादी तत्त्वप्रणालीचा अविभाज्य असा भाग असलेली व्यक्तित्ववादी (Individualistic) गृहीते, समाजवादाने त्याज्य ठरविली होती. परंपरा व रूढी यांच्या बंधनातून व्यक्ती मुक्त झाली म्हणजे मग सामाजिक सुसंवाद आपोआप प्रस्थापित होणार नाही, या मुद्यावर समाजवादी तत्त्वप्रणालीने अगदी ठोसपणे भर दिला होता. या उलट सामाजिक सुसंवादाची उभारणी ही समाजाने करावयाची असते असे काही समाजवाद्यांचे सांगणे होते. दुसरे काही समाजवादी वेगळा विचार करीत असत. त्यांच्यामते तोवर झाला होता त्यापेक्षा 'इतिहासाचा विकास' अधिक झाल्यानंतर, आणि एका महान सामाजिक लढाईनंतरच – या लढाईचे नाव आहे क्रांती – सामाजिक सुसंवादाची उभारणी करता येईल. इ. स. १८४८ सालोपर्यंत या तिन्हीही तत्त्वप्रणाली चांगल्याच सुस्थापित झाल्या होत्या. एकोणिसाव्या आणि विसाव्या शतकातही एकमेकांविरुद्ध प्रचंड शाब्दिक लढाया या तिन्हीही तत्त्वप्रणाली खेळत असत. प्रत्येक युरोपीय राष्ट्रात राजकीय पक्ष निर्माण झाले होते. या वेगवेगळ्या तत्त्वप्रणालींचे प्रतिबिंब आपल्या व्यवहारात व विचारसरणीत पडलेले आहे, असा

बहाणा ते पक्ष मोठ्या दिमाखाने करीत असत. गंमत अशी आहे की यातल्या एकाही तत्त्वप्रणालीची वादातीत अशी संहिता, कधीहीं उपलब्ध झाली नाही. तसेच या तत्त्वप्रणालींच्या सीमारेषा व त्या नेमक्या एकमेकांपासून कोठे अलग होत होत्या याबद्दलही प्रचंड गोंधळ होता. संहिता उपलबध नसणे आणि सीमारेषा स्पष्ट नसणे हे दोन्ही मुद्दे आता सर्वमान्य झालेले आहेत. असे असले तरी विद्वत्जगत आणि आमजनता या दोन्हीही क्षेत्रात होत असलेल्या वादविवादात व चर्चेत एक गोष्ट सर्वसामान्यपणे मान्य करण्यात आलेली आहे. ती म्हणजे या सर्व तत्त्वप्रणाली अजूनही विद्यमान आहेत. आणि त्या वेगवेगळ्या सामाजिक 'सुरांचे' आणि प्रवृत्तींचे प्रतिनिधीत्व करतात. या तीन 'सुरांचे व प्रवृत्तींचे वर्णन पुढीलप्रमाणे करता येईल. एक – सामाजिक बदल ही सर्वसाधारण घटना आहे हे गृहीत धरून, त्यानुसार होणाऱ्या राजकीय हालचाली व डावपेच. दोन – सावधगिरी, शहाणपणा आणि धोरणी वागणूक याच्या अनुषंगाने होणारे राजकारण. तीन – बुद्धिवादाला धरून असलेल्या सामाजिक सुधारणा अमलात आणणे, आणि गतिमान असे सामाजिक परिवर्तन ही उद्दिष्टे समोर ठेवून होणारे राजकारण. काहीवेळा आपण या तीन प्रवृत्तींचे वर्णन उजवे, मध्यममार्गी आणि डावे असेही करतो.

इ. स. १८४८ सालानंतरच्या कालखंडाचा विचार करता, या तीन्हीही तत्त्वप्रणालींसंबंधी तीन महत्त्वाच्या गोष्टींची नोंद घेणे आवश्यक आहे. मी या ठिकाणी 'इ. स. १८४८ सालानंतर' हा शब्दप्रयोग हेतुपुरस्सर करीत आहे. इ. स. १८४८ साली जागतिक (युरोप) क्रांतीचे अनेक विषय होते. एकतर राजकारणातील एक मान्यवर घटक म्हणून जाणीवपूर्वक प्रथमच निर्माण झालेली कामगार चळवळ जागतिक राजकीय मंचावर अवतीर्ण झाली होती. या चळवळीला जोड मिळाली होती ती जनतेच्या उत्साहाची (spring time of the peoples ). या जागतिक क्रांतीने, त्यानंतर येणाऱ्या दीडशे वर्षांचे राजकीय वेळापत्रक नक्की केले होते. इ. स. १८४८ सालातील सर्वच राजकीय क्रांत्या अयशस्वी झाल्या होत्या. परंतु त्यामुळे एक गोष्ट अगदी स्पष्टपणे प्रस्थापित झाली. ती म्हणजे गतिमानतेचे सामाजिक परिवर्तन व्हावे, अशी ज्या व्यक्तींची इच्छा व ध्येय होते, त्यांना अभिप्रेत असलेल्या वेगाने सामाजिक परिवर्तन होणार नव्हते. त्याचबरोबर 'सावध व शहाण्या' विचारवंतांनी आशा केली होती, तितक्या संथपणेही ते होणार नव्हते. थोडक्यात सनातन–तत्त्वप्रणाली आणि डावे यांचा पराभव झालेला होता. त्याकाळी संभाव्य असा एकच अंदाज बांधता आला असता. येथे एक मुद्याची नोंद घेतली पाहिजे ती ही की तो 'अंदाज' होता; त्यांची ती इच्छा नव्हती व ते उद्दिष्टही नव्हते. त्या शक्य कोटीतील संभाव्य अंदाजानुसार बुद्धिवादाला धरून असलेल्या समाजातील सुधारणा सातत्याने कार्यवाहीत आणण्याचा प्रयत्न करणे, एवढा एकच मार्ग उपलब्ध होता. एकंदर जागतिक अर्थव्यवस्थेला गाभा म्हणून समजल्या जाणाऱ्या विभागात, उदारमतवादाचे केंद्र तयार झाले व ते विजयीही झाले.

परंतु राजकीय पक्ष, वर्ग व व्यक्ती यापैकी कोण या सर्व सुधारणा प्रत्यक्ष कार्यवाहीत

आणणार होता? त्याकाळी घडत असलेल्या सामाजिक, राजकीय आणि आर्थिक उलथापालथीत, खटकणारा व विचूक ठरणारा असा तो विचार होता. उजवे, मध्यमवर्गीय व डावे या तिन्हीही मतप्रणालीत अनेक विसंगत विचार दिसून आले. पण वर उल्लेखिलेल्या विचाराला अर्थातच अग्रक्रम आहे. इ. स. १७८९ ते १८४८ या वर्षांच्या दरम्यान, या तिन्हीही तत्त्वप्रणालींना चांगलाच बहर आला. तसेच या कालखंडात या तीन्हीही तत्त्वप्रणालींनी समाजातले आपले स्थान व राजकीय भूमिका या दोन्ही गोष्टी पक्क्या केल्या होत्या. समाज आणि राज्य यात संघर्ष आलाच, तर या तीन्हीही तत्त्वप्रणाली 'राज्य' या संस्थेच्या व संघटनेच्या विरोधात अगदी ठामपणे उभ्या होत्या. 'राज्य' या संघटनेने तोवर, तत्कालीन, राजकीय विचारसरणीत मध्यवर्ती स्थान प्राप्त करून घेतले होते. फ्रेंच राज्यक्रांतीचा तो एक परिणाम होता. फ्रेंच राज्यक्रांतीमुळे 'राज्य' या संघटनेला ते स्थान प्राप्त झाले. या तीन्हीही तत्त्वप्रणालींनी 'राज्य' या संघटनेसंबंधी आपली राजकीय भूमिका ठाम केली होती. याचे कारण 'राज्य' या संघटनेला त्या काळी समाजात असलेले मध्यवर्ती स्थान. सनातन तत्त्वप्रणालीच्या (उजवे) पुरस्कर्त्यांनी फ्रेंच राज्यक्रांतीचा निषेध केला होता. हा निषेध तारस्वरात नोंदविण्याचे ते एक विशेष कारण होते. कुटुंब, परिवार, समूह, चर्च, 'राजा' इत्यादी संस्था व संरजामशाही या साऱ्या गोष्टी आहेत. हे मुलभूत घटक व इतर सामाजिक संस्था उद्‌ध्वस्त करण्यासाठी आणि त्यांचा प्रभाव नाहीसा व्हावा यासाठी 'राज्य' या संघटनेचा वापर करण्याचा प्रयत्न फ्रेंच राज्यक्रांतीनंतर आलेली राजवट करणार होती, असे फ्रेंचांचे म्हणणे होते. ते फ्रेंच राज्यक्रांतीविरुद्ध जो निषेध नोंदवीत होते, त्यामागचे हे प्रमुख कारण. फ्रेंच राज्यक्रांतीसंबंधी उदारमतवाद्यांची वेगळीच भूमिका होती. त्यांच्यामते 'राज्य' ही संघटना, ही अशी एक सामाजिक रचना होती की तिच्यामुळे प्रत्येक व्यक्तीला आपल्या मनात येईल त्यानुसार वागण्यास प्रतिबंध होणार होता. उदारमतवादी तत्त्वप्रणालीच्या *तत्वानुसार* व्यक्ती हा समाजाचा अगदी मूलभूत असा घटक होता. या घटकाच्या स्वातंत्र्याला 'राज्य' ही संघटना विरोधी होती. उदारमतवादी तत्त्वप्रणालीत प्रख्यात लेखक व समाजशास्त्रज्ञ जेरमी बेथाम यांचा समावेश आहे. या विचारवंताने 'आनंद व दु:ख' यांचे गणित बसविले होते. या गणितानुसार, हरएक व्यक्ती आपल्याला योग्य वाटेल त्या मार्गाचा अवलंब करून आपल्या स्वत:च्या हितसंबंधांचे संरक्षण करते आणि त्यांचा पाठपुरावा करते. व्यक्तीचा तो हक्कच आहे असे उदारमतवाद्यांचे सांगणे होते. फ्रेंच राज्यक्रांतीनंतर येणारी राजवट 'व्यक्ती' या मूलभूत घटकाला, आपला स्वत:चा अभ्युदय करण्यासाठी, स्वत:ला योग्य वाटेल ती कारवाई करू देण्यास विरोध करणार असल्याकारणाने, उदारमतवादीही 'राज्य' या संघटनेविरुद्ध होते. समाजवाद्यांनी आणखी एक वेगळ्याच कारणाकरता 'राज्य' या संघटनेविरुद्ध आपला निषेध नोंदविला होता. त्यांच्यामते 'राज्य' ही संघटना समाजात जे 'आहेरे' आहेत, जे प्रस्थापित आहेत, त्यांच्याच इच्छा व आकांक्षा यांचे प्रतिनिधीत्व करीत असते. राज्य या संघटनेला समाजात जे सर्वसामान्य व तळागाळाचे नागरिक असतात त्यांच्या इच्छा व आकांक्षा यांच्याशी काहीही सोयरसुतक नसते.

म्हणून 'राज्य' ही संघटना, समाजवाद्यांच्या दृष्टीनेही त्याज्यच होती. एवंच सनातनी उजवे, उदारमतवाद. आणि समाजवाद या तीन्हीही दृष्टिकोनातून त्या सर्वांना अत्यंत हवेहवेसे वाटणारे उद्दिष्ट एकच होते. ते म्हणजे 'राज्य' या संघटनेने विरून जाणे, नाहीसे होणे. ही संकल्पित समाजव्यवस्था आदर्श अशीच होती. म्हणूनच या तीन्हीही तत्त्वप्रणाली आपली ही इच्छा कधीना कधी पुरी होईल अशी श्रद्धा बाळगून होत्या.

सिद्धांताच्या पातळीवर 'राज्य' या संघटनेविषयी उपरोक्त तीन्हीही तत्त्वप्रणालींची एकवाक्यता होती, हे आपण पाहिले आहेच. असे होते तरीही प्रत्यक्ष व्यवहारात त्यांच्या या विचाराबाबत फारच मूलगामी असे अंतर्विरोध होते, त्याची नोंद या ठिकाणी घेणे आवश्यक आहे. इ.स. १८४८ च्या घटनानंतर या तीन्हीही विचारसरणीच्या पुरस्कर्त्यांनी 'राज्य' ही संघटना व त्या संघटनेत अंतर्भूत असलेल्या संरचना या सर्वांनाच अनेक भिन्नभिन्न मार्गांनी मजबुती कशी प्राप्त होईल याच दिशेने पावले टाकलेली आहेत. यापैकी जे सनातन-तत्त्वप्रणालीचे प्रवक्ते होते, ते 'राज्य' या संघटनेकडे एका विशिष्ट दृष्टिकोनातून पाहात होते. त्यांना असे आढळून आले होते की, सामाजिक नैतिकता एकंदरीतली नैतिकता-यांचे जे विघटन होत आहे हे -प्रत्यक्षातील वस्तुस्थिती असो वा नसो-त्यांना तसे वाटले होते. विद्यमान सामाजिक संस्था हे विघटन होता नये, यासाठी प्रतिबंध करण्यास असमर्थ ठरल्या होत्या. निदान 'राज्य' या संघटनेची जी दंडशक्ती होती, व त्यांचे प्रतीक अशा ज्या संस्था होत्या, त्यांची मदत घेतल्याशिवाय त्यांना हे त्रिकट कार्य करता आले नसते हेही त्यांना स्पष्टपणे आढळून आले होते. उदारमतवादी 'राज्य' या संघटनेकडे आणखी एका वेगळ्याच दृष्टिकोनातून पाहात. त्यांच्यामते 'राज्य' ही संघटना विशिष्ट उद्दिष्टे साध्य करण्याच्या दृष्टीने, एकमेव व अत्यंत कार्यक्षम अशी संघटना होती. ही विशिष्ट उद्दिष्टे कोणती? (१) सामाजिक संकल्पित सुधारणांचा वेग, समाजाच्या आवाक्याबाहेर न जाता तो स्थिर राहावा आणि (२) उदारमतवादाला योग्य वाटत असेल तीच दिशा या संकल्पित सुधारणांना मिळावी. समाजवाद्यांचा दृष्टिकोन या वर उल्लेखिलेल्या दृष्टिकोनापेक्षा भिन्न असणे क्रमप्राप्तच होते. इ.स. १८४८ नंतर, समाजवाद्यांच्या विचारात थोडेसे परिवर्तन झालेले आहे. त्यांच्यामते 'राज्य' या संघटनेत अनुस्यूत असलेली मध्यवर्ती सत्ता, समाजवाद्यांच्या हाती आल्याविना, समाजात जे मूलभूत स्वरूपाचे परिवर्तन घडवून आणावयाचे आहे, ते परिवर्तन घडवून आणण्याविरुद्ध ज्या ज्या अडचणी आहेत, त्यांचे उल्लंघन करणे या समाजवाद्यांना कधीही शक्य होणार नाही. *थोडक्यात राज्य हे संघटन हवे,* फक्त त्या संघटनेच्या मध्यवर्ती केंद्रावर, समाजवाद्यांचा ताबा हवा, असे त्या विचारसरणीचे सांगणे होते.

याशिवाय आणखीही एक महान विसंगती होती. या तीन्हीही प्रणालींचे सर्व अनुयायी व पुरस्कर्ते एकीकडे असे सांगत होते की त्या तीन्हीही अगदी वेगवेगळ्या व स्पष्ट अशा तत्त्वप्रणाली आहेत. पण प्रत्यक्षात त्या सर्वांचा व्यवहार अगदी वेगवेगळा होता. प्रत्येक पक्षाच्या मते खरे म्हणजे प्रत्यक्षात दोनच पक्ष होते. प्रत्येक पक्ष असे सांगत होता की आपल्या स्वत: व्यतिरिक्त

इतर जे दोन पक्ष होते त्या दोन्ही पक्षांच्या तत्त्वप्रणाली मूलत: एकच होत्या. म्हणूनच त्यांना दोन वेगवेगळे पक्ष न मानता, त्यांना एकच पक्ष मानले पाहिजे. उजव्या सनातन पक्षाच्या मते, उदारमतवादी आणि समाजवादी या दोन्ही तत्त्वप्रणालींची *'प्रगती'* या संकल्पनेवर श्रद्धा होती. समाजात सातत्याने *'प्रगती'* होत आहे यावर त्यांचा विश्वास होता. समाजाच्या ज्या अंगभूत अशा संरचना असतील त्यांना वळण लावण्यासाठी व त्यांच्यात बदल घडवून आणण्यासाठी 'राज्य' या संघटनेचा वापर करण्यास त्या दोघांची तयारी होती व इच्छाही होती. याउलट समाजवाद्यांच्या दृष्टीने उजवा सनातन पक्ष आणि उदारमतवादी पक्ष या दोन्हीही पक्षात एका दृष्टीने फारसा फरक नव्हता. हे दोन्हीही पक्ष समाजातील प्रस्थापित वर्गरचना जैसे थे राहावी आणि समाजातील जे अगदी वरच्या थरातील लोक आहेत, जुने उमराव, सरंजामदार, नवे श्रीमंत, आणि नवे बुर्झ्वा – या सर्वांचे हक्क सुरक्षित राहावेत यासाठी बचावात्मक पवित्रा घेतात, असे समाजवाद्यांचे म्हणणे होते. म्हणूनच वरवर पाहाता जरी हे दोन वेगवेगळे पक्ष असले तरी वस्तुत: ते दोन पक्ष नाहीत, तो एकच पक्ष आहे, हा मुद्दा समाजवादी ठोसपणे मांडत. उदारमतवादी पक्षाचे धोरण व कार्यक्रम वेगळा होता हे खरे. परंतु त्यांचा सूर आपल्या व्यतिरिक्त इतर जे दोन पक्ष आहेत, ते वस्तुत: दोन नसून तो एकच पक्ष आहे असाच होता. उदारमतवाद्यांच्या मते, उजवा सनातनी पक्ष आणि समाजवादी हे दोन्हीही पक्ष उदारमतवादी उद्दिष्टांच्या विरोधात असलेले पक्ष होते. तसेच आपले कर्तृत्व विकसित करण्याची क्षमता ज्यांनी दाखविलेली आहे. अशा व्यक्तींच्या सुप्त सामर्थ्याला व विकासाला प्रतिबंध त्या दोन्ही पक्षाकडून होतो, असे उदारमतवाद्यांचे मत होते. थोडक्यात वेगवेगळ्या प्रकारची स्पष्टीकरणे देऊन, या तीन्हीही तत्त्वप्रणाली एकाच गोष्टीचा उद्घोष करीत असत. आपल्या व्यतिरिक्त फक्त एकच तत्त्वप्रणाली खऱ्या अर्थाने कार्यरत आहे, असे या तीन्हीपैकी प्रत्येक तत्त्वप्रणालीचे सांगणे होते. अर्थात हा 'उद्घोष' हा तत्कालीन वादविवादाचा भाग होता हे खरे आहे. परंतु त्या सर्व घडामोडींकडे व राजकीय वादविवादांकडे अधिक मूलभूतपणे पाहिले असता, त्यातून एक गोष्ट स्पष्ट होते, ती म्हणजे तत्कालीन राजकारणात 'राजकीय-मैत्री'च्या संबंधांची सातत्याने जी पुनर्रचना होत होती, त्याचे प्रतिबिंब त्या वेगवेगळ्या स्पष्टीकरणात पडलेले होते. ते काहीही असो गेल्या दीडशे वर्षात या तीन तत्त्वप्रणाली, या तीन नसून त्या दोनच आहेत असे आग्रहाने वारंवार प्रतिपादले जात होते. त्यामुळे राजकीय गोंधळ, फार मोठ्या प्रमाणात निर्माण झालाच. पण त्याचबरोबर या तत्त्वप्रणालींना जी संबोधने देण्यात आली होती, ती संबोधनेही अर्थहीन ठरली होती.

परंतु या वर उल्लेखिलेल्या महान विसंगतीपेक्षाही आणखी एक 'सर्वात महान' अशी विसंगती होती. तिचे वर्णन येणेप्रमाणे करता येईल – इ. स. १८४८ ते इ. स. १९६८ या एकंदर एकशेवीस वर्षांच्या कालखंडात या तीन तत्त्वप्रणालींचा आपापसातील संघर्ष सातत्याने चालूच होता. तथापि हा संघर्ष खरे म्हणजे दुसऱ्या एका संघर्षाने घेतलेले रूप होते. या एकशेवीस

वर्षात उदारमतवादी तत्त्वप्रणाली ही अत्यंत प्रभावी अशी तत्त्वप्रणाली होती. म्हणूनच या कालखंडात सातत्याने चालू असलेल्या संघर्षात, त्या तत्त्वप्रणालीत अनुस्यूत असलेल्या विचारांचा संघर्ष हजर होताच. सर्वात महान विसंगती ही की, तीन वेगवेगळ्या तत्त्वप्रणालींचा हा संघर्ष नसून तो उदारमतवादी तत्त्वप्रणालीत अनुस्यूत असलेल्या विचारातील व तत्त्वातील तो संघर्ष होता, ही महान विसंगती होती. याचे कारण असे की त्या एकशेवीस वर्षात वस्तुत: एकच तत्त्वप्रणाली – उदारमतवाद – हीच इतर सर्व तत्त्वप्रणालींना मागे सारून, प्रभावी ठरलेली तत्त्वप्रणाली होती. हे कसे व का हे सारे समजावून घ्यावयाचे असेल तर त्या एकशेवीस वर्षाच्या कालखंडातील राजकीय वादविवाद, व चळवळी यात अंतर्भूत असलेल्या प्रत्यक्ष, वास्तव व मुलभूत अशा सामाजिक प्रश्नांकडे आपणास दृष्टीक्षेप टाकावा लागेल. त्यांचा विचार करावा लागेल. तत्कालीन समाजासमोर जे प्रश्न होते त्या प्रश्नांची उत्तरे मिळणे व सोडवणूक होणे ही त्या काळाची गरज होती. या एकशेवीस वर्षात तो संघर्ष सातत्याने होत होता, त्यात या प्रश्नांची सोडवणूक व उत्तरे अंतर्भूत होती.

जागतिक भांडवलशाही अर्थव्यवस्था ही राजकीय दृष्ट्या स्थिर राहावयाची असेल तर एक महान *'सुधारणा'* होणे आवश्यक होते. ती सुधारणा म्हणजे तत्कालीन राजकीय पद्धतीत व अर्थव्यवस्थेत, कामगार वर्गाला सामावून घेणे. थोडक्यात ही *'सुधारणा'* झाल्यानंतर, केवळ सत्ता व पैसा, यावरच सामाजिक प्रभुत्व अवलंबून न राहाता, ते सामाजिक सर्वसंमतीवर अवलंबून राहील, अशा प्रकारचे सामाजिक परिवर्तन होणे जरूरी होते. ही संकल्पित *'सुधारणा'* अंतर्भूत असलेली प्रक्रिया दोन खांबांवर उभी होती. या दोनातला पहिला खांब पुढील गोष्टींना आधार देणार होता. वयात आलेल्या प्रत्येक व्यक्तीला, मतदानाचा अधिकार देण्यात येणार होता. पण या संभाव्य मतदारांनी, अशा प्रकारे मतदान करावयाचे होते की, त्या मतदानाचा परिणाम म्हणून समाजातील प्रस्थापित संस्थात, फारच अल्प अंसा संस्थात्मक बदल होईल. थोडक्यात तत्कालीन अशी जी सामाजिक बसाबस होती, त्यात फारच थोडा बदल होईल अशा प्रकारे, सर्व संभावित मतदार, मतदान करतील अशी अपेक्षा होती. दुसऱ्या खांबाने पुढील गोष्टींना टेकू द्यायचा होता. जगातील भांडवलशाही पद्धतीमुळे प्रचंड प्रमाणात वस्तूंचे उत्पादन होणार. यामुळे होणाऱ्या नफ्याचे प्रमाणही तसेच प्रचंड असणार. या नफ्यातला काही भाग, कामगार वर्गाला मिळेल अशी काही व्यवस्था करावयाची. परंतु हे करत असताना एका गोष्टीची 'काळजी' घ्यावयाची होती. तत्कालीन समाजात प्रभुत्व गाजविणारा जो सामाजिक वर्ग होता, त्याच्याच हाती, त्या प्रचंड नफ्यातला फार मोठा भाग राहील, आणि भांडवलउभारणीची जी व्यवस्था होती, त्यातही काहीही बदल करावयाचा नाही, ह्या गोष्टींचीच त्या संकल्पित सामाजिक व्यवस्थेने काळजी घ्यावयाची होती.

या प्रकारच्या सामाजिक सामरस्याची (Integration ) जरुरी जगातल्या एका विशिष्ट भागात अगदी तातडीची होती. या भूभागात जागतिक भांडवलशाही अर्थव्यवस्थेचा गाभा समजल्या

जाणाऱ्या देशांचा समावेश होता. इंग्लंड आणि अर्थातच फ्रान्स या दोन्हीही देशांचा त्यात अंतर्भाव होताच, त्यांच्याबरोबर अमेरिका, पश्चिम युरोपमधील राष्ट्रे, गौरवर्णियांनी वसलेले दुसरेही देश, हे सर्व देशही होते. इ. स. १८४८ – १९१४ या कालखंडाच्या दरम्यान, वरील परिच्छेदातून उल्लेखिलेल्या सुधारणा व त्यात असलेले सामाजिक परिवर्तनही या सर्व देशातून धीम्या गतीने, प्रत्यक्ष कार्यवाहीत आणण्यात आले होते. पहिल्या महायुद्धाला सुरुवात होण्यापूर्वी या सर्वच देशातून वयात आलेल्या प्रत्येक व्यक्तीला (अर्थात यात स्त्रियांचा समावेश नव्हता) मतदानाचा हक्क देण्यात आला होता. तसेच एक प्रकारच्या कल्याणकारी राज्यालाही मान्यता मिळून त्याची उभारणी झाली होती. या सर्वच देशातून या सुधारणा एकाच गतीने झाल्या नाहीत हे खरे आहे. तसेच त्या सुधारणा एका समान पातळीवर १९४१ सालपर्यंत प्रस्थापित झाल्या नव्हत्या, यातही काही शंका नाही.

एवंच, आपणास असे स्थूलमानाने म्हणता येते की उदारमतवादी तत्त्वप्रणाली आपल्याला अभिप्रेत असलेली उद्दिष्टे प्रत्यक्ष कार्यवाहीत आणण्यात यशस्वी झाली होती हे विधान करून आपणास तेथेच थांबता येईल. परंतु तसे करणे पुरेसे व योग्यही नाही. प्रत्यक्षात काय घडले होते हे त्या विधानातून प्रतिबिंबित होत नाही. या देशातून होत असलेल्या सामाजिक परिवर्तनाच्या वर्णनाचा उल्लेख वरील परिच्छेदात आलेला आहे. ही परिवर्तनाची प्रक्रिया चालू असताना काही गोष्टी होत होत्या. विशेषत: उजवे – सनातन पक्षीय आणि समाजवादी व्यक्ती यांच्या बाबतीत त्या होत होत्या. या काळात जे प्रमुख असे उजवे – सनातन पक्षीय राजकारणी होते, त्यांचे रूपांतर ज्ञानी (enlightened ) अशा सनातन पक्षीयात झाले होते. थोडक्यात कामगारवर्गीयांना प्रस्थापित राज्यव्यवस्थेत सामावून घेण्याची जी प्रक्रिया होती त्यात आता हे ज्ञानी–सनातनपक्षीय, जे उघडपणे उदारमतवादी होते, त्यांच्याशी स्पर्धा करीत होते. इंग्लंडचा पंतप्रधान डिसरेली, जर्मनीतील बिस्मार्क, आणि फ्रान्समधील तिसरा नेपोलियन ही त्या 'ज्ञानी – सनातन पक्षीयांची काही चांगली व नामवंत उदाहरणे. उजव्या – सनातन पक्षीयांचा हा जो नवा अवतार – 'ज्ञानी – उजवे सनातनपक्षीय' – होता त्याची ती उदाहरणे आहेत. आपण त्यांना 'उदारमतवादी सनातन पक्षीय' या नावाने संबोधू या.

. उजव्या – सनातनपक्षीयात हे बदल जेव्हा घडत होते, तेव्हा समाजवादी पक्षात काय घडत होते? औद्योगीकरण झालेल्या देशातील समाजवादी चळवळींकडे दृष्टीक्षेप टाकल्यास काय आढळते? जर्मन सोशल डेमोक्रॅटिक पार्टी हा अत्यंत जहाल व झुंजार असा समाजवादी पक्ष. 'उदारमतवादी' समजल्या जातील अशा सुधारणा तोवर प्रत्यक्ष कार्यवाहीत आल्या होत्या, त्या आम्ही समाजवाद्यांनी घडवून आणल्या आहेत असा दावा करून, ते जर्मन लोकसभेत त्या सुधारणांचे प्रमुख प्रवक्ते बनले होते. वर उल्लेखिलेल्या सर्वच देशातले समाजवादी पक्ष आणि त्यांच्या नेतृत्वाखाली असलेली कामगार चळवळ या दोघांनी उदारमतवाद्यांची जी उद्दिष्टे होती, ती प्रत्यक्ष कार्यवाहीत यावीत यासाठी सामाजिक 'दबाव' आणला होता. गंमत अशी आहे की,

उदारमतवाद्यांचे ध्येय होते, कामगार चळवळीची धार बोथट करणे. या ध्येयास जहाल समाजवाद्यांनी पाठिंबा दिला. या पाठिंबा देणाऱ्यांची यादी मोठी उद्बोधक आहे. यात जर्मनीतले बर्नस्टीन यांच्यासारखे मवाळ आहेत. त्याचबरोबर काउटस्की वोरे (Jaures), गुएसड (Guesde) यांच्यासारखेही जहाल समाजवादीही आहेत. इंग्लंडमधील फेबिएन्सचा या यादीत समावेश असला, तर त्यात आश्चर्य मानण्यासारखे काहीही नाही. हे सारेजण आपण ज्यास 'उदारमतवादी-समाजवादी' या नावाने संबोधू, तसे उदारमतवादी – समाजवादी बनले होते.

इ. स. १९१४ साल उजाडेपर्यंत 'उदारमतवादी-उजवे-सनातनी' आणि 'उदारमतवादी-समाजवादी' या दोनच पक्षांच्या अवतीभोवती, औद्योगिक राष्ट्रातले 'राजकीय कार्य आणि राजकारण' प्रामुख्याने घोटाळत होते. या प्रक्रियेत ज्या राजकीय पक्षास शुद्ध उदारमतवादी या नावाने संबोधता आले असते, ते पक्ष हळूहळू नाहीसे होऊ लागले होते. परंतु असे होण्यामागे कारण एकच होते. ते म्हणजे, सर्वच महत्त्वाचे पक्ष, मग ते डावे असोत वा उजवे असोत, हे आता वस्तुतः उदारमतवादी पक्ष बनले होते. तत्त्वप्रणालींचा संघर्ष होता तो अगदी वरवरचा. पण संघर्षरूपी मुखवट्यामागे, प्रत्यक्ष अस्तित्वात असलेली समजूत व एकवाक्यता उभी होती.

पहिल्या महायुद्धाचा एक परिणाम म्हणून ही एकवाक्यता व समजूत निकालात निघाली नाही. या उलट त्या एकवाक्यतेला व समजुतीला बळकटी आली आणि तिचा विचारही झाला. जागतिक अर्थव्यवस्थेच्या काठावर असलेल्या बॉसनिया-हेरझोगिव्हिना या भागात खून झाल्याचे कारण होऊन पहिल्या महायुद्धास सुरुवात झाली होती. आता अशी वेळ येऊन ठेपली होती की केवळ औद्योगिक राष्ट्रांनी आपल्या देशातील कामगार वर्गाला सत्ता व संपत्ती यांच्या वाट्यात मर्यादित प्रमाणात सहभागी करून घेण्याचे मर्यादित उद्दिष्ट ठेऊन भागणार नव्हते. त्या राष्ट्रांनी त्या उद्दिष्टापलीकडे जाण्याची वेळ आली होती. सर्व जगातील कामगार-वर्गातील फार मोठ्या भागाला, सत्ता आणि संपत्ती याच्या मर्यादित वाट्यात सामील करून घणे भाग होते. जगातील कामगार वर्गातील बहुसंख्य कामगार, हा जागतिक भांडवलशाही अर्थव्यवस्थेच्या काठावरच्या आणि काही प्रमाणात काठावरचा समजला जाईल अशा भागात राहाणारे होते. विद्यमान काळात प्रचलित असलेल्या भाषेत सांगावयाचे झाल्यास, आजवर औद्योगिक राष्ट्रातल्या कामगार वर्गाला चुचकारून, त्या लढ्याची धार बोथट करण्यात आली होती. त्याच मार्गाचा अवलंब करून दक्षिण गोलार्धात रहाणाऱ्या लोकांची समजूत काढायची होती.

या पृथ्वीचा दक्षिण गोलार्ध आणि तिचा उत्तर गोलार्ध याच्या दरम्यान नेहमीचे प्रश्न होते. ते सोडविण्यासाठी दोन मार्ग नेहमीच उपलब्ध होते. जागतिक राजकारणात, उदारमतवादी तत्त्वप्रणालीला अभिप्रेत असलेल्या राजकारणाचे पुनरुज्जीवन करणे असा एक दृष्टिकोन होता. अमेरिकेचे अध्यक्ष वुड्रो विल्सन यांनी हा दृष्टिकोन प्रथम मांडला; व 'सर्व जग हे लोकशाहीच्या दृष्टीने सुरक्षित राहावे' यासाठी अमेरिकेने पहिल्या महायुद्धात भाग घ्यावा असे आवाहन त्यांनी केले होते. पहिले महायुद्ध आटोपल्यानंतर, त्यांनी आणखी एक आवाहन केले. त्या आवाहनानुसार

"सर्व राष्ट्रांना स्वयंनिर्णयाचा हक्क असाला पाहिजे" याबद्दल त्यांनी आग्रह धरला होता.

या ठिकाणी प्रे. वुड्रो विल्सन यांना कोणती 'राष्ट्रे' अभिप्रेत होती? जागतिक भांडवलशाही–अर्थव्यवस्थेचा गाभा म्हणून समजल्या जाणाऱ्या राष्ट्रांचा अंतर्भाव अर्थातच त्या 'राष्ट्रात' नव्हता. याचे कारण फ्रान्स, इंग्लंड, इतकेच नव्हे बेल्जियम आणि इटाली या राष्ट्रातसुद्धा परिणामकारक आणि वैध ठरेल अशी मध्यवर्ती राज्ययंत्रणा उभारण्याची प्रक्रिया केव्हाच पूर्ण झालेली होती. थोडक्यात प्रे. विल्सन हे वेगळ्याच 'राष्ट्रा'बद्दल बोलत होते. रशिया, ऑस्ट्रिया–हंगेरी आणि ऑटोमन साम्राज्य, या तीन साम्राज्यसत्तांच्या विघटनास त्याकाळी सुरुवात झालेली होती. अर्थातच प्रे. विल्सन या वर उल्लेखिलेल्या तीन साम्राज्यातील 'लोकां' संबंधीच बोलत होते. ही सर्व राष्ट्रे जागतिक–भांडवलशाही अर्थव्यवस्थेच्या सरहद्दीवर किंवा थोडी अलिकडे असलेली राष्ट्रे होती. एवंच विद्यमान वाक्प्रचारात आपण ज्यांचा उल्लेख दक्षिण–गोलार्ध असा करतो, त्या 'राष्ट्रा'संबंधी प्रे. विल्सन आग्रह धरीत होते. पहिल्या युद्धानंतर या सर्व राष्ट्रांना स्वयंनिर्णयाचा हक्क प्राप्त झाला हे आपण जाणतोच. दुसरे महायुद्ध संपल्यानंतर या तीन साम्राज्यांव्यतिरिक्त जी साम्राज्ये होती, त्यांच्या आधिपत्याखाली असलेल्या देशांना स्वयंनिर्णयाचे तत्त्व लागू करण्यात आले. आफ्रिका, आशिया, आसेनिया (oceania) आणि कॅरिबियन भूभाग स्वयंनिर्णयाच्या तत्त्वाच्या अंमलबजावणीत समाविष्ट करण्यात आला होता.

प्रत्येक राष्ट्राला स्वयंनिर्णयाचा हक्क असला पाहिजे हे तत्त्व भांडवलशाही राष्ट्रात मान्य झालेल्या दुसऱ्या एका तत्त्वाचा व संरचनेचा आदर्श ठेवून मान्य करण्यात आले होते. औद्योगीकरण झालेल्या प्रत्येक राष्ट्रात वयात आलेल्या प्रत्येक व्यक्तीस (अर्थात स्त्रिया सोडून) मतदानाचा हक्क असलाच पाहिजे, हे मान्य झालेले होते. तेच तत्त्व *सर्व* राष्ट्रांच्या बाबतीत जागतिक पातळीवर लागू करण्यात आले होते. राष्ट्रात प्रत्येक व्यक्तीला (स्त्रिया सोडून) राजकीय बाबतीत समान व सारखेच हक्क असतात, हे तत्त्वत: मान्य झालेले होते. त्याबरोबर प्रत्येक व्यक्तीस एकच मत असते, हेही मान्य झालेले होते. ही तत्त्वे जागतिक पातळीवर सर्व राष्ट्रांना लागू करण्यात येणार होती. प्रत्येक राष्ट्र हे सार्वभौम व स्वतंत्र होते. राजकीयदृष्ट्या गरीब व श्रीमंत या दोन्ही गटातील राष्ट्रे समान होती, म्हणूनच प्रत्येक राष्ट्राला जागतिक व्यवहारात एकच मत असले पाहिजे. संयुक्त राष्ट्र संघाच्या सर्वसाधारण सभेच्या रचनेत हे तत्त्व अंतर्भूत करण्यात आलेले आहे.

हा प्रे. विल्सन प्रणित उदारमतवाद येथेच थांबला नाही. त्यांनी आणखीही पुढची पावले टाकली. प्रत्येक राष्ट्राला मतदानाचा हक्क मिळाल्यानंतरची पुढची पायरी कल्याणकारी राज्यव्यवस्थेची. म्हणजेच जागतिक–भांडवलदारी–अर्थव्यवस्थेत नफ्याच्या रूपाने जी रक्कम शिल्लक राहील, तिचे पुनर्वाटप करणे. ही क्रिया सरकारी पातळीवर, उत्पन्नाची देवाण–घेवाण होऊन कार्यवाहीत येणार होती. राष्ट्रांना स्वयंनिर्णयाचा हक्क मिळाल्यानंतरची जागतिक पातळीवरची पुढची पायरी म्हणजे राष्ट्रीय पातळीवरचा आर्थिक विकासाचा कार्यक्रम.

त्याबद्दलच्या योजना व कार्यक्रम अमेरिकेचे अध्यक्ष रूझवेल्ट, ट्रुमन आणि दुसऱ्या महायुद्धानंतरच्या काळात आलेल्या त्यांच्या वारसदारांनी मांडलेले आहेत व त्यांचा सक्रिय पुरस्कारही केलेला आहे.

प्रे. विल्सन व त्यांचे समर्थक या दोघांनी आपल्याला अभिप्रेत असलेल्या सुधारणा जागतिक पातळीवर व्हाव्यात यासाठी तीव्र स्वरात 'युद्धघोषणा' केली होती. उजव्या – सनातन पक्षीयांचे समर्थक व त्यांना पाठिंबा देणाऱ्या सामाजिक शक्तींनी या विल्सनी उदारमतवादी धोरणाबद्दल प्रतिक्रिया व्यक्त केलीच. या प्रतिक्रियेद्वारा उदारमतवादाविषयी त्यांना नेहमीच वाटणारी घृणा व्यक्त होत होतीच. शिवाय त्यात त्यांचा नेहमीचा धोरणीपणा व सावधपणाही दिसून येत हाता. हे सारे नमूद कारावयास हवे असे नाही. कारण तसे झाले नसते तरच नवल.

परंतु दुसऱ्या महायुद्धामुळे युरोपमध्ये जे विघटन झाले होते, ते उजव्या – सनातन पक्षीयांनी पाहिल्यानंतर त्यांचाही हृदयपालट झाला होता. उदारमतवादी सुधारणात जी जमेची बाजू होती, ती त्यांच्या लक्षात येण्यास सुरुवात झाली होती. म्हणूनच १९४५ सालानंतर प्रत्यक्ष व्यवहारात 'प्रे. विल्सनप्रणित उदारमतवाद' हा उदारमतवादी–सनातन पक्षीयांच्या धोरणाचा एक आधारभूत असा प्रबंध होऊन बसला.

तथापि १९१७ सालच्या घटनांना अर्थातच आणखी वेगळेच महत्त्व होते. १९१७ साली रशियन राज्यक्रांती झाली. तेव्हा प्रे. विल्सनप्रणित उदारमतवादाचा नुकताच जन्म झाला होता. परंतु जन्माला आल्या आल्याच, त्याला उजव्या–सनातनी तत्त्वप्रणाली व्यतिरिक्त आणखी एका वेगळ्या तत्त्वप्रणालीला सामोरे जाणे भाग पडले. या महान विरोधी तत्त्वप्रणालीचे नाव होते 'लेनिनवाद'. या अगोदर समाजवादी तत्त्वप्रणालीचे रूपांतर, उदारमतवादी – समाजवादी तत्त्वप्रणालीत जे झाले त्याचा उल्लेख याअगोदरच आलेला आहे. या वैचारिक बदलांच्या विरुद्ध राजकीय क्षेत्रात आपला निषेध नोंदविण्यासाठी लेनिन आणि बोल्शेव्हिक अवतीर्ण झाले होते. उदारमतवादी – समाजवादी तत्त्वप्रणालीला त्याकाळी अनेक वेगवेगळी नावे होती. बर्नस्टाईन यांचा सुधारणावाद हे त्यांपैकी एक नाव. त्याच्या पंगतीला कार्ल काउटस्की यांच्या विचारांनाही लेनिनने नेऊन बसविले होते. थोडक्यात लेनिनवाद एक लढाऊ पर्याय मांडीत होता. लेनिनने पहिल्या महायुद्धाच्या आरंभीच त्या महायुद्धात कामगारवर्गाने सामील होण्यास विरोध दर्शविला होता. रशियात बोलशेव्हिक पक्षाने सत्ताग्रास करणे ही त्या धोरणाची पुढची पायरी होती.

आपणा सर्वांस या सर्वच घटना चांगल्याच ज्ञात आहेत. सगळ्या जगातले समाजवादी–यात रशियातले समाजवादीही–आले अशी अपेक्षा करीत होते की पहिली समाजवादी क्रांती जर्मनीत होईल. रशियात बोल्शेव्हिकांनी सत्ताग्रास केल्यानंतरही अनेक वर्षे, जर्मनीत समाजवादी क्राती होऊन रशियन क्रांतीच्या उद्दिष्टांची पूर्तता होईल या आशेने बोल्शेव्हिक अनेक वर्षे वाट पाहात होते. या संबंधात एका गोष्टीचे स्मरण देणे अगत्याचे आहे. आंतरराष्ट्रीय कम्युनिस्ट चळवळीची संघटना – सेकंड इंटरनॅशनल हिच्या कामकाजाची भाषा अनेक वर्षे जर्मन होती. हिटलर सत्तेवर

आल्यानंतर कामकाजाच्या भाषेत बदल होऊन ती रशियन झाली. आपणास हेही ठाऊक आहे की जर्मनीत समाजवादी क्रांती कधी झालीच नाही; आणि म्हणूनच यापुढे काय करायचे यासंबंधी निर्णय घेणे बोल्शेव्हिकांना भागच होते.

या घटनांनंतर, बोल्शेव्हिकांनी घेतलेल्या निर्णयाला दोन बाजू आहेत. एककीकडे त्यांनी सर्व जगात नाही, तर एकाच देशात समाजवाद उभारण्याचा निश्चय केला. हा निर्णय घेतल्याने, ते एका वेगळ्याच स्तरावर आले. मुळातल्या जागतिक समाजवादी क्रांतीकडे घेऊन जाण्याऱ्या रस्त्यांपेक्षा हा नवा रस्ता वेगळ्याच ठिकाणी घेऊन जाणार होता. या नव्या बोल्शेव्हिक धोरणात तीन गोष्टी अनुस्यूत होत्या. एक– राष्ट्र हा घटक गृहीत धरून झालेल्या जागतिक राष्ट्रसंबंध व पद्धतीत सोव्हियट युनियनला स्थान प्राप्त करून देणे. दोन– हे उद्दिष्ट साध्य करण्यासाठी आपल्या चतु:सीमात असलेल्या सर्व वेगवेगळ्या भाषिक, वांशिक (ethnic) व धार्मिक सामाजिक गटांचे एकसूत्रीकरण करणे. हे एकसूत्रीकरण करून त्यायोगे एक जागतिक महासत्ता हे स्थान प्राप्त करून घेणे. तीन – हे स्थान पक्के व्हावे यासाठी जलद गतीने औद्योगीकरण करून, आर्थिक विकास घडवून आणणे. ही त्रिसूत्री हा केवळ स्टॅलिनचा राजकीय कार्यक्रम होता असे नाही. ख्रुश्चेव, ब्रेझनेव्ह, आणि गोर्बाच्याव्ह या सगळ्यांनी हाच कार्यक्रम कार्यवाहीत आणण्यासाठी भगीरथ प्रयत्न केले. एवंच लेनिनने सत्ताग्रास केल्यानंतर, आलेल्या बोल्शेव्हिक राजवटीचा, प्रत्यक्ष कार्यवाहीत आणण्याच्या दृष्टीने एकच कार्यक्रम होता. तो म्हणजे जागतिक राजकीय रंगमंचावर आपणास 'समान हक्क' असले पाहिजेत, अशी मागणी सोव्हियट राज्य करीत आहे, व ती सर्वांनी मान्य केली पाहिजे हा त्यांचा आग्रह होता.

हे जर होते, तर जागतिक (समाजवादी) क्रांतीचे काय? या ठिकाणी ही 'जागतिक क्रांती घडवून आणण्यासाठी स्थापन झालेल्या संघटना व त्यांची उद्दिष्टे यांची दखल घेणे अगत्याचे आहे. सेकंड-इंटरनॅशनल ही संघटना जागतिक क्रांतीचे उद्दिष्ट नजरेसमोर ठेवून स्थापन झाली. पण थोड्याच वर्षात, या उद्दिष्टाला त्या संघटनेने सोडचिठ्ठी दिली. म्हणून लेनिनने तिसऱ्या इंटरनॅशनलची स्थापना केली. ही स्थापना करताना सुरुवातीला तरी सेकंड इंटरनॅशनलने जी उद्दिष्टे कार्यवाहीत आणण्यासाठी प्रयत्न करण्याचे नाकारले होते, व त्याज्यही ठरविली होती, ती उद्दिष्टे अत्यंत लढाऊ मार्गाचा अवलंब करून, आपण ती साध्य करणार आहोत, असे लेनिनने मोठ्या दिमाखाने व आक्रमकपणे सांगितले होते. ज्याचे वर्णन महाचतुर लेनिन असे केले जाते, तो लेनिन सिद्धांताच्या पातळीवर, सनातन समाजवादी उद्दिष्टांचा पाठपुरावा करणार होता. हा झाला सिद्धांत – पण प्रत्यक्षात काय घडले? लेनिनने स्थापन केलेल्या थर्ड इंटरनॅशनलने, जागतिक क्रांतीसाठी काहीही प्रयत्न केले नाहीत. या उलट थर्ड इंटरनॅशनल ही सोव्हियट युनियन या राष्ट्राच्या परराष्ट्र खात्याचीच एक शाखा होऊन बसली. या शाखेने एक गोष्ट खास करून कधीही केली नाही. ती गोष्ट म्हणजे कामगारवर्गीयांनी कोठेही व केव्हाही क्रांतिकारी संघटन करून, प्रत्यक्ष दोन होत करून, कोठचीही राजवट आपल्या हाती घ्यावी,

यासाठी कधीही प्रयत्न केला नाही. समाजवादी उद्दिष्टे अन्य देशात तरी साध्य व्हावीत यासाठीही तिसऱ्या इंटरनॅशनलने कधीही प्रोत्साहन दिले नाही. याउलट सोव्हिएटप्रणित समाजवादी चळवळीचे केंद्रच बदलले. या धोरणात्मक बदलाची सुरुवात, १९२१ साली, *पिपल्स ऑफ इस्ट* (पूर्वेकडचे लोक – जनता) या नावाने एक अधिवेशन, तत्कालीन सोव्हियट राज्यात समाविष्ट असलेल्या बाकु या ठिकाणी झाले. म्हणूनच या अधिवेशनाचे नाव बाकु काँग्रेस असे पडले आहे. या काँग्रेससाठी लेनिनने पूर्वेकडच्या कम्युनिस्ट पक्षांनाच केवळ आमंत्रण दिले होते असे नाही. सर्व प्रकारच्या या राष्ट्रवादी आणि राष्ट्र परदास्यातून विमुक्त व्हावे यासाठी प्रयत्नशील असलेल्या सर्वांनाच मोठ्या इतमामाने आमंत्रण पाठविण्यात आले होते. यातले अनेक राष्ट्रवादी हे समाजवादाचे विरोधक होते हे ध्यानात ठेवले पाहिजे.

बाकु परिषदेत चर्चा होऊन कार्यक्रम तयार झाला. प्रत्यक्षात हा कार्यक्रम फक्त रशियन कम्युनिस्ट पक्षाचा राहिला नाही. त्याला जागतिक कम्युनिस्ट चळवळीचा कार्यक्रम म्हणून मान्यता मिळाली. हा कार्यक्रम साम्राज्यशाहीविरोधी कार्यक्रम समजला जात असे. पण प्रत्यक्षात या कार्यक्रमाने सांगितलेला साम्राज्यशाही विरोध म्हणजे नेमके काय होते? वस्तुत: तो प्रे. विल्सन यांनी प्रत्येक राष्ट्राला स्वयंनिर्णयाचा हक्क असला पाहिजे अशी जी घोषणा केली होती त्याचाच हा कार्यक्रम ही पुनरुक्ती होती. बाकु कार्यक्रमाची भाषा आक्रमक होती व संकल्पित पुनर्रचित जगात बदल घडविण्यासंबंधीची उत्कटता व अधिरता, त्यातून व्यक्त होत होती एवढेच. या पलिकडे प्रे. विल्सन यांचा कार्यक्रम आणि बाकु परिषदेत मान्य झालेला 'चतुर' लेनिनी कार्यक्रम यात काहीही फरक नव्हता. दुसऱ्या महायुद्धानंतर एकामागून एक अनेक राष्ट्रातील त्या त्या राष्ट्रात स्वातंत्र्याच्या चळवळीत अग्रभागी असलेले पक्ष सत्तेवर आले. (यात लेनिनभक्त पं. नेहरूंच्या पक्षाचाही समावेश आहे) या 'महान' नेत्यांनी कोठचा कार्यक्रम आपल्या राष्ट्रातील जनतेसमोर ठेवला होता? दुसऱ्या महायुद्धानंतर स्वतंत्र झालेल्या प्रत्येक राष्ट्राने राष्ट्रीय विकासाचा कार्यक्रम आपल्या राष्ट्रासमोर ठेवला होता. सर्वसामान्यपणे या कार्यक्रमावर 'समाजवादी विकास' हे लेबल चिकटविण्यात आले होते. वास्तविक लेनिनवाद हा राष्ट्रीय पातळीवरल्या उदारमतवादी–समाजवादाचा (Democratic Socialism लोकशाही समाजवादाचा) महान विरोधक समजला जातो. परंतु जागतिक पातळीवर तरी हा प्रत्यक्षात उदारमतवादी–समाजवादच आहे, असा संशय निर्माण होण्यासारखी परिस्थिती होती.

एवंच इ. स. १८४८ ते १९१४ या कालखंडात जे घडले त्याचीच पुनरावृत्ती इ. स. १९१७ या कालखंडात होत होती. इ. स. १८४८ ते १९१४ या कालखंडात समाजवादी लढाऊ वृत्ती आणि उजव्या सनातन पक्षीयांचे चातुर्य व मुत्सद्दीपणा या दोहोंच्या बेमालूम मिश्रणाने कामगारवर्गाला चुचकारण्याचा व शांत करण्याचा उदारमतवादी कार्यक्रम जागतिक भांडवलशाहीचा गाभा समजल्या जाणाऱ्या राष्ट्रात कार्यवाहीत आला होता. वयात आलेल्या प्रत्येक व्यक्तीवर (अर्थात स्त्रिया सोडून) मतदानाचा हक्क, आणि कल्याणकारी समाजव्यवस्थेची

स्थापना या दोन प्रमुख हत्यारांच्या मदतीने ही कार्यवाही यशस्वी झाली होती. हेच पुन्हा एकदा इ. स. १९१७ ते १९८९ या कालखंडात घडले होते. दक्षिण गोलार्धातील राष्ट्रांना चुचकारणे व शांत करणे हा जागतिक पातळीवरचा उदारमतवादी कार्यक्रम होता. हा कार्यक्रमही समाजवादी लढाऊ वृत्ती आणि उजव्या सनातन पक्षीयांचे चातुर्य व मुत्सद्दीपणा यांच्या बेमालूम मिश्रणाने पुन्हा एकदा कार्यवाहीत आला होता.

इ. स. १८४८ साली पहिली जागतिक क्रांती झाली. या क्रांतीने भांडवलशाही जागतिक अर्थव्यवस्थेच्या तत्त्वप्रणालीत अनुस्यूत असलेल्या व्यवहाररचनेत व डावपेच या दोन्हीत परिवर्तन घडवून आणणे होते. इ. स. १९६८ साली दुसरी जागतिक क्रांती झाली. या दुसऱ्या क्रांतीनेही पहिल्या क्रांतीसारखेच भांडवलशाही जागतिक अर्थव्यवस्थेत परिवर्तन घडवून आणले. इ. स. १८४८ ची पहिली क्रांती काही बाबतीत यशस्वी झाली होती. काही बाबतीत अयशस्वी ठरली होती. परंतु पहिल्या क्रांतीने आपल्या 'यश आणि अपयश' यांच्याद्वारा उदारमतवाद एक तत्त्वप्रणाली म्हणून विजयी होईल याची खात्री करून घेतली होती. तसेच उजवा–सनातन पक्ष आणि समाजवादी हे जे दोन विरोधक होते ते एकमेकांचे नगण्य असे साथी ठरावे असे परिवर्तन त्या दोन्ही पक्षात सरतेशेवटी या पहिल्या क्रांतीने घडवून आणले होते. ते 'यश आणि अपयश' या दोन्हींच्या द्वारा, उदारमतवादाच्या बाजूने 'सहमती' तोवर होती ती निकालात काढली गेली. इ. स. १९६८ सालातील क्रांतिकारांनी आणखी वेगळीच गोष्ट केली. त्यांनी राजकीय दृष्ट्या डावीकडून आपला अनेक गोष्टींबाबत निषेध नोंदविला होता. 'निषेध वर उल्लेखिलेल्या 'सहमती' विरुद्ध प्रामुख्याने होता. सर्वात महत्त्वाचे म्हणजे लेनिनवादाला अभिप्रेत असलेल्या समाजवादाविरुद्ध तो निषेध होताच. एवढेच नव्हे तर विद्यमान समाजाचे, इतिहासाच्या कालौघात जे समाजवादी परिवर्तन होईल, अशी जी कल्पना व आशा तोवर होती त्याविरुद्धही तो निषेध होता. ही जंत्री येथेच थांबत नाही. ती आणखीही पुढे न्यावी लागते. लेनिनवादाला अभिप्रेत असलेल्या समाजवादाचे रूपांतर, उदारमतवादी समाजवादात कसे झाले हे आपण वर पाहिलेच. त्या विरुद्धही इ.स. १९६८ सालची क्रांती आपला निषेध नोंदवीत होती, या निषेधाचा आविष्कार अनेक प्रकारे झाला. त्यात नानाविध अराज्यवादी विचारसरणींचा (anarchist themes ) समावेश होता. त्याचबरोबर आणखीही एक विचारधारा अंतर्भूत होती. या विचारधारेला या नानाविध विचारसरणीत अग्रस्थान होते. ही विचारधारा 'माओवाद' या नावाने ओळखली जाते.

जगातील तथाकथित 'नव डावे' सर्व जगात उदारमतवादाबद्दल जी 'सहमती' होती, तिला खिंडार कसे पाडावे याचा मागोवा घेत होते. त्याचवेळी उजवे – सनातन – पक्षीयांनीदेखिल आपल्या तत्त्वप्रणालीला नवे रूप दिले होते. इ. स. १८४८ सालानंतर हे प्रथमच घडत होते. हे नवे रूप घेतल्यानंतर ही तत्त्वप्रणाली एकीकडे राजकीयदृष्ट्या बचावात्मक पवित्रा घेत पुन्हा एकदा आक्रमक बनली आहे. उजव्या – सनातन तत्त्वप्रणालीने घेतलेल्या या नव्या रूपाला काही वेळा नव – सनातनवाद हे नाव देण्यात येते. काहीवेळा त्याला नव – उदारमतवाद या

नावाने संबोधण्यात येते. या सर्व घालमेलीतून एकाच गोष्टीचे सूचन होत होते. नव – सनातनवाद अथवा नव – उदारमतवाद यात पुढील गोष्टी प्रामुख्याने अनुस्यूत होत्या. बाजारपेठेवरची नियंत्रणे व निर्बंध काढून टाकावयाचे. असे करून कल्याणकारी समाजव्यवस्था कार्यवाहीत यावी यासाठी सरकारी पातळीवर जी रक्कम खर्ची पडत होती, तिच्यात कपात करण्यात येणार होती. गेल्या शतकातील लक्षणीय अशी ही पहिली घूमजाव.

मग इ. स. १९६८ सालच्या क्रांतीमागची कारणे आपणास कशी सांगता येतील? तत्त्वप्रणालीला अनुसरून केलेली व्यूहरचना व डावपेच यांच्यावर त्या क्रांतीच्या होणाऱ्या परिणामांबाबतची कारणमीमांसा आपणास कशी करता येईल? जागतिक पद्धत ही एक संरचना आहे हे ध्यानात घेऊन त्या पद्धतीचा सातत्याने विचार करता, आपणास एकच गोष्ट सांगता येते. उदारमतवादी राजकारणाने, आपले अंतिम टोक गाठले होते. ते राजकारण परिसीमेला येऊन पोचले होते. कल्याणकारी राज्यव्यवस्था, राष्ट्रीय विकास, वयात आलेल्या पुरुषवर्गाला मतदानाचा हक्क, आणि राष्ट्रीय सार्वभौमत्व या सर्वांचा वापर करून जागतिक कामगारवर्गाला चुचकारणे, त्याला शांत करणे हा उदारमतवादी राजकारण या शब्दाचा अर्थ आहे हे मी पुन्हा एकदा नमूद करतो. कामगारवर्गाला अधिक राजकीय अधिकार देणे, आणि कल्याणकारी राज्यव्यवस्थेच्या योगक्षेमासाठी अधिकाधिक आर्थिक पुरवठा करणे, म्हणजे भांडवलशाही अर्थसंकल्पाच्या पद्धतीला एक प्रकारे धमकावणेच होते. हे सारे जरी होत होते, तरी उदारमतवादी राजकारणाने आपली परिसीमा एका विशिष्ट परिस्थितीत गाठली होती. भांडवलदार व आहेरेंचा वर्ग या दोघांकडून कामगारवर्गाला चुचकारण्यासाठी आणि शांत करण्यासाठी जे हक्क व आर्थिक फायदे देऊ करण्यात आले होते ते लक्षणीय होते हे खरे. पण त्यांचा भाग तसा अस्पष्ट होता. हे हक्क व आर्थिक फायदे, जागतिक कामगारवर्गाच्या सर्वच विभागात पोचले नव्हते. याचा अर्थ त्या जागतिक कामगारवर्गातील सर्वच विभाग चुचकारले न गेल्याकारणाने, शांत झालेले नव्हते. उदारमतवादी राजकारणाने आपली परिसीमा गाठली होती ती या परिस्थितीत.

जागतिक भांडवलशाही पद्धतीच्या सीमांवर वा त्या सीमालगत राहाणाऱ्या देशातील बहुसंख्य जनतेला त्या भांडवलशाही पद्धतीतून वगळण्यात आलेले होते. याचा अर्थ या विभागातील आम जनतेला राजकीय हक्क प्राप्त झालेले नव्हते, कल्याणकारी राज्यव्यवस्थेत त्यांना सामील करून घेण्यात आलेले नव्हते. थोडक्यात सांगावयाचे झाल्यास, भांडवलशाही अर्थव्यवस्था जो प्रचंड नफा मिळवीत होती त्यातला काहीही भाग, या देशातील जनतेकडे वळविण्यात आला नव्हता. ही अवस्था केवळ याच विभागातील जनतेची होती असे नाही. जागतिक भांडवलशाही पद्धतीतल्या अर्थव्यवस्थेची जी राष्ट्रे गाभा समजली जात होती, त्या राष्ट्रातही अत्यंत लक्षणीय असे अल्पसंख्यांक होते की त्यांच्यापर्यंतही हे राजकीय हक्क व आर्थिक लाभ पोचले नव्हते. म्हणूनच या अल्पसंख्यांकांचे वर्णन, ते या भांडवलशाही पद्धतीचा गाभा समजल्या जाणाऱ्या राष्ट्रातील 'अंतर्गत' असे तिसऱ्या जगातील लोक, असे केले जाते. या सर्व उपेक्षित कामगार

वर्गीयांच्या असंतोषात, जगातील स्त्रीवर्गाच्या असंतोषाची भर पडली. जगातील स्त्रिया, विशेषत: प्रगत जगातील स्त्रिया आणि विकसनशील राष्ट्रातील आहेरे वर्गातील स्त्रिया, या सर्वांना प्रथमच अशी जाणीव होत होती की आपण या सर्व तथाकथित, प्रगत राज्यव्यवस्थेतून कायमचे वगळले गेलो होतो व भविष्यकाळात जाणार आहोत. या स्त्रीवर्गात ज्या कार्यकर्त्या कुशाग्र बुद्धीच्या होत्या, त्यांनी आणखी एक महत्त्वाचा व सत्य असा मुद्दा जोरदारपणे मांडला. त्यांच्या मते स्त्री वर्गाला जे वगळण्यात आले होते, त्याची एक खासीयत होती. सर्वच सामाजिक वर्गातील स्त्रियांना वगळण्यात आलेले होते. कामगारवर्गातील स्त्रियांना वगळण्यात आले तर कोणाला आश्चर्य वाटले नसते. परंतु आहेरे वर्गातील स्त्रियांनाही वगळण्यात आले होते. या सर्वच स्त्रियांना खरेखुरे राजकीय हक्क प्राप्त होण्यापासून वंचित करण्यात आलेले होतेच. पण त्याचबरोबर समान कामासाठी समान दाम, या बाबतीतही बहुतांशाने दूर ठेवण्यात आले होते.

इ. स. १८४८ सालापासून जागतिक थरावर प्रभुत्व गाजविणारा सामाजिक वर्ग एक काम फार परिश्रमपूर्वक व काळजी घेऊन करीत होता. ते काम म्हणजे आपल्या वर्गाचे सांस्कृतिक नेतृत्व निर्माण करणे आणि त्याला बळकटी आणणे. इ. स. १९६८ सालातील घटना या सांस्कृतिक नेतृत्वाची पीछेहाट होण्यास सुरुवात झाल्याचे प्रतीक होत्या. उदारमतवादी सामंजस्य व एकमत, यातले जे काही तोवर शिल्लक राहिलेले होते, ते इ. स. १९६८ ते १९८९ या कालखंडात आस्ते कदम, हळूहळू कोसळून जमीनदोस्त होण्याच्या मार्गाला लागले होते. उजव्या बाजूच्या पक्षांचा विचार करता, जे कोणी सनातन विचारांचे होते, त्यांनी समाजातील जे उदारमतवादाचे केंद्र होते, ते पार जमीनदोस्त व्हावे, यासाठी ते दिवसेंदिवस वाढत्या प्रमाणात प्रयत्नशील होते. उदाहरणादाखल, अमेरिकेचे उजवे सनातन पक्षीय अध्यक्ष रिचर्ड निक्सन यांचे पुढील वक्तव्य पाहा. "आपण आता सारेच केन्सवादी झालो आहोत." या वक्तव्याची त्यांच्या मागोमाग आलेल्या अमेरिकन अध्यक्ष – हेही उजवे सनातन पक्षीय होते – जॉर्ज बुश यांच्या निवडणूक प्रचारातील मोहिमेची तुलना करून पाहाता इ. स. १९८८ सालातील जॉर्ज बुश यांची प्रचारमोहीम L – word विरुद्ध होती. L – Liberalism – उदारमतवादोविरुद्ध ही मोहीम उघडउघडपणे होती. या बरोबरच ब्रिटिश कॉन्झर्विटिव्ह पक्षात झालेल्या – ज्यास जवळ जवळ राजवाड्यातील कटकारस्थान म्हणता येईल – असे सत्तांतर पाहा. मार्गरिट थॅचर यांनी भूतपूर्व ब्रिटिश पंतप्रधान डिसरेली यांच्याही अगोदरपासून ते इ. स. १८४० सालच्या रार्बट पिल या पंतप्रधान आपला वारसा आहे, असे सांगणारी enlightened परंपरा निकालात काढली होती.

उजव्या सनातन राजकीय पक्षात उदारमतवादी बालेकिल्ल्याची जी पडझड झाली होती त्यापेक्षा ती डाव्या पक्षात जो उदारमतवादी बालेकिल्ला होता त्याची पडझड अधिक झाली होती. उदारमतवादी–समाजवादी राजवटीचे विघटन, हे त्या पडझडीचे अत्यंत लक्षणीय असे स्वरूप होते. या समाजवादी राजवटीतल्या काही राजवटी या भांडवलशाही पद्धतीच्या सीमेवर ज्या राजवटी होत्या त्यापैकी होत्या. काही थोड्या पलीकडे असलेल्या होत्या. या राजवटीपैकी

काही अत्यंत प्रगतीशील समजल्या जात. काही अत्यंत लढाऊ स्वरूपाची भाषा वापरण्यासाठी व वक्तव्ये करण्यासाठी प्रसिद्ध होत्या. परंतु या सर्व प्रकारच्या राजवटींना लक्षणीय अशा पातळीवरचा राष्ट्रीय विकास सिद्ध करणे शक्य झाले नव्हते. हे झाल्याकारणाने एक गोष्ट झाली. ती म्हणजे, या राजवटीपैकी ज्या अनेक राजवटी अशा होत्या की ज्यांनी आपल्या राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या चळवळीत उल्लेखनीय अशी कामगिरी बजावलेली होती, तरी त्या राजवटींना असलेली सर्वमान्यता राजकीय विकास न साधता आल्याकारणाने त्या ती गमावून बसल्या होत्या. ही जी सारी प्रक्रिया होत होती तिचा शेवट त्या तथाकथित समाजवादी राजवटी कोसळण्यात झाली होती. या घटनात, आता इतिहासजमा झालेल्या सोव्हिएट युनियनमध्ये 'गोर्बाचेव्ह वादा'चा झालेला उदय, चीनच्या प्रजासत्ताकात निर्माण करण्यात आलेला 'खास आर्थिक विभाग' या घटना तर समाविष्ट आहेतच, पण त्याचबरोबर पूर्व युरोपमधील एकपक्षीय 'कम्युनिस्ट पक्षाच्या' आधिपत्याखाली असलेल्या राजवटींची इतिश्री होणे हेही अंतर्भूत आहे. वर उल्लेखिलेल्या घटनातील प्रक्रियेचा हा परमोच्च बिंदू होता.

इ. स. १९६८ साली आणखी एक गोष्ट घडली. 'उदारमतवादी सामंजस्य' म्हणून जे मानले जात होते, त्याच्या मदतीने काहीही साध्य होत नाही हे लक्षात आल्यामुळे अनेकजण निराश व अगतिक झाल्याकारणाने ते उदारमतवादी–समाजवादी तत्त्वप्रणालीच्या विरोधात गेले. त्या तत्त्वप्रणालीऐवजी त्यांनी आता अराज्यवाद (anarchism) आणि / अथवा माओवाद यांचा स्वीकार केला होता. इ. स. १९८९ साली ज्या घटना घडल्या त्याकरवीही अनेक नैराश्यग्रस्त व अगतिक लोकांनी त्यात सामील होऊन आपल्या प्रतिक्रिया व्यक्त केल्या होत्या. या लोकांच्या मते भूतपूर्व 'सोव्हिएट युनियन' ढंगाची राजवट ही एकेकाळी उदारमतवादी, समाजवादी तत्त्वप्रणालीची अत्यंत विशुद्ध अशी प्रतिनिधी होती. पण इत:पर ती राजवट त्या प्रतिनिधी–पदाला लायक नव्हती. याचा परिणाम म्हणून या विरोधात गेलेल्या लोकांनी खुल्या अर्थव्यवस्थेला पाठिंबा देऊन, भूतपूर्व सोव्हिएट युनियनला असलेला आपला विरोध व्यक्त केला. इ. स. १९६८ साली आणि इ. स. १९८९ साली, या दोन्हींही वेळा ज्या पर्यायी तत्त्वप्रणाली सुचविण्यात आल्या होत्या, त्याचा गंभीरपणे विचार करावयास हवाच असेही नाही. इ. स. १९६८ साली जो अराज्यवाद आणि / अथवा माओवाद हा जो पर्याय सुचविण्यात आला होता, तो अर्थशून्य आहे हे लगेचच सिद्ध झाले. इ. स. १९८९ साली जो पर्याय सुचविण्यात आला, तोही अर्थशून्य ठरण्याची प्रक्रिया सध्या चालू होत आहे. इ. स. १९६८ ते इ. स. १९८९ या कालखंडात, एक महत्त्वाची गोष्ट निश्चितपणे घडली आहे. ती म्हणजे, 'उदारमतवादी सामंजस्य' म्हणून जे एकेकाळी मानले जात होते, त्या विचारातून जगातील कामगारवर्गाच्या परिस्थितीत व भविष्यकाळात, धीम्या गतीने सुधारणा होईल अशी जी आशा अनेकांनी बाळगली होती, ती आशाच पार जमीनदोस्त झाली होती. परंतु ती आशा पार जमीनदोस्त झाली आहे, ही परिस्थिती मान्य केली तरी मुख्य प्रश्न राहातोच. आता यापुढे जागतिक व राष्ट्रीय कामगारवर्गाला चुचकारण्यासाठी,

त्यांची समजूत काढण्यासाठी इत:पर कोठचेही साधन उपलब्ध नव्हते.

साम्यवादी विचारसरणींच्या राजवटी पार कोसळल्या या घटनेचा खरा अर्थ एकच आहे. तो म्हणजे समाजाला मार्गदर्शन करणारी, तिला नेतृत्त्व देणारी अशी जी उदारमतवादी तत्त्वप्रणाली होती, ती आता मृत्यू पावलेली आहे. जागतिक भांडवलशाही पद्धतीच्या अनुरोधानेही उदारमतवादी तत्त्वप्रणालीचा विचार करता येईल. भांडवलशाही पद्धतीने समाजाला व त्यातल्या नाहीरे वर्गाला आपला भविष्यकाळ उज्ज्वल आहे, असे आश्वासन दिले नाही, तर मग ती समाजव्यवस्था शिष्टसंमत व वैधानिक ठरणार नाही. उदारमतवादी तत्त्वप्रणाली कामगारवर्गाला जे अभ्युदयाचे आश्वासन देते, त्यावर अगदी खरीखुरी श्रद्धा कोणाची असेल, तर ती भूतपूर्व साम्यवादी-राष्ट्रांच्या गटात, पुराण्या ढंगाने काम करणाऱ्या साम्यवादी पक्षांची. विद्यमान जगात ते साम्यवादी पक्ष नाहीसे झालेले आहेत. कामगारवर्गाला आशा व दिलासा देण्याचे त्यांचे जे कार्य होते, ते सध्यातरी कोणत्याही पक्षाला करता येत नाही वा येणारही नाही. म्हणूनच जगात प्रभुत्व गाजविणारा जो वर्ग होता व आहे त्याला जागतिक कामगारवर्गावर नियंत्रण ठेवता येणार नाही. ते आता त्यांच्या आवाक्याबाहेरचे होऊन बसले आहे. आवाक्याबाहेरचे याचा अर्थ गोडीगुलाबीने यापुढे कामगारवर्गावर नियंत्रण ठेवता येणार नाही. त्यासाठी जागतिक भांडवलशाही पद्धतीला पाशवी शक्तीचा वापर करावा लागेल. अन्य कोणत्याही मार्गाने कामगार वर्गावर नियंत्रण ठेवता येणार नाही. थोडक्यात कामगारवर्गाची सहानुभूती तर केव्हाच गमावलेली आहे. हे गमाविण्याचे कारण, कामगारवर्गाला आजवर जी लाच देण्यात येत होती तीच आता देण्यात येणार नाही. परंतु केवळ पाशवी शक्तीचा वापर करून, भांडवलशाही पद्धतीला आपले ईप्सित साध्य करता येईल असे नाही. प्रख्यात राजकीय तत्त्वज्ञ व मुत्सद्दी मायकाव्हेली यांनी फार पूर्वीच एक गोष्ट सांगितली आहे. ती म्हणजे केवळ, राजकीय संरचना व व्यवस्था टिकवून धरण्यास केवळ पाशवी शक्ती ही पुरेशी नसते.

## २

या अशा प्रकारे पर्शियन-खाडी युद्धाच्या पेचप्रसंगाचा खरा अर्थ काय आहे हे तपासण्यापर्यंत आपण येऊन पोचलो आहोत. हे खाडीयुद्ध एका नव्या कालखंडाची सुरुवात होती. या कालखंडात प्रमुख सत्तेकडे हत्यार एकच होते. ते म्हणजे स्वत:च एक पाशवी सत्ता बनणे. विसाव्या शतकात उत्तर-दक्षिण गोलार्धातील भूखंडात अनेक वेळा संघर्ष झाले. पण पर्शियन खाडीयुद्ध हा संघर्ष त्या सर्वांपेक्षा वेगळा होता. निव्वळ न निर्भेळ अशा 'व्यवहारी राजकारणाचा' **(Real Politics)** तो एक वस्तुपाठ होता. सद्दाम हुसेन यांनी त्या युद्धास त्याच प्रकारे सुरुवात केली. अमेरिका आणि या युद्धाचा प्रतिकार करण्यासाठी उभारण्यात आलेल्या मित्रसंघाने त्या युद्धास प्रतिसादही 'व्यवहारी राजकारणाच्या' पातळीवरच दिला.

यापूर्वीच्या उत्तर-दक्षिण गोलार्धातील संघर्षातही अर्थातच व्यवहारी राजकारण हे कधीही गैरहजर नव्हते. इ. स. १९२१ साली झालेल्या भूतपूर्व सोव्हिएट युनियन मधील बाकु या

ठिकाणीच्या 'बाकु काँग्रेस' या नावाने प्रसिद्ध असलेल्या अनेक राष्ट्रांच्या बैठकांतही ते हजर होते. इ. स. १९४९ साली शांघायमध्ये येऊन हजर झालेल्या चिनी-कम्युनिस्ट पक्षाच्या राजकारणातही ते हजर होते. एवढेच नव्हे तर 'पंचशील'चा उद्घोष करणाऱ्या इ. स. १९५५ च्या बांडुंग जाहीरनाम्यातही त्याचे अस्तित्व स्पष्टपणे व उघडपणे दिसून येते. व्हिएटनाम युद्धातही त्याची हजेरी आढळते. तशीच ती आपणास अमेरिका-सोव्हिएट युनियन यांच्यात १९६२ साली झालेल्या क्यूबा संघर्षातही ते व्यवहारी राजकारण हजर होते. जागतिक समाजरचना व राज्यव्यवस्था या दोन्हीत कोणतीही व्यवस्था मान्य न करणाऱ्या ज्या व्यवस्थाविरोधी (anti systemic ) चळवळी होत्या, त्यांच्या व्यूहरचनेत व डावपेचात व्यावहारिक राजकारण हा अंगभूत असा भाग होता. उदा. माओचे प्रसिद्ध घोषवाक्य 'बंदुकीच्या नळकांड्यातून राजकीय शक्तीची प्राप्ती होते.' 'व्यवस्था-विरोधी' अशा ज्या तत्त्वप्रणाली आहेत त्यांच्या संघटनात्मक विचारात पाशवी बळाला नेहमीच महत्त्वाचे स्थान होते. या तत्त्वप्रणाली ज्या मध्यवर्ती हेतू (Motiv) भोवती संघटीत झाल्या होत्या, त्याला पाशवी बळाचा नेहमीच सहकार होता. पृथ्वीच्या दक्षिण गोलार्धातील राष्ट्रे आणि त्यांच्या सीमारेषांवरचे प्रदेश यात कामगारवर्गाने जे संघर्ष केले, ज्या लढायात भाग घेतला, ते सर्व संघर्ष व लढाया, समाजपरिवर्तन व आशा ज्यात अनुस्यूत आहे अशा तत्त्वप्रणालीच्या झेंड्याखाली दिल्या होत्या.

आपण पुढील अर्थाचे प्रतिपादन करीत आहोत. या व्यवस्थाविरोधी चळवळींनी काही जागतिक संघर्ष केले. हे जागतिक संघर्ष, तत्त्वप्रणालीत अंतर्भूत असलेले संघर्ष होते. त्यांनी जे स्वरूप धारण केले होते, त्याचे वर्णन पुढील शब्दात करता येईल : हे संघर्ष जे व्यक्त करीत आहेत असे भासत होते अथवा त्या तत्त्वप्रणाली ज्या प्रकारच्या संघर्षाचा दावा करीत होत्या, त्यापेक्षा त्या तत्त्वप्रणाली फारच सौम्य व कमी लढाऊ होत्या. आपण आणखीही काही विधाने केली आहेत. उदा. जागतिक थरावरच्या ज्या 'व्यवस्थाविरोधी' शक्ती होत्या, त्या बहुतांशाने, अगदी अजाणतेपणे उदारमतवादी तत्त्वप्रणालीची जी उद्दिष्टे होती, त्यांचाच वस्तुत: पाठपुरावा करीत होती. जागतिक अर्थव्यवस्थेची व राजकारणाची जी प्रस्थापित व्यवस्था होती त्यांच्याशी एकजीव होऊन जावे, हेच त्या चळवळींचे उद्दिष्ट होते. आपण 'व्यवस्थाविरोधी' असल्या कारणाने आपण फारच जहाल आहोत असा देखावा ते निर्माण करीत होते, हे एकवेळ आपण विसरून जाऊ या. तसे असले तरी, या चळवळी जगातील पददलितांना आत्मोद्धार करण्यासाठी आशा दाखवीत होत्या. ते दाखवीत असलेले आशेचे किरण ही एक प्रकारची अतिशयोक्ती असेलही आणि होतीही. पण पददलितांना, ते ज्या कर्दमात रुतून पडले होते त्यातून आपली मुक्तता होईल ही आशा त्यांच्या मनात जिवंत होती. आपण महान क्रांतिकारक आहोत असा आव जरी या 'व्यवस्थाविरोधी' चळवळींनी आणला असला, तरी या चळवळींनी दिलेला दिलासा, आशा व वचने, याला आधारभूत समजून, पददलितांनी आपल्या निशाणाखाली यावे, असे त्यांनी जे आवाहन केले होते ते काही प्रमाणात यशस्वी ठरले होते. अनेक तरुण

या झेंड्याखाली जमा झाले आहेत, ही वस्तुस्थिती आहे. परंतु सरतेशेवटी या व्यवस्था-विरोधी चळवळीने दिलेली वचने, ही केवळ कागदोपत्रींची वचने ठरली. ती कार्यवाहीत आली नाहीत. याचा परिणाम म्हणून सामाजिक उद्रेक होणे हेही क्रमप्राप्तच होते. प्रथम इ. स. १९६८ साली मुलभूत स्वरूपाचा उठाव झाला. परंतु या उठावातून काहीही फलप्राप्ती न झाल्याने या चळवळींच्या निशाणाखाली जमा झालेल्यांचा भ्रमनिरास झाला होता. इ. स. १९८९ साली फ्रान्स व अमेरिका या देशात जे पुन्हा एकत्र उठाव झाले, ते त्या भ्रमनिरासाविरुद्धचा राग व्यक्त करण्यासाठी झाले होते. हे जे दोन उठाव झाले, आणि भ्रमनिरासातून जो राग व्यक्त होत होता, त्यांचा रोख प्रामुख्याने हे जे व्यवस्थाविरोधी असे उदारमतवादी-समाजवादी समजले जात होते त्यांच्या विरोधात होता. हे उठाव जे कोणी अत्यंत विशुद्ध असे पूर्वाश्रमीचे उदारमतवादी होते त्यांच्याविरुद्ध नव्हते. ते काहीही असो. आजवर उदारमतवादाने आपली उद्दिष्टे साध्य केली होती. त्यासाठी त्याने समाजवादी – उदारमतवादी यांचे साहाय्य घेतले होतेच. अनेक वेळा खास करून जे उजवे सनातन-उदारमतवादी होते त्यांचीही मदत जरूर घेतली होती. हे सारे करून, उदारमतवाद ही तत्त्वप्रणाली अगदी एकाकीपणे नेहमीच कार्यक्षम ठरण्यात समर्थ ठरली होती.

उदारमतवादी तत्त्वप्रणालीचे संरक्षण कवच केव्हाच गळून पडले आहे, हे सद्दाम हुसेन यांनी जाणले होते. या घटनेपासून त्याने एक निष्कर्ष काढला. तो म्हणजे 'राष्ट्रीय विकास' ही शुद्ध फसवणूक आहे. तेलखाणींनी समृद्ध असलेल्या इराकसारख्या राष्ट्रालाही ती अशक्य कोटीतली गोष्ट आहे. जगात बलशाही राष्ट्रांतील क्रमवारी केव्हाच ठरून गेली होती. त्या राष्ट्रांतर्गत एक उतरंडही (hierarchy) तयार झालेली होती. या रचनेत बदल करावयाचा झाला तर एकच मार्ग उपलब्ध होता. पृथ्वीच्या दक्षिण गोलार्धात महान सैनिकी सत्तेची उभारणी केली तरच ती प्रस्थापित रचना बदलणे शक्य होते. सरतेशेवटी अरब राष्ट्रांचा जो महासंघ तयार झाला असता त्याचे आपण बिस्मार्क आहोत या स्वरूपात सद्दाम हुसेन स्वत:कडे पाहातो. हा बिस्मार्क अर्थात ज्या जर्मनीत प्रबोधनाची प्रक्रिया पूर्ण झालेली आहे त्या जर्मनीच्या बिस्मार्कसारखा, सनातन-तत्त्वप्रणाली मान्य करणारा बिस्मार्क नाही. याउलट हा नवा 'बिस्मार्क' प्रस्थापित झालेल्या आंतरराष्ट्रीय आहेरे राष्ट्रांच्या साखळी विरुद्ध फारच बिकट अशी झुंज घेणारा नेता आहे. सद्दाम हुसेन यांच्या उपरोक्त व्यूहरचनेत अनुस्यूत असलेल्या व्यूहरचनेतले पहिले पाऊल म्हणजे इराकने केलेली कुवेतवरची स्वारी. ही स्वारी यशस्वी झाली असती तर मग इराक हे राष्ट्र दक्षिण गोलार्धातील प्रबळ अशी सैनिकी सत्ता ठरणार होतेच. पण या शिवाय आणखी एक फायदा इराकला प्राप्त होणार होता. कुवेत या राष्ट्राचे इराकच्या डोक्यावर प्रचंड कर्ज आहे. या कर्जातून मुक्तता करून घेणे हाही या स्वारीचा अनुषंगिक फायदा होता. त्याचबरोबर कुवेतच्या राजधानीत लुटालूट करून आणखी धन पदरात पडणार होतेच.

ही निर्भेळ व्यवहारी राजकारणातील एक खेळी आहे असे जर मानले तर मग त्या मागचा हिशेब व त्याचे तपशील यांची तपासणी करणे आवश्यक ठरते. सद्दाम हुसेन ही स्वारी करून

जे धोके पत्करणार होता, त्याचे मूल्यमापन त्याने कसे केले असावे? अथवा त्याचा ताळेबंद त्यांने कसा तयार केला असावा? म्हणजेच आपणास विजय मिळण्याची शक्यता किती आहे या संबंधात त्याने काय अंदाज केला होता? त्याने पुढीलप्रमाणे स्वत:शी युक्तिवाद केला असावा. नजीकच्या भविष्यकाळात इराकला विजयाची पन्नास टक्के शक्यता होती. ही शक्यता आणखी एका गृहीतावर आधारीत होती. इराकने कुवेतवर केलेल्या स्वारीबद्दल प्रतिक्रिया व्यक्त करताना, अमेरिका थोडीशी चालढकल करणारच. प्रत्यक्षात तसे झाले नाही हा भाग वेगळा. इराकने स्वारी केली व ते राष्ट्र यशस्वी झाले...... आणि मग अमेरिका प्रतिकारास सज्ज झाली. तर मग अमेरिका, आपण काहीही झाले तरी संपूर्णत: जिंकणार नाही, अशा विचित्र कोंडीत सापडली असती. 'व्यवहारी राजकारण' करणाऱ्या नेत्यांच्या दृष्टीने संभाव्य धोके व त्यांचा तपशील ध्यानात घेतल्यानंतर कुवेतवर स्वारी करण्यास उत्तम संधी आहे असे त्यास वाटले असल्यास त्यात काहीच नवल नाही.

सद्दाम हुसेन यांची पन्नास टक्के विजयाची खात्री असलेली जुगारी खेळी त्यांच्या अगदी सर्वस्वी आंगलट आली. याचे प्रमुख कारण अमेरिकेने आपले जास्तीत जास्त सैनिकी सामर्थ्य वापरात आणून आपली प्रतिक्रिया व्यक्त केली होती. अमेरिकेचा पराभव होण्याची सुतराम शक्यता अर्थातच नव्हती. या युद्धामुळे इराक या राष्ट्राचा एक राष्ट्र म्हणून फारच मोठा शक्तिपात झाल्याकारणाने, ते आता एक कमकुवत राष्ट्र झाले आहे हे खरे. तो त्या युद्धाचा एक महत्त्वाचा परिणाम. परंतु अमेरिकेला वाटले होते तेवढ्या प्रमाणात इराकला सर्वस्वी जमीनदोस्त करणे तिला साध्य झालेले नाही. इराक हे जरी आता कमकुवत राष्ट्र बनले असले तरी इ. स. १९८९ साली मध्य पूर्वेत जी राजकीय परिस्थिती होती, त्यात मुलभूत स्वरूपाचा बदल झालेला नाही. जी राजकीय परिस्थिती इ. स. १९८९ पूर्वी होती, तशीच ती आजही आहे. परंतु त्यात एक महत्त्वाचा फरक या कुवेत युद्धामुळे झालेला आहे. अरब राष्ट्रांनी व्यापलेला जो भूप्रदेश आहे त्या क्षेत्रातील अमेरिकेच्या जबाबदारीत फारच प्रचंड अशी भर पडलेली आहे. या उलट या विभागात जे राजकीय ताण-तणाव असतील त्यांचा निचरा व्हावा यासाठी जे राजकीय बदल आवश्यक आहेत, ते झालेले नाहीत. याबाबतची परिस्थिती जी पूर्वी होती तशीच अजूनही आहे. थोडक्यात सांगावयाचे झाल्यास, नजिकच्या भविष्यकाळात घडामोडी काहीही होवोत, सध्यातरी, जगात कोठेही तणाव निर्माण झाला तर त्याचा निचरा व्हावा यासाठी पूर्वी अमेरिकेकडे जे बळ होते, ते आता तिच्याकडे नाही ही वस्तुस्थिती आहे. जागतिक आहेरे-नाहीरे राष्ट्रांची व्यवस्था जी सुस्थापित झाली आहे, त्या व्यवस्थेत काही बेबनाव झाला, तर अमेरिकेने मध्यस्थाची भूमिका घ्यावी अशी अपेक्षा होती व अमेरिकेला तसा मानही होता. परंतु जागतिक बाजारपेठेत जपान आणि युरोपियन कम्युनिटी या दोन घटकांबरोबर आर्थिक स्पर्धा करताना अमेरिकेच्या नाकात दम आलेला आहे. म्हणूनच एक मान्यवर मध्यस्थ असे अमेरिकेचे पूर्वी जे स्थान होते, त्याचा महिमा हळूहळू कमी होणारच होता. यापुढेही सातत्याने तो कमी-कमी होत जाणार आहे.

दूरवरच्या भविष्यकाळाचा विचार करता, कोठचा प्रश्न अजून अनिर्णित आहे? असा प्रश्न कोणी उपस्थित केल्यास त्याचे उत्तर पृथ्वीच्या उत्तर गोलार्धात जे काही घडेल त्यावर ते अवलंबून नाही. उत्तर गोलार्धात कशा प्रकारे विकास होईल व तो काय असेल या संबंधात भविष्य वर्तविणे तसे सोपे आहे. जागतिक अर्थव्यवस्थेत पुन्हा एकदा जी उलथापालथ दीर्घकाळ टिकेल असा बदल ज्यावेळी होईल, तेव्हा त्या अर्थव्यवस्थेचे चित्र सामान्यपणे पुढीलप्रमाणे असेल. उत्तर गोलार्धातील अर्थव्यवस्था दोन आसाभोवती फिरताना आढळेल. या जगतात दोन महान शक्तिशाली अशी केंद्रे असतील. जपान–अमेरिका या आसाभोवती फिरणारे एक केंद्र. या गटात चीनला सामील करून घेण्यात येईल. सर्व युरोपियन राष्ट्रांच्या आसाभोवती फिरणारे दुसरे केंद्र. या आसाभोवती फिरणाऱ्या अर्थव्यवस्थेत रशियाला सामील करून घेण्यात येईल. थोडक्यात जपान–अमेरिका–चीन एका बाजूला, तर सर्व युरोपीय राष्ट्रे व रशिया हा एका वेगळ्या गटात, अशी जागतिक विभागणी झालेली ही अर्थव्यवस्था असेल. या दोन्ही गटांच्या केंद्रस्थानी ज्या सत्ता असतील, त्या नव्याने विस्तार पावण्याचा प्रयत्न करतील. त्यातून नव्या स्वरूपाचे हेवेदावे निर्माण होणे हेही अटळ आहे. या दोन्ही केंद्रांपैकी प्रत्येक केंद्र आपल्या सीमारेषेवर असलेल्या राष्ट्रांचा विकास कसा होईल यावरच खास करून भर देईल. उदा. जपान–अमेरिका चीनचा विकास कसा होईल याकडे खास लक्ष पुरवतील. युरोपीय राष्ट्रे रशियाच्या विकासाबद्दल जागरूक राहातील. थोडक्यात दक्षिण गोलार्धात असलेली राष्ट्रे व देश हे एकसारखे मागे लोटले जाणार आहेत. अर्थातच याला अपवाद करणारा या ना त्या ठिकाणचा एखादा देश असेल याबद्दलही शंका नाही.

ही जी आर्थिक प्रसरणशीलता असेल त्याचा राजकीय परिणाम म्हणून पृथ्वीच्या उत्तर–दक्षिण गोलार्धातील आजवर विद्यमान असलेला संघर्षही उग्र स्वरूप धारण करील. आपण येथवरच्या विवेचनात असे पाहिले आहे की, उत्तर गोलार्धाने हा विद्यमान संघर्ष शाबूत राहावा व त्यावर नियंत्रण असावे यासाठी त्यांच्याकडच्या तत्त्वप्रणालीत अनुस्यूत असलेली हत्यारे आजवर होती ती तो आता गमावून बसलेला आहे. म्हणूनच या अशा परिस्थितीत, दक्षिण गोलार्धातील राष्ट्रे आणि त्यांना पाठिंबा देणारे इतर लोक जुन्या भाषेत सांगावयाचे झाल्यास, जगातील कामगारवर्ग, – हे आपल्याला ज्या भावी व संभाव्य संघर्षास सामोरे जावे लागणार आहे, त्यासाठी एक नवे तत्त्वप्रणालीत्मक परिमाण नव्याने शोधणार आहेत का? हा खरा प्रश्न आहे.

समाजवादी आणि साम्राज्यशाही विरोधी तत्त्वामध्ये काही तत्त्वप्रणालीत्मक संविधाने अनुस्यूत होती. विशेषत: गेल्या काही वर्षांच्या बाबतीत हे निश्चितपणे म्हणता येते. या तत्त्वप्रणालीत्मक संविधानातील चैतन्य आता पार निघून गेलेले आहे. संघर्ष करण्यासाठी तीन प्रमुख मार्ग विद्यमान परिस्थितीत निर्माण झाल्याचे आपल्या दृष्टीस पडते. या संघर्षाच्या उपलब्ध तीन मार्गांपैकी प्रत्येक मार्गाने राष्ट्ररचनेच्या जागतिक पद्धतीत जो प्रभुत्व गाजविणारा वर्ग आहे, त्या वर्गासमोर अगदी ताबडतोबीच्या स्वरूपाच्या प्रचंड अडचणी निर्माण केल्या आहेत. तसे असले तरी संघर्ष

करण्याच्या या तीन मार्गांपैकी एकानेही मूलभूत स्वरूपाचे तत्त्वप्रणालीत्मक आव्हान खडे केलेले नाही. या संघर्षाच्या तीन मार्गांपैकी एकाचे वर्णन, नव-बिस्मार्कवादाचे आव्हान असे करता येईल. सद्दाम हुसेन यांची आक्रमकता हे या मार्गाचे एक उदाहरण. आजवर युरोपमध्ये प्रबोधन आणि ज्ञान-युग (enlightenment ) या दोन चळवळींनी प्रसारित केलेली मूल्ये ज्यात अंतर्भूत आहेत असो जो विश्वदृष्टिकोन होता, (Weltanschaung ), तो आता तिसऱ्या जगतात त्याज्य ठरविण्यात आलेला आहे. आजवर युरोपमध्ये आणि इतरत्रही या दृष्टिकोनास मान्यता होती व त्यावर श्रद्धाही होती. हा दृष्टिकोन आता मूलभूतरीत्या त्याज्य ठरविण्यात आलेला असून, आयतुल्ला खोमेनी यांच्या नेतृत्वाखाली ज्या शक्ती आहेत त्यांच्या ताकदीत आपणास याची प्रचीती येते. सामाजिक-भौगोलिक अशा दोन्ही पातळ्यांवर अभिसरण व्हावे, यासाठी वैयक्तिक पातळीवर प्रयत्न हे या संघर्षाचे आणखी एक स्वरूप. दक्षिण गोलार्धातून उत्तर गोलार्धात होणारे प्रचंड प्रमाणावरील लोकसंख्येचे स्थलांतर हे त्याचे उदाहरण. अर्थातच या स्थलांतरास उत्तर गोलार्धातील धनवान राष्ट्रांनी संमती दिलेली नाही. ते काहीही असो. हे वैधानिक नसलेले लोकसंख्येचे स्थलांतर, हा त्या तिसऱ्या प्रकारच्या संघर्षाचा प्रमुख आविष्कार आहे.

हे जे तीन प्रकारचे संघर्ष आहेत, त्यांच्या संबंधात दोन गोष्टी अगदी ठळकपणे दृष्टीस पडतात. एक येत्या पन्नास वर्षात, यातील प्रत्येक प्रकारच्या संघर्षाची व्याप्ती व प्रखरता अनेक पटीने वाढणार आहे. तसे होत असताना हे संघर्ष आपले आजवरचे जे सार्वत्रिक स्वरूपाचे असे राजकीय भान आहे ते जवळ जवळ गिळंकृत करणार आहेत. दुसरे या तीन्हीही प्रकारच्या संघर्षाबद्दल जगातले जे डावे बुद्धिवादी आहेत त्यांच्या प्रतिक्रिया या अत्यंत संदिग्ध आहेत. यातला संघर्षाचा कोठलाही प्रकार जोवर राष्ट्ररचनेच्या पद्धतीत प्रभुत्व गाजविणारा जो गट असतो त्यांच्या विरुद्ध तो संघर्ष असतो, अथवा जोवर एखादा संघर्ष या प्रभुत्व गाजविणाऱ्या गटाचे जीवन दु:खदायक करीत असतो, तोवर जगातले डावे बुद्धिवादी त्या संघर्षाला पाठिंबा देतात. या तीन संघर्ष पद्धतीतील कोठच्याही संघर्षात तत्त्वप्रणालीत्मक असा आशय नसतो. परिणामी ते संघर्ष राजकीय दृष्ट्या प्रगतीशील नसतात, उलट प्रतिगामी असतात. विशेषत: नजिकचा भविष्यकाळ लक्षात घेता ते प्रतिगामी असतात. अशा परिस्थितीत डावे बुद्धिवादी या संघर्षापासून नुसतेच दूर राहातात असे नव्हे तर चांगलेच दूर राहातात.

समाजात ज्या शक्ती डाव्या म्हणून ओळखल्या जातात, त्यांनी कोठच्या मार्गाची निवड करावयाची हा प्रश्न आहे? इ. स. १९८९ साल हा एका विशिष्ट सांस्कृतिक खंडाचे अखेरचे वर्ष. हा सांस्कृतिक कालखंड इ. स. १७८९ ते १९८९ असा दोनशे वर्षांचा आहे. विद्यमान युगात तत्त्वप्रणालीत्मक संविधाने कशा प्रकारची असण्याची शक्यता आहे? त्यांचा आशय वा उद्दिष्ट काय असेल? विश्लेषण आणि पृथक्करण या दोन पद्धतींचा अवलंब केला असता आपणास कोणते मार्ग शक्य कोटीतील असतील? असा कोणता मार्ग सुचविता येईल? जो सांस्कृतिक कालखंड नुकताच मागे पडला आहे त्या कालखंडात प्रभावी असे सूत्र कोठचे होते?

असा प्रश्न उपस्थित केल्यास, त्याचे उत्तर उघडच आहे. त्या कालखंडाचे आधुनिकीकरण हे प्रधान सूत्र होते. या सूत्राभोवती त्या कालखंडातील तत्त्वप्रणालीत्मक संविधान रचलेले होते. 'नाविन्य' हा त्या संविधानाचा प्रमुख गुण होता. तसेच राजकीय व सामाजिक या दोन्ही क्षेत्रात होणारा बदल ही नेहमीच मान्यवर अशी गोष्ट समजली जात होती. आपण असाही युक्तिवाद करण्याचा प्रयत्न केला की या संविधानातील घटनांचा शेवट सरतेशेवटी उदारमतवाद एक तत्त्वप्रणाली म्हणून विजयी होण्यात झाला होता. हा विजय तसा झटपट प्राप्त झालेला नव्हता. तर्कशुद्ध विचारांची परिणती व धीमी वाटचाल करून, ते घडले होते. उदारमतवादाचा विजय या शब्दप्रयोगाला एक विशिष्ट अर्थ आहे. मानवी जाणिवांनी जी राजकीय व्यूहरचना केलेली होती त्याचा तो विजय होता. समाजात राजकारणाचे म्हणून जे क्षेत्र मानले जाते, ते अपरिहार्यपणे निर्दोष होऊन परिपूर्णतेला पोचेल. बुद्धिजन्य सुधारणांकरवी ही परिपूर्णता प्राप्त होईल अशी अपेक्षा त्या उदारमतवादाच्या विजयात अनुस्यूत होती. परंतु भांडवलशाहीची जी जागतिक अर्थव्यवस्था होती, तिच्या चौकटीत राहून, राजकारणाचे म्हणून जे क्षेत्र समजले जात होते, त्यात परिपूर्णता न येण्यात त्या चौकटीच्या अंगभूत अशा मर्यादा कारणीभूत होत्या. अर्थात या अंगभूत मर्यादा कोणी मान्य केल्या नव्हत्या हेही तितकेच खरे आहे. उदारमतवाद ही तत्त्वप्रणाली शक्य कोटीतल्या अंतिम मर्यादेपर्यंत पोचली आहे, हे युरोप-अमेरिकेतील इ. स. १९६८ व इ. स. १९८९ या दोन सालातील घटनांनी सिद्ध केले आहे. थोडक्यात या तत्त्वप्रणालीची आजवरची जी कार्यक्षमता होती तीच आता ती गमावून बसली आहे.

आपण आता एका नव्या कालखंडात प्रवेश करीत आहोत. या कालखंडाचे वर्णन भांडवलशाही—जागतिक अर्थव्यवस्थेचे विघटन, अशा शब्दात करता येईल. 'एक नवी जागतिक व्यवस्था' निर्माण करण्याचा जो सध्या उद्घोष होतो आहे तो केवळ 'शब्द बापुडे केवळ वारा' याच स्वरूपाचा आहे. त्या घोषणेवर जवळ जवळ कोणीच विश्वास ठेवीत नाही. ते काहीही असो. 'एक नवी जागतिक अवस्था' प्रत्यक्ष वस्तुस्थिती महणून सिद्ध होणे, ही जवळ जवळ अशक्य कोटीतली गोष्ट आहे. धीम्या गतीने हळूहळू पण नक्की होणारी प्रगती हा विचार आता मागे पडला आहे. पूर्वी ही अशी प्रगती होणारच आहे असे गृहीत धरले जात होते. 'विघटन हे अटळ आहे', असे विद्यमान परिस्थिती आपणास सांगते. या संभाव्यतेस आपणास सामोरे जावयाचे आहे. या अशा परिस्थितीत कोणत्या नव्या तत्त्वप्रणालींचा उदय होईल? कोणत्या तत्त्वप्रणाली प्रत्यक्ष अस्तित्वात असतील? उदारमतवाद या तत्त्वप्रणालीत 'व्यक्तीला' 'हिरोचे' स्थान होते. परंतु विद्यमान काळी राजकीय, सामाजिक व आर्थिक संरचनेचे जे विघटन होत आहे, त्या परिस्थितीत 'व्यक्तीला' कोणतीही लक्षणीय व महत्त्वाची भूमिका असणार नाही हे ओघानेच आले. याचे कारण असे आहे की, वर उल्लेखिलेल्या संरचनांचे विघटन होत आहे, अशा परिस्थितीत कोणत्याही व्यक्तीला 'व्यक्ती' म्हणून फार काळ टिकाव धरून राहाता येणार नाही. म्हणून 'हिरो' कोण याला एकच पर्याय आहे. या अशा परिस्थितीत जो गट 'शक्ती, बळ व

आसरा' प्राप्त करून घेण्यासाठी समाजातले आपले स्थान, आपल्या स्वत:च्या ताकदीवर मिळविण्याइतका मोठा व शक्तिशाली असतो, तोच 'हिरो' ठरतो. या विद्यमान युगापूर्वी येऊन गेलेल्या कालखंडात जागतिक अशा राजकीय आणि आर्थिक व्यवस्थेत 'गटाचे व्यक्तित्व' (Group Identity) ही संकल्पना व विचार कोणासही परिचित नव्हती. आधुनिक-जागतिक-पद्धतीत तिचा परिचय झाला होता. आता 'गटाचे व्यक्तित्व' ही संकल्पना व अनुषंगिक विचार हा अग्रस्थानी आलेला आहे. हे केवळ अपघाताने वा योगायोगाने घडलेले नाही.

'गट' या संकल्पनेच्या आधारानेच आपण विचार करणार असलो, तर मग अनेक गोष्टी विचारात घ्याव्या लागतील. एकतर प्रत्यक्षात हे गट अनेक प्रकारचे आहेत हे खरे, परंतु ते तसे स्पष्टपणे अगदी अलगही करून दाखविता येणार नाहीत. त्यातले अनेक गट फारच गुंतागुंतीच्या प्रकारे अनेक बाबतीत एकमेकात सारखेपणा दाखवितात. तसे पाहिले तर आपण सर्वच जण या असंख्य गटातील अनेक गटांचे सदस्य आहोत. आपल्यातले अनेकजण चांगलेच सक्रिय असे सदस्य असण्याचीही शक्यता आहे. परंतु 'गट' ही संकल्पना या विवेचनाचे मध्यवर्ती सूत्र आहे असे सांगून त्यानुसार केवळ विचार करून भागणार नाही. इ. स. १७८९ ते १९८९ या दोनशे वर्षांच्या कालखंडात, समाजवादी आणि उजवे सनातन पक्षीय या दोघांचे ध्येय व उद्दिष्ट तसे पाहिले तर एकच होते. त्यात ते यशस्वी झाले नाहीत हा भाग वेगळा. आपल्या पसंतीच्या गटाला सामाजिक महत्व असावे आणि त्याच्याकडेच समाजाचे नेतृत्व असावे, अशी समाजव्यवस्था प्रस्थापित करणे, हेच या दोन्ही गटांचे उद्दिष्ट होते. काही निश्चित व विशिष्ट अशा सामाजिक गटाकडे हे नेतृत्व असले पाहिजे, असे जो उजवा-सनातन-गट होता त्याच्या मनात होते. याउलट 'जनतेचा समूह' हा एकमेव व विशिष्ट असा जो गट असेल त्याकडे हे नेतृत्व असावे असे समाजवाद्यांचे सांगणे होते. आपल्या विवेचनाला राजकीय तत्त्वप्रणालीचा संदर्भ असणे आवश्यक आहे. अशी जोड दिल्याशिवाय आपल्या विवेचनाला परिपूर्णता प्राप्त होणार नाही. सामाजिक चलन-वलन होण्यात, आपण ज्या राजकीय तत्त्वप्रणालीचा संदर्भ वापरणार आहोत व त्याची जोड आपण आपल्या विवेचनास देणार आहोत, त्यात हे गट प्रमुख व महत्त्वाची भूमिका पार पाडणार आहेत हे अनुस्यूत असावयास हवे.

येथवर जे विवेचन केलेले आहे व जो विचार मांडलेला आहे, तो दोन भिन्न अशा तत्त्वप्रणालींच्या आधारे सुसंगतपणे मांडून दाखविता येईल. सध्यातरी तेवढीच शक्यता, कल्पनेच्या पातळीवर आहे. याचे कारण आजमितीला, त्या दोन भिन्न तत्त्वप्रणालींपैकी एकाही तत्त्वप्रणालीने जगात घडत असलेल्या घटनांचे पूर्णपणे स्पष्टीकरण करून दाखविलेले नाही. 'जो गट सर्वात जास्त लायक व तंदुरुस्त तोच जगेल' या तत्त्वात गुणीपणा व वैधानिकता अंतर्भूत आहे, असा विचार कोणी मांडीलही. जुन्या वंशवादाचा (Racism) हा नवा अवतार आहे. या नव-वंशवादात वर उल्लेखिलेल्या तत्त्वाचा जोरदार पुरस्कार करण्यात येतो. व वंशवाद या तत्त्वप्रणालीचे जे समर्थक आहेत, ते आपल्या विचारात हे तत्त्व व सूत्र एका नव्या आक्रमकतेने

उद्‌घोषित करतात. अर्थात हा विचार मांडताना ते जुन्या वांशिक शुद्धतेचे आवरण घेत नाहीत. गुणवत्तेला प्राधान्य या घोषवाक्याचा अंगरखा घेऊन ते नववंशवादाचा पुरस्कार करताना आढळतात. जुन्या बंदिस्त अशा सामाजिक गटांच्या आधारे आपल्या प्रतिपादनाचे समर्थन नव-वंशवादी करतातच असेही नाही. राष्ट्र अथवा कातडीचा रंग ही झाली जुन्या बंदिस्त अशा सामाजिक गटांची दोन प्रमुख उदाहरणे. विद्यमान जगात नवे सामर्थ्यशाली गट तयार झालेले आहेत. त्यांच्या संघटनेमागे, राष्ट्र, कातडीचा रंग असले कोणतेही सूत्र नाही. परंतु ते सामर्थ्यवान आहेत हाच त्यांचा 'गुण'. ही नव-वंशवादी तत्त्वप्रणाली आपणास असे बजावते आहे की या नव्या सामर्थ्यशाली गटांनी आजवर जी लूटमार केलेली आहे तो त्यांचा हक्कच आहे आणि आपल्या राष्ट्रांच्या परिसीमात, त्या तटबंदीमुक्त किल्ल्यात त्या लुटींचे रक्षण करणे हाही हक्क त्यांना आहे. नव-वंशवादाचे समर्थक वरील युक्तिवाद या ना त्या प्रकारे करीत असतात.

या जगातील उत्तर गोलार्धातील श्रीमंत राष्ट्रे आणि दक्षिण गोलार्धातील गरीब राष्ट्रे या राष्ट्रातील संबंधातील प्रश्नासंबंधीचा उल्लेख यापूर्वी आला आहेच. या उत्तर गोलार्धातील राष्ट्रात नव-वंशवाद (याचेच दुसरे नाव नव-बिस्मार्कवाद) आणि प्रस्थापितांना विरोध (समाजवादी विचारसरणी) यांचा जो संघर्ष चालू होता त्याचाही विचार आपण केलेला आहे. या दोन्हीही तत्त्वप्रणालींनी दक्षिण गोलार्धात जी धडक घेतली त्या संबंधात विचार केला असता काय आढळून येते? जे आढळते, ते असे की दक्षिणेकडचे जे 'आहेरे' आहेत त्यांनी उत्तरेकडच्या आपल्या वैचारिक पूर्वसूरींबरोबर समझोता करण्याचे ठरविले आहे. असे करून त्यांनी सामर्थ्यशाली राष्ट्रांनी उभारलेले जे किल्ले आहेत, त्यात आणखी एकाची भर घातली आहे. अरब-इस्लामी राष्ट्रांनी गेली पंधरा वर्षे जे राजकारण केले आहे, त्यातून हे स्पष्टपणे दिसून येते. खोमेनी या धर्मगुरूंने पाश्चिमात्यांना जोरदार आव्हान दिले. या आव्हानाचे स्वरूप काय होते याची पाश्चिमात्यांना योग्य कल्पना होती. खोमेनीच्या विरोधात इराकचे सद्दाम हुसेन होते. जगातील राष्ट्रांपैकी जी सामर्थ्यशाली राष्ट्रांच्या गटात होती, त्या सर्वांनी सद्दाम हुसेन यांना पाठिंबा दिला, आणि त्यास अधिक सामर्थ्यशाली होण्यास मदत केली. परंतु सामर्थ्यशाली राष्ट्रे जगाची जी लूटमार करीत होते त्या लुटीतला फार मोठा हिस्सा आपल्या स्वत:कडे राहावा यासाठी सद्दाम हुसेन यांनी आग्रह धरला. त्या उद्दिष्टाच्या परिपूर्तीसाठी त्यांनी पाऊले उचलल्याबरोबर त्यांचे एकेकाळचे पाठीराखे त्यांच्या विरुद्ध फिरले. आणखीही एक उल्लेखनीय घटना घडली. खोमेनींचे जे वारसदार होते, ते पुन्हा एकदा सामर्थ्यशाली राष्ट्रांच्या कळपात सामील झाले. एवंच उत्तर-दक्षिणेकडची राष्ट्रे आपल्या निष्ठा किती झटपट बदलतात हे यावरून लक्षात यावे. या सर्व घडामोडीतून आणखी एक मुद्दा स्पष्ट होतो. तो म्हणजे या जगातल्या सामर्थ्यशाली राष्ट्रांचा जो गट आहे, त्यांच्या राजकारणाबद्दल या घडामोडी बरेचसे काही सांगून जातात. एकतर ही सामर्थ्यशाली राष्ट्रे मानवी हक्कांचा जो उद्‌घोष करतात, त्या संबंधात आपण किती व्यथित आहोत हे दर्शवितात, ते सारे काठोकाठ किती दंभाने भरलेले आहे हे त्यांच्या वागण्यावरून

सिद्ध होतेच. या शिवाय ते, खोमेनी आणि त्यांचा गट, सद्दाम हुसेन यांच्या नेतृत्वाखालची बाथ पार्टी या सर्वांबद्दलही त्या घटना व ते वागणे बरेचसे काही सांगून जाते.

'जो लायक तोच जगेल' हे तत्त्व अनुस्यूत असलेल्या तत्त्वप्रणालीला पर्यायी तत्त्वप्रणाली नाही का? अशी पर्यायी तत्त्वप्रणाली आहे. विद्यमान काळाला विघटनांचे युग म्हणून संबोधिता येईल याचा उल्लेख या अगोदर आला आहेच. या युगात काही सामाजिक गट हे प्राथमिक महत्त्वाचे (Primary) गट आहेत. या अशा गटांना मध्यवर्ती स्थान देऊन या पर्यायी तत्त्वप्रणालीची उभारणी करता येईल. भविष्यकाळातील जगात जी नवी सामाजिक व आर्थिक संरचनेची उभारणी संकल्पित आहे, त्या समाजव्यवस्थेतही अनेक सामाजिक गट असणारच. या पर्यायी तत्त्वप्रणालीनुसार, या सर्व सामाजिक गटांना या नव्या संकल्पित समाजव्यवस्थेत, निर्माण झालेल्या संपत्तीतला आपला वाटा प्राप्त करून घेण्याबाबत समान हक्क असतील. याजबरोबर यातला कोणताही सामाजिक गट, हा खास आगळा-वेगळा आहे, इतर गटांपेक्षा तो भिन्न पातळीवर आहे असे मानले जाणार नाही, याही तत्त्वाला मान्यता असेल. भविष्य काळातील जागतिक समाजात, जे सामाजिक गट असतील त्यांची सामाजिक वीणही एकप्रकारे गुंतागुंतीची असेल. भविष्यकाळातील जगात आम कृष्णवर्णीयांचा एकच गट असणार नाही. प्राथमिक महत्त्वाचे मानले जातील अशा काही गटांचा विचार करू या. उदा. सर्व कृष्णवर्णीय स्त्रियांचा समावेश त्या कृष्णवर्णीय गटांत नक्कीच असेल; पण सारेच कृष्णवर्णीय हे स्त्रिया नाहीत हे लक्षात ठेवले पाहिजे. कृष्णवर्णीयांच्या गटात जगातले सर्व कृष्णवर्णीय मुसलमान असतील, पण सारेच मुसलमान हे कृष्णवर्णीय नाहीत हे लक्षात ठेवले पाहिजे. काही मुसलमान बुद्धिजीवी जरूर आहेत. पण अनेक मुसलमान बुद्धिजीवी नाहीत. ही अशा प्रकारची गुंतागुंत असलेल्या उदाहरणांची यादी चांगली भली मोठी होईल. या संकल्पित समाजव्यवस्थेत सगळ्याच सामाजिक गटांना व्यवहार करण्यासाठी खरोखरीचा पैसा निर्माण करणे आवश्यक आहे. पण असे करीत असताना त्यात आणखी एक मुद्दा अनुस्यूत आहे. तो म्हणजे प्रत्येक सामाजिक गटात, त्या गटाच्या म्हणून ज्या समस्या असतील, त्यासंबंधी व्यवहार करण्यासाठीही पैसा उपलब्ध असणे जरूरी आहे. प्रत्येक सामाजिक गटाला आपले स्वतःचे असे खास व्यक्तित्व (Identity) असणारच. पण त्याचबरोबर प्रत्येक गटाच्या व्यक्तित्वाचा भाग दुसऱ्या एखाद्या गटाच्या व्यक्तित्वाबरोबर मिळता-जुळता असणारच. प्रत्येक सामाजिक गट आपले अस्तित्व कायम टिकावे, यासाठी आपल्या गटाभोवती संरक्षक तटबंदी उभारणारच. याचा परिणाम म्हणून प्रत्येक सामाजिक गटात एक सामाजिक उतरंड (hierarchy) तयार होणार हेही ओघानेच आले. या सर्व सामाजिक गटांबाबत आणखीही एक महत्त्वाचा मुद्दा आपण लक्षात ठेवला पाहिजे. वर ज्याचा उल्लेख केला आहे, अशी बचावात्मक तटबंदी सामाजिक गटांनी उभारली नाही, तर त्यांचे सामाजिक अस्तित्वच संपुष्टात येईल.

एवंच, आपण सध्या इतिहासात सिद्ध झालेल्या ज्या समाजव्यवस्थेत वावरतो, तिचे विघटन

आपल्या डोळ्यासमोर होत आहे. अशा परिस्थितीत एक नवी डावी तत्त्वप्रणाली निर्माण करणे, हे आपण जे कोणी स्वत:स डावे समजतो—त्यांच्यासमोर खडे असलेले आव्हान आहे. हे काम सोपे नाही अथवा ते चुटकीसरशी साध्य होईल अशा प्रकारचेही नाही. इ. स. १७८९ नंतर ज्या युगास सुरुवात झाली, त्यानंतर त्या युगातील तत्त्वप्रणाली सिद्ध होण्यासाठी अनेक दशके गेली – हे या ठिकाणी ध्यानात ठेवले पाहिजे. विद्यमान काळात होत असलेल्या सर्वच घडामोडीत प्रचंड अशी बाजी लागलेली आहे. याचे कारण एखाद्या समाजव्यवस्थेचे जेव्हा विघटन होते, त्यावेळी सरतेशेवटी दुसरी एखादी समाजव्यवस्था त्यापूर्वीच्या समाजव्यवस्थेची जागा घेतेच. पद्धतशीर असे जे विद्यमान समाजव्यवस्थेचे विभाजन होणार आहे, त्या संबंधात आपणास एकच गोष्ट ज्ञात आहे. ती म्हणजे हे जे संभाव्य विभाजन व त्यात अनुस्यूत असलेले परिवर्तन आहे, ते अत्यंत पराकोटीला जाऊन, भिन्न-भिन्न दिशांनी आगेकूच करण्याचा संभव आहे. याचे कारण एखाद्या ठिकाणी एखादी घटना घडली, एखादी चळवळ उभारली गेली, तर त्याचे प्रचंड पडसाद उठणे व परिणाम होणे आज शक्य झाले आहे. नव्हे तसे पडसाद उठतात व परिणाम होतातच. आजवर तसे घडत नव्हते. आजवरची आधुनिक जागतिक राज्यव्यवस्था व पद्धती ही तशी नीट घडी बसलेली स्थिर व्यवस्था होती. निदान इ. स. १५०० सालपासून आजमितीला जागतिक राज्यव्यवस्थेच्या संबंधात हे विधान वाजवी ठरेल. या कालखंडात जगातील कोणत्याही ठिकाणी एखादी महान घटना घडली, महान चळवळ झाली, क्रांती झाली, तरी त्याचे पडसाद व परिणाम त्या मानाने अल्पच असत. इतिहासात सिद्ध झालेल्या भांडवलशाही समाजव्यवस्थेचे परिवर्तन, आणखी एखाद्या 'नव्या' समाजव्यवस्थेत होणे अपरिहार्य आहे. उदा. इ. स. २०५० साली कोठच्या प्रकारची जागतिक राजयव्यवस्था पद्धत अस्तित्वात असण्याची शक्यता आहे? जागतिक पातळीवर ती एकाच तत्त्वावर आधारीत असेल की बहुविध तत्त्वावर आधारलेली असेल? या दोन्हीही पर्यायांपैकी काहीही घडण्याचा संभव आहे. परंतु या संभाव्य नागरिक-राज्यव्यवस्था पद्धतीचे विभाजन दोन स्पष्ट अशा पद्धतीत होणार आहे. त्यातली एक समाजव्यवस्था फारच विषमता असलेली सामाजिक उतरंडीने परिपूर्ण अशी असेल. याउलट दुसरी अधिक करून लोकशाहीवादी, आणि समतेवर आधारलेली असेल. ही समताप्रधान राज्यव्यवस्थापद्धत ज्यांना अधिक स्वीकारार्ह वाटते, त्यांच्या कर्तृत्वावर व बुद्धीचातुर्यावर बरेचसे काही अवलंबून आहे. राजकीय बदल व समाजपरिवर्तन घडून यावे यासाठी त्यांनी अर्थपूर्ण अशी राजकीय व्यूहरचना करणे आवश्यक आहे. ही अशी व्यूहरचना करण्याचे बुद्धिचातुर्य या समतावादी परिवर्तन करणारांकडे किती आहे यावरच त्यांना अभिप्रेत असलेली समाजरचना अस्तित्वात येणे अवलंबून आहे.

भांडवलशाही स्वरूपाच्या जागतिक अर्थव्यवस्थेत एक तत्त्व अनुस्यूत आहे. या अर्थ-व्यवस्थेत बहुसंख्यांकांना आर्थिक वा इतर लाभ प्राप्त कसे होणार नाहीत यावर भर दिला जातो. या तत्त्वाच्या आधारेच ती अर्थव्यवस्था आपले अस्तित्व टिकवून धरते व आगेकूच करते. हे

शक्य व्हावे यासाठी या अर्थव्यवस्थेला काही गोष्टी करणे आवश्यक ठरते. उदा. या जगातला जो कामगारवर्ग आहे त्याला जागतिक भांडवलशाही अर्थव्यवस्थेत सामावून घेताना समाजातील प्रस्थापित अशी जी सामाजिक उतरंड आहे तीला धक्का लागणार नाही अशी काळजी घ्यावयाची. थोडक्यात या अर्थव्यवस्थेचे स्वरूप दुटप्पी आहे. एकीकडे समाजातील बहुसंख्याकांना अर्थव्यवस्थेत सामील करून घेतले आहे असे भासवावयाचे, पण प्रत्यक्षात त्यांना आर्थिक वा अन्य लाभापासून वंचित करावयाचे; अशी ती व्यवस्था होती. एकोणिसाव्या शतकात उदारमतवादी तत्त्वप्रणालीचा प्रभाव फार मोठा होता. जगातील सर्व प्रगत व औद्योगिक राष्ट्रात ती तत्त्वप्रणाली पसरली होती. परंतु याच तत्त्वप्रणालीमुळे जागतिक भांडवलशाहीच्या त्या दुटप्पी स्वरूपाच्या अर्थव्यवस्थेला बळकटी आली. समाजातील बहुसंख्यांकांना एकीकडे अर्थव्यवस्थेत सामील करून घेतले आहे असे दाखवावयाचे, पण प्रत्यक्षात त्यांना आर्थिक वा इतर लाभापासून वंचित करावयाचे, हे धोरण कसे योग्य व बरोबर आहे, याचे समर्थन त्या तत्त्वप्रणालीने केले. या अशा प्रकारे जगात ज्या या अर्थव्यवस्थाविरोधी शक्ती होत्या त्यांनाही उदारमतवादी तत्त्वप्रणालीने भांडवलशाहीच्या जोखडाखाली आणण्यास मदत केली. सुदैवाने तो कालखंड आता इतिहास जमा झाला आहे. आपण आता एक नवी व वेगळ्या प्रकारची जागतिक अर्थव्यवस्था कशी निर्माण करता येईल हे पाहाणे अत्यावश्यक आहे. या व्यवस्थेत पुढील घटक अंतर्भूत असतील. या व्यवस्थेत आत्मभान असलेल्या नव्या सामाजिक गटांची उभारणी करण्यात येईल. हे गट स्वतंत्र असले तरी एकमेकांशी निगडित असतील याची जाणीवही ठेवण्यात येईल. या अर्थव्यवस्थेतून ज्या सुविधा निर्माणा होतील त्यात सर्व गटांना योग्य वाटा असेल याची काळजी घेतली जाईल. या नव्या सामाजिक गटव्यवस्थेबाहेरही जे कोणी राहतील त्यांनाही या सुविधांपासून वगळण्यात येणार नाही.

येता काळ विघटनाचा आहे. भांडवलशाही अर्थव्यवस्थाविरोधी जी व्यूहरचना संकल्पित आहे, ती स्पष्ट, रेखीव व नक्की स्वरूपाची असावयास हवी. या अशा प्रकारच्या व्यूहरचनेच्या आखणीस व विकसनास किमान वीस वर्षे तरी जाऊ द्यावी लागतील. आपणास सध्या एकच गोष्ट करता येईल. ती म्हणजे, या व्यूहरचनेत जे काही सामाजिक घटक सामील होण्याची शक्यता आहे त्यांची यादी तयार करता येईल. असे करताना हे सारे घटक संकल्पित अर्थव्यवस्थेच्या आराखड्यात अगदी फिट्ट कसे बसतील याची खात्री देता येणार नाही. तसेच आपण पेश केलेली यादी ही परिपूर्ण आहे, याबद्दल आग्रहही धरता कामा नये.

समता प्रस्थापित करण्यासाठी एकोणिसाव्या शतकात ज्या व्यूहरचना करण्यात आल्या, जे डावपेच वापरण्यात आले, त्यात एका घटकाला खास करून स्थान होते. तो घटक म्हणजे, मध्यवर्ती राजकीय सत्ता हस्तगत करून, त्याकरवी सामाजिक परिवर्तन घडवून आणावयाचे. हे उद्दिष्ट नजरेसमोर ठेवून, त्या व्यूहरचना व डावपेच यांची आखणी होत असे. भविष्यकाळातील संकल्पित व्यूहरचनेत या घटकाला स्थान असणार नाही. याचा अर्थ असा नव्हे की मध्यवर्ती

सत्ता हाती असणे कधीही उपयोगी पडत नाही. परंतु त्याजबरोबर हेही स्पष्ट आहे की त्या सत्तेकरवी सामाजिक परिवर्तन कधीही घडवून आणता येत नाही. एखाद्या राष्ट्राच्या पराकोटीच्या परंपरावादी-उजव्या गटाच्या दडपशाही व अत्याचार करणाऱ्या शक्तींना रोखण्यासाठी मध्यवर्ती सत्तेचा उपयोग जरूर होतो. म्हणूनच त्या विशिष्ट परिस्थितीत एक बचावात्मक डावपेच म्हणून, मध्यवर्ती सत्ता हस्तगत करणे आवश्यक ठरेल. परंतु मध्यवर्ती सत्ता, सर्व ठिकाणी, सर्व वेळी हस्तगत केल्याने सामाजिक परिवर्तनाचे उद्दिष्ट सफल होणार नाही हेही लक्षात ठेवले पाहिजे. मध्यवर्ती सत्ता ही एक तात्पुरत्या स्वरूपाची व्यवस्था आहे याची जाण असावयास हवी. मध्यवर्ती सत्ता हस्तगत केली की मग अस्तित्वात असलेली जागतिक अर्थव्यवस्था ही वैध व योग्य आहे (Legitimate ) या विचारास पुन्हा एकदा मान्यता मिळण्याचा धोका सदैव असतो. मध्यवर्ती सत्ता हस्तगत केलीच पाहिजे या मुद्यावर उदारमतवादी तत्त्वप्रणालीशी म्हणूनच फारकत करून घ्यावयास हवी. जगातील 'नाहीरें' चे विश्व आहे, व त्या ठिकाणी ज्या शक्ती प्रस्थापित व्यवस्था-विरोधी आहेत, त्यांना हा असा निर्णय घेणे महाकठिण आहे याबद्दल शंकाच नाही. येथवर उदारमतवादी तत्त्वप्रणाली कशी कोसळून पडत आहेत याचे विवेचन येऊन गेले आहे. तसे असले तरी 'मध्यवर्ती सत्ता' हस्तगत करणे अत्यावश्यक आहे हा जो उदारमतवादी तत्त्वप्रणालीचा मुद्दा आहे त्या मुद्यावरून त्या तत्त्वप्रणालीशी फारकत करून घेताना अतिशय कष्ट पडणार आहेत.

एकोणिसाव्या शतकातील ही व्यूहरचना व डावपेच यांच्याशी फारकत करून घेण्याच्या निर्णयात आणखी एक मुद्दा अनुस्यूत आहे. तो म्हणजे जगातील अर्थव्यवस्थेत भविष्यकाळात ज्या अडचणी निर्माण होतील, त्या सोडविण्यासाठी हातभार लावण्याची आपणास अजिबात इच्छा नाही. विद्यमान जागतिक अर्थव्यवस्थेत प्रभुत्व गाजविणारे जे गट आहेत, त्यात दिवसेंदिवस अधिक अधिक प्रमाणात अंतर्विरोध निर्माण होत आहेत. त्यामुळेच त्या गटांसमोर राजकीय पेचप्रसंग उभे राहातात. जागतिक अर्थव्यवस्थेतही प्रस्थापित व्यवस्था-विरोधी (Anti systemic ) गट आहेत, त्यांचे काम ते पेचप्रसंग सोडविणे हे नाही. सामान्य जनतेतील गटांनी एकमेकांना साहाय्य जरूर केले पाहिजे. परंतु प्रस्थापित समाजव्यवस्थेत सुधारणा करण्यासाठी कृती करण्यापेक्षा एकमेकास साहाय्य करणे, ही कृती सर्वस्वी वेगळी आहे. उदारमतवादी तत्त्वप्रणाली ज्या काळी ऐन भरात होती, त्या काळात प्रस्थापित व्यवस्थाविरोधी सर्व शक्ती—अगदी कडव्या व्यवस्थाविरोधी शक्ती देखिल—नेमक्या याच सापळ्यात अडकल्या होत्या.

या ऐवजी प्रस्थापित व्यवस्थाविरोधी शक्तीने वेगळ्याच गोष्टींवर भर घ्यावयास हवा. हरएक प्रकारच्या समाजातील नानाविध परिवारांच्या पातळीवर खऱ्याखुऱ्या गटांचा विकास कसा होईल यावर त्यांनी लक्ष केंद्रित केले पाहिजे. तसेच एका वरच्या पातळीवर हे गट कसे संघटित होतील व त्यात एकछापीपणा येणार नाही यासाठी प्रयत्न केले पाहिजेत. प्रस्थापित व्यवस्थाविरोधकांनी या ठिकाणी हे लक्षात ठेवावयास हवे की अशा प्रकारे संघटित केलेले गट, हे त्रिकालबाधित

सत्य नव्हे. या गटांच्या पुनर्रचनेची, पुनर्बांधणीची प्रक्रिया सातत्याने चालू राहाण्यासाठी एकोणिसाव्या शतकातील प्रस्थापित व्यवस्थाविरोधी शक्तींनी एक मूलभूत चूक केली. त्यांनी एका चुकीच्या तत्त्वावर श्रद्धा ठेवली. या श्रद्धेनुसार एखादी समाजरचना ही जितकी संघटीत-ऐक्यवर्धक तितकी ती अधिक कार्यक्षम. मध्यवर्ती सत्तासंपादनाची व्यूहरचना व तिचे डावपेच हे उदारमतवादी तत्त्वप्रणालीचे जे प्रधान सूत्र आहे त्याच्याशी ती श्रद्धा मिळती-जुळती होती. त्या श्रद्धेनुसार सामाजिक संघटन-ऐक्य हे तर्कसंगत होते. याच श्रद्धेमुळे मुळातील समाजवादी तत्त्वप्रणालीचे उदारमतवादी-समाजवादी तत्त्वप्रणालीत परिवर्तन अगदी सहजपणे घडून आले. भविष्यकाळात कशाची गरज असेल तर ती लोकशाहीवादी सर्वंकष मध्यवर्ती सत्तेची (Democratic Centralism) ची नाही. त्या व्यवस्थेच्या अगदी विरुद्ध अशी जी व्यवस्था असेल त्या व्यवस्थेची आवश्यकता आहे. समाजात अनेक खरेखुरे गट संघटीत केले पाहिजेत याचा उल्लेख येऊन गेलाच आहे. स्थानिक पातळीपेक्षा राज्य, विभाग व जागतिक या पातळ्यांवर परस्परात बंधुभाव – ऐक्यभावना निर्माण करणे हे त्यानंतरचे उद्दिष्ट. अधिक सूक्ष्मात जाणारी (Subtle), अधिक लवचिक आणि स्थानिक परिस्थितीतून वर आलेल्या ऊर्जा या सर्व गोष्टी पायाभूत मानून ही ऐक्यभावना-बंधुभाव प्रस्थापित करावयाचा आहे. प्रस्थापित व्यवस्था-विरोधी शक्तींचे जागतिक असे जे कुटुंब आहे त्याने अनेक वेळा, आपली गतिमानता नाना प्रकारे बदलणे आवश्यक आहे. असे करताना डावपेचांचाही जो अग्रक्रम असेल त्यातही सातत्याने बदल करावा लागेल. त्यांची नव्याने आखणी करावी लागेल.

परिपूर्ण असे ऐक्य ज्यांच्यात नाही अशा शक्तीसमूहांची कल्पना येथे विषद केलेली आहे. या प्रकारचे शक्तीसमूह शक्य कोटीत येण्यासाठी दोन गोष्टींची जरूरी आहे. एकतर यातील प्रत्येक समूहात समाविष्ट असलेली प्रत्येक शक्ती ज्या सामाजिक गटाचे प्रतिनिधित्व करते, तो गट ज्याची अंतर्गत रचना गुंतागुंतीची आहे असा असावयास हवा. दुसरे या गटाची अंतर्गत रचना लोकशाहीवादी असली पाहिजे. सामाजिक संघर्ष करीत असताना कोणताही अनुक्रम अगोदर निश्चित करण्यात आलेला नाही याची जाण सामूहिक पातळीवर असली तरच वर सांगितलेल्या पूर्व-अटी शक्य कोटीत येतील. एखाद्या सामाजिक गटाचे जे अधिकार व हक्क आहेत, ते दुसऱ्या कोणत्याही गटाचा अधिकार व हक्क यांच्यापेक्षा महत्त्वाचे नाहीत. व्यूहरचनेबाबतही अनुक्रम काय असावा या संबंधात जो वादविवाद होतो, तो शक्तिपात करणारा व उद्दिष्टापासून दूर घेऊन जाणारा असतो. या वादविवादामुळे व त्याच्या होणाऱ्या परिणामांमुळे एकच गोष्ट घडते. ती म्हणजे त्यामुळे सर्वंकष ऐक्य हेच उद्दिष्ट मानणारे सामाजिक गट तयार होतात आणि सरतेशेवटी एकच एक परिपूर्ण असे ऐक्य असलेल्या चळवळीत त्या गटांचे विसर्जन होते. हा मार्ग किती फसवा आहे याची चर्चा येऊन गेलीच आहे. समाजपरिवर्तनाची जी लढाई आहे, ती एकाच वेळी सर्वच आघाड्यांवर लढावयास हवी. तसे केले तरच ती यशस्वी ठरण्याची शक्यता आहे.



अनुक्रमणिका

थोडक्यात अनेक आघाड्यांवर एकाचवेळी अनेक प्रकारच्या नानाविध सामाजिक गटांनी चालविलेली लढाई येथे सुचविलेल्या व्यूहरचनेत अनुस्यूत आहे. या लढाईत सामील असलेला प्रत्येक गट गुंतागुंतीची (Complex ) अंतर्गत रचना असलेला आणि अंतर्गत रचनेच्या बाबतीत लोकशाहीवादी असलेला असला पाहिजे. या अशा प्रकारच्या व्यूहरचनेच्या हाती एक डावपेचात्मक हत्यार असेल. समाजाची व्यवस्था जैसे थे राहावी असे मानणारे व त्या परिस्थितीचा बचाव करणारे ते असतील. त्यांचा या हत्याराच्या मदतीने पाडाव होण्याची शक्यता आहे. जुन्या उदारमतवादी तत्त्वप्रणालीचा अर्थ शब्दश: घेऊन त्याची जागतिक स्तरावर पूर्तता झाली पाहिजे ही मागणी करणे हे या डावपेचात्मक हत्याराचे प्रमुख काम आहे. उदा, दक्षिण गोलार्धातून उत्तर गोलार्धात सध्या फार प्रचंड प्रमाणावर अवैध असे लोकसंख्येचे स्थलांतर होत आहे. अशा परिस्थितीत अनिर्बंध अशा खुल्या बाजारपेठेची मागणी व ते तत्त्व यांची अंमलबजावणी झालीच पाहिजे, जे कोणी स्थलांतर करून उत्तर गोलार्धात जात असतील त्यांना जाऊ देण्यास आडकाठी येता कामा नये – या मागण्या डावपेचात्मक दृष्टीने योग्य ठरतील. या अशा मागण्यास सामोरे जावे लागल्यानंतर उत्तर गोलार्धात जे उदारमतवादी तत्त्वप्रणालीचे जे पुरस्कर्ते आहेत, त्यांची दांभिक वागणूक उघड होईल. मानवी हक्कांबद्दलची त्यांची ओरड किती पोकळ आहे हेही जगास कळून येईल. या तथाकथित उदारमतवाद्यांना असे कबूल करावे लागेल की उत्तर गोलार्धातील देशात ज्या कोणाच्या मनात येईल त्याला प्रवेश करण्याचे स्वातंत्र्य नाही. वर उल्लेखिलेली मागणी लावून धरली की त्यामुळे या उदारमतवाद्यांचे ढोंग जगासमोर येईल.

या अशा प्रकारे दुसऱ्याही अन्य मागण्या करता येतील. समाजाविषयी हरएक प्रकारचे निर्णय ज्या ज्या ठिकाणी घेतले जातात, त्या त्या सर्व ठिकाणी अधिकाधिक लोकशाही असावयास हवी ही मागणी देखिल करता येईल. थोडक्यात आजवर परंपरागतपणे चालत आलेली, पण उघडपणे मान्य न करण्यात आलेली जी सत्ताकेंद्रे आहेत व जे हक्क आहेत, (Privilige ) त्यांचे उच्चाटन करण्याची जोरदार मागणी केली पाहिजे. एवंच तथाकथित उदारमतवादी अशी जी विद्यमान समाजव्यवस्था आहे, तिच्यावर अधिकाधिक बोजा टाकण्याचे डावपेच कार्यवाहीत आणावयाचे. विद्यमान उदारमतवादी समाजव्यवस्था अनेक बाबतीत बडेजाव दाखविते, अनेक गोष्टींबद्दल दावा करते. समाजात प्रभुत्व गाजविणारे जे वर्ग व शक्ती आहेत त्यांची इच्छा आपल्या बडेजावाकडे कोणी लक्ष द्यावे अशी नसते. कारण त्यासंबंधी अधिक गंभीरपणे विचार करून त्या वर्गांची व शक्तींची दांभिकता चवाठ्यावर आणण्याचे ठरविले पाहिजे. या विद्यमान समाजव्यवस्थेत अनुस्यूत असलेल्या ज्या अडचणी आहेत त्या सोडविण्याच्या, त्या निभावून नेण्याचे जे आजवरचे डावपेच होते, त्याच्या अगदी विरुद्ध टोकाला असलेल्या डावपेचाचा पुरस्कार या ठिकाणी करण्यात आलेला आहे.

परंतु हे सारे केल्यास ते पुरेसे ठरेल का? त्याबद्दल नक्की अंदाज करणे कठिण आहे. नुसते तेवढे केल्याने बहुदा भागेलच असेही नाही. तथापि या डावपेचाचे अनेक परिणाम होतील.

एकतर त्यामुळे समाजात प्रभुत्व गाजविणारे जे वर्ग व शक्ती आहेत त्यांची अधिक अधिक कोंडी होईल. त्या कारणाने ते या डावपेचाचा प्रतिकार करण्यासाठी सिद्ध होतील. तसे करण्यासाठी पराकोटीला गेलेल्या प्रतिडावपेचांचा अवलंब करणे त्यांना भाग पडेल. यातून नेमके काय निष्पन्न होईल हे निश्चितपणे सांगता येणार नाही. प्रस्थापित व्यवस्थाविरोधी अशा ज्या शक्ती आहेत त्यांना अभिप्रेत असलेले 'रामराज्य' (Utopia ) कसे असेल या संबंधात त्यांनी विचार केलेला नाही. या विषयीच्या आपल्या कल्पना त्यांनी आजवर विषद करून सांगितलेल्या नाहीत. प्रस्थापित व्यवस्था-विरोधकांनी आपल्याला अभिप्रेत असलेली लोकशाही-समाजवादी व्यवस्था उभारण्याच्या कामात असणाऱ्या अडचणी, व पेच यावर भाष्य केलेले नाही. त्या संबंधात वाद-संवाद केलेला नाही, अथवा विचारमंथनही केलेले दिसत नाही. ते जोवर हे सारे करणार नाहीत, तोवर ते जी व्यूहरचना करतील, जे डावपेच वापरतील, त्यांची फलश्रुती नेमकी काय होईल याबद्दल अनिश्चितता कायमच राहाणार. आता मागे पडलेले जे पर्व आहे, त्या कालखंडात, जे 'रामराज्यवादी' (Utopians ) होते, त्यांच्याकडे तसे रागाने-अप्रीतीनेच पाहिले जात असे. मध्यवर्ती सत्ता संपादन करणे हे पहिल्या क्रमांकाचे उद्दिष्ट, त्यानंतर राष्ट्रीय विकास, हा जो अनुक्रम ठरलेला होता त्यापासून 'रामराज्यवादी' राजकीय पातळीवर, सर्वांना विचलित करतात हे त्या अप्रीतीमागचे कारण सांगण्यात येत असे. या सर्वांचा परिणाम सरते शेवटी एकच झाला. ती म्हणजे प्रस्थापित व्यवस्थाविरोधकांनी ज्या चळवळी केल्या, जे संघर्ष केले, त्यांना रोमँटिक स्वरूपांच्या स्वप्नांचा आधार होता. म्हणूनच त्या चळवळी फसल्यानंतर त्यातून राग आणि भ्रमनिरास यांची निर्मिती झाली. येथे 'रामराज्यवादी' कोण या संबंधात दोन शब्द सांगणे आवश्यक आहे. 'रामराज्यवादी' हे 'रामराज्या'ची स्वप्ने पाहाणारे कार्यकर्ते नाहीत. या उलट आपल्या हाती घेतलेल्या कार्यात ज्या अडचणी निर्माण होतील त्यांचा थंड डोक्याने विचार करणारी ती मंडळी आहेत. तसेच समाजात आपल्याला अभिप्रेत असलेल्या पर्यायी संस्थांची रचना कशी असेल? त्यांची उभारणी कशी करता येईल? याविषयी कोठच्याही प्रकारची चौकट स्वीकारार्ह न मानता, अगदी उत्तमपणे विचार करणारे, नवनिर्मितीक्षमता असणारे, ते लोक असतात. रामराज्यवादी हे बुद्धिभेद करतात. मूळ उद्दिष्टापासून जनतेला दूर नेतात, असा विचार त्यांच्या संबंधात मांडला जातो. परंतु प्रस्थापित व्यवस्थाविरोधी शक्ती या अंतर्गत ऐक्य नसलेल्या व गुंतागुंत अनुस्यूत असलेल्या शक्ती आहेत असे जर आपण मानणार असलो, तर भविष्यकाळासंबंधीचे नाना प्रकारचे विचार व संकल्पना हा त्या संकल्पित समाजपरिवर्तन प्रक्रियेचा एक भागच आहेत. हे विसरता कामा नये.

इ. स. १९८९ हे साल एका दु:खद व क्लेषकारक युगाचे प्रतिनिधित्व करते. प्रस्थापित व्यवस्थाविरोधी शक्तीचा जो तथाकथित पराभव झाला आहे, ती वस्तुत: मुक्ती आहे. जागतिक भांडवलशाही अर्थव्यवस्थेचे जे उदारमतवादी – समाजवादी समर्थन होते ते आता बाद ठरले आहे. थोडक्यात इ. स. १९८९ सालपर्यंत जी प्रभावी व प्रभुत्व गाजविणारी अशी उदारमतवादी

तत्त्वप्रणाली होती, ती पार कोसळून पडल्याचे प्रतीक इ. स. १९८९ साल आहे.

आपण ज्या नव्या युगात प्रवेश करीत आहोत, ते काही झाले तरी अधिक धोकादायक व विश्वासघातकी आहे. आपण कोठे जाणार? कसे जाणार? याबद्दल आपणास काहीच कल्पना नसताना आपण प्रस्थान ठेवले आहे. नजीकच्या भविष्यकाळातील धोक्यापेक्षा, आपण गतकाळात ज्या चुका केल्या, त्याबद्दल आपणास अधिक माहिती आहे. समाजपरिवर्तन व्हावे असे वाटत असेल तर त्यासाठी, स्पष्ट व सर्वांच्या आवाक्यात असेल अशा प्रकारची व्यूहरचना विकसित करण्यासाठी फार प्रचंड सामूहिक प्रयत्न त्यासाठी आवश्यक आहेत. या मध्यंतरीच्या काळात जागतिक – भांडवलशाही व्यवस्थेचे विघटन चालूच राहाणार आहे. असे असले तरी सरंजामदारी स्वरूपाचे हक्क आणि सामाजिक उतरंड समाजात असली पाहिजे, या विचारांचे समर्थक आपला स्वत:चा वेळ व्यर्थ घालवीत आहेत अशी गाजरे कोणी खाऊ नये. भविष्यकाळात काहीही सामाजिक बदल होऊ नये, यासाठी प्रत्येक विद्यमान गोष्टीत बदल घडवून आणावयाचा हे उद्दिष्ट नजरेसमोर ठेवून त्याबाबत काही उत्तर सापडते का? याचा शोध ते घेत आहेत. त्यांना जी 'उसंत' मिळेल, त्याचा उपयोग ते या कामी करण्यात ते व्यस्त आहेत.

आपण आशावादी अथवा निराशावादी असण्याचे कारण नाही. याचे कारण परिस्थितीच तशी आहे. सर्व गोष्टी शक्य कोटीतल्या असल्या, तरी सर्व गोष्टी तशा अनिश्चितच आहेत. आपण आपल्या मनातून जुन्या व्यूहरचना हद्दपार केल्या पाहिजेत. आपण एकंदर समाजाचे आजवर ज्या प्रकारे पृथक्करण केले, ज्या प्रकारे विश्लेषण केले त्या जुन्या पद्धती मनातून काढून टाकल्या पाहिजेत. याचे कारण त्या सर्वांवर जागतिक भांडवलशाही अर्थव्यवस्थेची छाप फारच ठळकपणे उठलेली आहे. आपण या भूमीतून, या समाजातूनच वर आलेले बुद्धिजीवी आहोत याबद्दलही शंका नाही. परंतु भिन्न-भिन्न प्रकारच्या सामाजिक गटांच्या जागतिक . परिवारातूनही आपण आलेले आहोत. या सर्व गटातील प्रत्येक गट अंतर्गत रचनेबाबत अतिशय गुंतागुंतीचा आहे याचे भानही ठेवावयास हवे.

---

निसर्गाने सर्व प्राणिजगताला अन्नपुरवठा करून, आपणा सर्वांचे संगोपन केले आहे, हे खरेच आहे. पण हाच निसर्ग एक राक्षस आहे. आपण सारेजण जिवंत आहोत की मृत आहोत याची त्याला पर्वा नाही. हे देखील सत्य आहे. निसर्गाकडे नैतिकतेसंबंधी भावना व जाण असलीच तर ती फारच अल्प आहे. याबाबत निसर्गाची शिफारस करावे असे काहीही नाही.

प्रख्यात व्हिक्टोरियन आणि मानवतावादी थॉमस हेन्री हक्सले यांनी असे म्हटले होते की, "नैतिकतेच्या न्यायासनासमोर विश्वास उभे केल्यास, विश्व हेच दोषी ठरण्याची शक्यता अधिक."

– **लिआल वॉटसन**

# संगीताचे अर्थमाहात्म्य

श्री. ह. देशपांडे

विज्ञान तत्त्वचिंतन आणि कला यासारख्या कोणत्याही बौध्दिक हालचालींचे उद्दिष्ट विसंगतीत सुसंगती किंवा सुसंवाद साधणे असून विविध घटनांतून एकजीवीपणा आणि आकलनीय योजना शोधणे त्याचे अंतिम साध्य आहे.

संगीताच्या महत्तेसंबंधीची डी.ई.बर्लिन यांची मोलाची विधाने काहीशी अवास्तव वाटतील, पण तरी ती समर्पक आहेत असे मी समजतो. आपल्यापैकी बऱ्याच जणांना संगीत हा एक अत्यंत अर्थवाही अनुभव वाटतो आणि असे वाटण्यामध्ये सामान्य श्रोते त्याचप्रमाणे व्यावसायिक संगीतकारही असतात. या लेखात संगीताने लोकांच्या जीवनात हे स्थान प्रमुख म्हणून का प्राप्त करून घेतले आहे याची काहीशी कारणमीमांसा करण्याचा माझा विचार आहे. एखादी कला कोणताही सिद्धांत मांडत नाही, संदेश देत नाही, शाब्दिक विवेचनापासून जी अलिप्त असते, ती माणसाच्या जीवनाला तरीसुद्धा अर्थ आहे असा अनुभव कसा आणून देते ?

या लेखाचे शीर्षक 'ॲस्थेटिक्स ॲण्ड सायकॉलॉजी' (सौंदर्य विषय आणि मानसशास्त्र) या ग्रंथातून निवडले आहे. टोरँटोच्या युनिव्हर्सिटीतील मानसशास्त्रज्ञ श्री. बर्लेन यांनी उपरोक्त ग्रंथ लिहिला आहे. श्री.बर्लेन यांच्या म्हणण्याप्रमाणे नक्षीदारपणा आणि आकृतीक्षमता अजमावणे हा आपल्या अनुभव घेण्याच्या प्रक्रियेतील एक महत्त्वाचा भाग आहे. तो नसेल तर समोर केवळ निराकार अवस्थाच किंवा गोंधळ आपल्या वाटेला येईल. माणसाच्या मनोरचनेतील प्रत्येक स्तरावर कोणती तरी योजकता वा तिची निर्मिती तो पाहात असतो. मग त्यामध्ये ऐकलेली एखादी सामान्य घटना, पाहात असलेले दृश्य किंवा कल्पिलेली विश्वरचना, तत्त्वसिद्धी, श्रद्धास्थाने आणि थोर कलाकृती असोत, त्या कलाकृतीत संगीताचा अर्थातच समावेश होतो.

व्यवहारातील अगदी सामान्य घटना पाहात असताना देखील त्यात काही संगती असल्याचे माणूस शोधत असतो. म्हणजे तिच्या तपशिलात काही संबंध पाहून घेण्याचे निर्मिती कार्य तो करीत असतो. त्या संबंधातील योजकता निरखून पाहाताना एकूण तपशिलाचा आकार तो स्वत:हून बनवितो आणि असे प्रसंग हरघडी येत असताना त्याला त्यातला काहीसा अर्थही कळून जातो. अशी निर्मितीची प्रक्रिया अजाण माणसाकडूनही होत असते. उदा. कोणत्याही रंगाचे निरीक्षण हे माणसाच्या मेंदूतील अशी संगतीची रचना करण्याच्या कुवतीवर अवलंबून असते. पूर्वी म्हणजे इ.स. १८७२ च्या सालच्या सुमारास थॉमस यंगने दाखवून दिले आहे की आपण वेगवेगळे रंग पाहात असताना देखील त्यामधील वेगळेपणा आपल्या डोळ्यांच्या आतील पडद्यावर उमटून येत नाही. वास्तविक तशी व्यवस्था त्या पडद्यात असूनही पिवळा, हिरवा

आणि निळा हे रंग स्वतंत्र आहेत हे सांगता येत नाही. डोळ्यापुढे उजेड येतो. त्यापैकी एखादाच रंग आपल्या डोळ्यात भरतोही. उदा. लाल रंग पाहाताना पिवळा काहीसा उठून दिसतो, हिरवा पुसट वाटतो आणि निळा मुळीच दिसत नाही. याचा थोडक्यात अर्थ असा की, आपले लाल रंगाचे अवलोकन काही एका संगतवारपणावर अवलंबून असते, तरीसुद्धा अशी संगती ही शारीरिक प्रक्रिया नसून पाहाण्याच्या घटकांतील संबंधातून निर्माण झालेली असते.

एखाद्याचे बोलणे ऐकतानासुद्धा असा प्रकार घडतो. त्याच्या बोलण्यात तोतरेपणा असतो, विसंगती आढळून येते. स्वर आणि व्यंजनाची गल्लत होते. पुन्हा त्या बोलण्यात धांदरटपणा, त्वेष आणि एखादे वेळी विसावा घेतलेला आढळून येतो. पण एवढे असताही आपल्याला त्याचे म्हणणे समजून येते, याचे कारण त्यांच्या तुटक भाषेतील संबंध वा संगती आपण जुळवून घेऊ शकतो. त्याचे बोलणे अति संथ वा घाईचे, मोठे अगर गोड, म्हणजे मृदू-उंच आवाजातले आणि कर्कश असेलही. तसेच एखाद्या बाईचे चढ्या आवाजातील झपाट्याचे वाक्य किंवा घोगऱ्या आवाजातील म्हाताऱ्याची बडबड ही पण आपल्याला समजून येते. आणि त्याचे कारण तसा संबंध आपण जुळवू शकतो. म्हणजे ऐकणारांवर अगर पाहाणाऱ्यांवर त्या निवेदनाचा वा दृश्याचा परिणाम होतो. तो त्यातील एकूण सुरळीतपणाचा संबंध लक्षात आणल्यानंतर लक्षात येतो. हा प्रकार स्वतंत्र वा तेवढ्यापुरता असला तर त्यात काही संगती लावता येते. भाषेच्या उत्पत्तीने हा विचार अलिकडे मांडला आहे. बोलण्यातले चढ-उतार, धांदल अगर सावकाशी, उच्चारांतील आघात वगैरे बाबी एकमेकींशी संबंधित असतात. इतर घटनांपेक्षा वरील बाबींचा वेगळेपणा दुर्लक्षित करता येत नाही.

ऐकत अगर पाहात असलेला प्रसंग ह्याचा तपशिलाने मागोवा घेण्याची सवय आपल्याला इतकी लागलेली असते की त्यातील एकूण सर्व बारीक सारीक गोष्टींची संगतवारी लावण्याचे महत्त्व आपल्या लेखी असत नाही. ही संगती म्हणजे एखाद्या इमारतीच्या विटेसारखी नसते. की तीपासून एकूण इमल्यांची कल्पना करता येईल. ती दिसत नाही तसेच तिला हात लावून बघताही येत नाही.

असाच विचार कालक्रमणाच्या बाबतीला लागू पडतो. वेगवेगळ्या घटना एकामागून एक अशा डोळ्यापुढून सरकतात. त्यावेळी त्या एकत्र जुळवून त्यांची एक सुसूत्र मालिका बनविण्याकडे आपला कल असतो. सिनेमामध्ये स्थिर असलेल्या चित्रांची रांग आपल्याला सेकंदाला २४ या वेगाने दाखविली जाते. प्रोजेक्टरवरील शटरच्या साहाय्याने प्रत्येक चित्र झपाट्याने तीन वेळा एकामागून एक असे दाखविलेले असते आणि ही सगळी एकसंध हालचाल आहे असे आपण समजतो. वास्तविक तिथे तशी हालचाल नसते.

संगीताचे श्रवण आपणाकडून यासारख्या तऱ्हेनेच होत असते. अनेक तज्ज्ञ मंडळी सांगतात त्याप्रमाणे संगीत हे स्वत:हून पुढे सरकत नाही, तसे सरकण्यासाठी तीच वस्तू वा घटना निरनिराळ्या ठिकाणी असावी लागते. संगीतात असे काही होत नाही. अगदी साधी आलापी घेतली तरी तिच्यात स्वतंत्र आणि एक एकटे सूर असतात. एकाच बासरीवर "गॉड सेव्ह दि

क्वीन'' हे गीत वाजविले जात आहे असे आपण समजू. या ठिकाणी वेगवेगळ्या घटना कालक्रमाने एकामागून एक अशा क्रमवर येतात, अंतर ठेवून नव्हे. हालचाल होत असते ती वादकांच्या ओठांची, छातीची, बोटांची आणि त्याने प्रसारित केलेल्या हवेतल्या लहरींची. एकूण सुरावट ही केवळ काळाच्या अंतराने विभागलेल्या स्वरांची एक मालिका असते. स्वरातील ही कालांतरे अगदी त्रोटकही असतील, पण ती जर असतील तर आपण केवळ स्वरांची गोळा-बेरीज वा गोंगाट ऐकत राहू.

संगीत ऐकत असताना आपल्या समोर येणारा आलाप हा वेगवेगळ्या स्वरांची मालिका असते. आणि आपणच त्याची गुंफण करीत असतो. संगीताचे व्याकरणकार त्या त्या स्वरांतील फरक वेगवेगळा म्हणून सांगतील; म्हणजे तो सूर मोठा, नरम, जोरकस, नाजूक आहे किंवा त्याची जात वा उंची किंवा पट्टेदारपणा केवढा आहे यांचे ते विवरण करतील, पण त्या स्वरांमध्ये सुसंगती कशी असते याचा खुलासा ते करू शकत नाहीत आणि संगीत हे तिथेच बनलेले असते. आलापी ही स्वरांची अर्थवाही मालिका असते.

तिच्यातील प्रत्येक स्वर आपल्याला ऐकायचा असेल तर त्या त्या स्वरातील कालांतर वाढवावे लागेल किंवा त्याच्या पुनरावृत्तीत बदल करणे जरूर पडेल. आलापी म्हणजे जिला आपण स्वरांची मालिका समजतो, त्यावेळी तिच्या स्वरांच्या उंचीचा एकमेकीशी दाट संबंध जाणवतो. त्याच स्वरांची आलापी दुसऱ्या एका स्वयंचलित आलापीत कल्पिता येतेही पण ती ओळखता येत नाही किंवा तिला अर्थ प्राप्त होत नाही.

ॲन्टन वेबर आणि इतर काही संगीतकारांच्या कृतीमधील दीर्घ स्वरांतरामुळे त्या समजणे अवघड जाते. असे एकसाची संगीत न समजण्याला इतरही कारणे असतात ती फ्रेड लेर्डाव्हने ग्रंथित केली आहेत. स्वरांतील एकजीवीपणा अगर सूक्ष्मता नाहीशी करणे हे त्यातले एक कारण होय. वास्तविक स्वरातील हे फरक मुद्दाम केलेले नसून ते अपरिहार्य असतात. लेर्डाव्ह म्हणतो त्याप्रमाणे सहाव्यापेक्षा सातव्या स्वरात ही सूक्ष्मता अधिक असते. त्यामुळे संगीताच्या मूळ उद्दिष्टाचा विचार त्यात केला जात नाही.

सुरेल संगीतामधील रचनात्मकतेमुळे अशी सुप्त स्वरांतराच्या मागून येणारी आलापी समजायला सोपी जाते एवढेच नाही तर ती आकर्षकही होते. शिवाय असे एकसाची संगीत लक्षात न राहाण्याचे आणखी एक कारण असे की ते पुनरावृत्ती करीत नाही. अभिजात सुरेल संगीतात असे होत नाही. म्हणूनच तर श्रोत्यांना एकसाची संगीताचा अर्थ लागत नाही. बौलेझचे विख्यात लेखक मार्टेओ जान्स मेट्रो हे कळायला फारच अवघड जाते याचे एक कारण पुनरावृत्ती नसणे हे होय. लेर्डाव्हच्या म्हणण्याप्रमाणे १९५० आणि १९६० च्या संगीतात अशी पुनरावृत्ती सौंदर्यदृष्ट्या पसंत केली जात नसे. पण पुनरावृत्ती ही रचनात्मकतेला धोका देणारी गोष्ट आहे. त्यात सुज्ञपणा नाही असे मत ॲन्टन वेवर्सने अगदी अगोदरच म्हणजे १९३२ सालीच प्रदर्शित केले होते. सुरेलपणा सोडून देताना कल्पना अशी डोक्यात आली की पुनरावृत्ती टाळून काहीतरी नवीन करावे, पण असे करणे जमून येत नाही. कारण त्यात श्रोत्यांची आकलनक्षमता विचारात



अनुक्रमणिका

घेतली जात नाही.

स्वरांतरे राखून केवळ शुद्ध स्वरांची मालिका ऐकण्याच्या प्रयोगात स्वरांचे आरोह व अवरोह ह्यांचा कार्यवाहीपणा कुठे असावा असा प्रश्न ऐकणाराला पडतो. एकेका कानाला वेगवेगळ्या स्वरमालिका त्यातील नादांतरे टिकवून ऐकविल्या तर आपले श्रवण ती अंतरे वा त्यातील वळणे सरळ करून टाकते आणि एकामागून एक असे स्वरच आपल्या ध्यानात येतात.

आलापी म्हणून एकेक स्वरांची मालिका ऐकताना आपण ती आलापीच समजतो. एखादा सूर गुणगुणला जातो अथवा एक किंवा अनेक तालावर वाजविला जातो, त्याला नटवले जाते, त्यात बदल केला जातो किंवा त्याची एकट्याने वा अनेकांकडून लय बदलली जाते. पण असे होऊनही ओळखू यावी अशी आलापीच त्यावेळी उरते. कारण आलापी ही स्वरांची आपसातील एकसूत्रीपणा वा संबंध एक, एकसंध आकृती असून तिच्यातील कोणत्याही स्वराला स्वतंत्र आणि एकमेव स्थान नसते.

झुकर कॅण्डल लिहितो.....

"स्वरांचा उत्स्फोटक गुणसमुच्चय आपल्याला कळतो याचे कारण त्यातील अपूर्णतेची जाणीव आणि पूर्णत्वाकडे जाण्यातील उत्सुकता आपल्याला दिसून येते. संगीतातील कोणताही स्वर स्वयंपूर्ण नसतो उलट तो आपल्या पलिकडे जाण्याच्या प्रयत्नात असतो. जणू दुसऱ्या स्वराचा आधार शोधत असतो आणि याचवेळी आपण श्रोते नव्या म्हणजे पुढील स्वरांची उत्कंठतेने वाट पाहाण्यात गर्क होऊन जातो."

झुकर कॅण्डलने हे मानवी दृष्टीतून केलेले वर्णन मला पसंत नाही, कारण कोणताही स्वर स्वत: पलिकडे जात नाही. तरीही झुकर कॅण्डलच्या म्हणण्यातील रोख आपल्या लक्षात येतो तो असा की, स्वरामधील परस्परांचे नाते हेच संगीताचे मर्म म्हणून समजता येते.

सिम्फनी कॉन्सर्टो आणि सोनाटा यांच्या कोणत्याही भागामधील गतिशीलता ही एकूण संगीत आणि श्रोत्यांच्या मनातील तशीच तिची अपेक्षा यांचा संगम झाल्याचे प्रतीक, गतिमानता या संज्ञेने दर्शविले जाते. आणि अशा गतिमानतेखेरीज कोणत्याही साध्या आलापीचे वर्णन करता येत नाही.

नियमबद्ध अशी गतिमानता असा सेंट ऑगस्टीन संगीताचा उल्लेख करतो. आलापी वातावरणात विहार करते. एका स्वरात निमग्न होते किंवा एका प्रधान स्वराकडून दुसऱ्या बाजूला किंवा समाप्तीकडे झुकते असे आपण म्हणत असतो. साथरेलियम गतीमानतेकडील खास नजर अगर तिच्यातील बीथोव्हेनचे प्राविण्य यांचा डोनाल्ड टोवा उल्लेख करतो. हॉस्लिक तर स्पष्ट सांगतो सुरांच्या गतिमान आकृत्या हाच संगीताचा आशय असतो. वास्तविक संगीत हे स्वत:च गतिशील नसताना तज्ज्ञ ते तसे असते असे का म्हणतात?

संगीताचे श्रवण आणि ते ऐकतानातील अंतर या दोन्हींचे संमेलन हे त्याचे एक कारण असावे असा मी मागे उल्लेख केलेला आहे. वेगवेगळ्या स्वरांच्या उंचीला चढे किंवा उतरते असे म्हणणे हे अलिकडचे रूपक आहे. पूर्वी त्यांना वरचे आणि बसके म्हणत असत. पण

आलापीमधील स्वर हे गतिमान असतात असे म्हटल्याशिवाय मात्र आपल्याला राहावत नाही. याचे कारण श्रवणप्रक्रियेचे वर्णन इमारतीच्या बांधकामाशी म्हणजे वरखाली, उजवी-डावी मागील आणि पुढील अशा शाब्दिक स्थितीशी जुळलेले असायचे. वास्तविक एखाद्या घटनेचे स्वरूप ओळखून घेणे हे श्रवणप्रक्रियेचे कार्य असते. ही सिंहाची गर्जना आहे, ती तिकडून आली असावी, बहुतेक उजव्या बाजूकडून, असे आपण बोलतो. आवाज कोठून येतो हे तीन अंशापेक्षा अधिक अंतरावरून माणूस सांगू शकत नाही. घुबडाला एक अंशाच्या आतच ते समजून येते.

आवाजाची उंची आणि त्याची जलद गती यामधील फरक डॉप्पलर इफेक्टशी जोडता येतो असे दाखविता येते. आपल्या समोरून एक्सप्रेस गाडी झपाट्याने जात असते. तिच्या शिट्टीच्या आवाजाची उंची वर चढते अगर खाली येते, याचे कारण तिच्या ध्वनीलहरी एकामागून एक अशा आकुंचित आणि विस्तारित होत जातात. याचा अर्थ असा की आवाजाचे आपले श्रवण आणि स्थलांतराची त्याची गतिमानतेचे निरीक्षण या दोन गोष्टी आपल्याला वेगळ्या करता येत नाहीत.

ध्वनी आणि स्थलांतर यांचा संयोग आपल्या श्रवणप्रक्रियेशी जुळत-असो अगर नसो, तरीसुद्धा संगीत हे कालमानाशी निगडित असते हे खरंच आहे. असे असूनही कालमानाचा विचार करताना स्थलांतराच्या भाषेचा वापर आपल्याला सोडता येत नाही. कालमानात उजवे–डावे किंवा वर आणि खाली असे काही नसून त्यात फक्त अगोदरचे आणि त्यानंतरचे असाच विचार संभवतो. आणि तसा विचार करतानाही स्थलांतराशीच्या साम्याची मदत घ्यावी लागते. आपली विचार प्रवृत्तीच तशी असल्याने दुसरे काही करता येत नाही.

आलापी ऐकत असताना तिच्यामधील स्वरविशेष एकामागून एक येतात अशी आपली समज होते. म्हणजे ते एकदम प्रकट होत नाहीत असेच आपल्याला वाटते. तरीही तिच्यामधील एकूण सातत्य वा सारखेपणा आणि अभंगत्व यामुळे तशा कल्पनेला मदत होते. तिची विभागणी स्वतंत्र सुरात केली म्हणजे अगोदरचा आणि पुढचा सूर असे ऐकण्याचा प्रयत्न करू लागलो तर त्या प्रयत्नांत आपण स्थलांतराचा विचार सामावून घेतो आणि सातव्या ऐवजी एककालीनतेच्या विचाराला जागा करून देतो. एखाद्या वस्तूचे विभाजन करून तिच्या विभागांमधील फरक त्यांच्या स्थलांतरावरूनच कळून येतो.

आपल्या डायरीमधील वर्षाचे दिवस स्थलांतर पद्धतीने म्हणजे काही वेळा उभ्या ( एका पृष्ठात सात दिवस ) आणि इतर ठिकाणी आडव्या रीतीने दाखविले जातात. इंग्लंडमध्ये ते डावीकडून उजवीकडे असे नोंदलेले असतात. रविवार, सोमवार आणि मंगळवार ह्याखेरीज आपल्याला पुढील आठवड्याची कल्पना सुचत नाही. जपानी लोक उजवीकडून डावीकडे किंवा खालून वर बघतील, पण हे सगळे स्थलांतराच्या विचारापासूनच घडत असते. आपली विचारसरणीच विभाजनाकडून एकसंधपणाकडे वळत असते.

संगीत हे माणसाच्या आत्मजीवनाशी सुसंगत असते आणि ते जीवन सातत्याने प्रवाहित

असते असे हेगले सॅक्ट व अनेक लेखक आपले मत मांडतात. संगीत कृतीमधील एकजीवीपणा समजून येण्यासाठी चित्र अगर शिल्प यातील तशा वैशिष्ट्यांचे आकलन होण्यापेक्षा अधिक सायास पडतात असेही हेगले म्हणतो. याचे कारण संगीत ऐकणाराला ध्वनित झालेले अगोदरचे सूर आठवल्यावरच पुढील स्वरांशी ते जुळविता येतात. अशी एकत्वाची कल्पना स्थलांतरापेक्षा कालमानानुसार करायची असते हे विदित करणारी संगीत ही पहिली कला आहे असेही त्याने म्हटले आहे.

मायकेल ट्रिपेटने आत्मजीवनाची महत्त्वाची प्रतिमा असे संगीताच्या वैशिष्ट्यांचे वर्णन केले आहे. त्याचाच अनुवाद पण निराळ्या शब्दात हेन्री बर्गसन या तत्त्वज्ञाने 'आपल्या जीवनातील सततची आलापी' असा केला आहे. ही आलापी न भंग पावता आपल्या जागृत जीवनात अखेरपर्यंत गुंजन करीत असते. आपले व्यक्तिमत्त्व नेमके तसेच असते. सरळ रीतीने विकसित आणि सुसंगत स्वरातून, संगीतातून आपल्या आत्म्याचे प्रतिबिंब त्याच्या सगळ्या रूपांतरातून आणि वृत्तीतून उमटलेले दिसते, असे थोर संगीतज्ज्ञ हेन्रीज शेकर लिहितो. आलापीच्या श्रवणातील सातत्य हा एक आभास आहे. पण तसेच ते प्रकार आपआपल्या मनोवृत्तीत आढळून येतात आणि संगीत हे त्याचेच प्रतीक आहे. आपल्या शरीरातील 'कालमापक यंत्र' जेवणाची वा झोपण्याची वेळ झाली हे सूचित करते. म्हणजे कालमानाच्या ओघाची रूपांतरीत अशी कमी अधिकपणे जाणीव आपल्याला ते यंत्र करून देते. मागे म्हटलेले आत्मजीवनातील संचलन हे तसे होत असावे. मधूनमधून जाणवणारी आपल्या शरीरातील अपचन, वा डोकेदुखी वगैरेची अस्वस्थता ही आपल्या नकळत उद्भवलेली असते. अशा शारीरिक बेचैनीसारखीच अवस्था आपल्या मनातील प्रक्रियेतही मधूनमधून जाणवून जाते. अशा मानसिक प्रक्रियेबद्दल कोणालाही समर्पक बोलता येण्याची मला खात्री वाटत नाही आणि हे मात्र यावरून स्पष्ट होईल.

आपल्या मनात चाललेल्या घटना सततच्या आणि प्रवाही अगर ओघवत्या असतात असे म्हटले तरी त्या आपल्याला प्रत्यक्ष दिसत नाहीत. तो प्रवाह अबोध मनाचा असून वाहत्या पाण्याच्या पृष्ठभागावर तरंगत जाणाऱ्या लाकडी ओंडक्यासारख्या क्षणिक काळ हाताला लागतात. तशा क्षणिक कामापुरत्या त्या मनात येतात आणि निघून जातात. एखादा विचार वा कल्पना सुचली की तेवढ्यापुरती आपण ती वेगळी सांभाळण्याचा प्रयत्न करतो, शब्दात पकडण्याचा आणि लिहून ठेवण्याचा प्रयत्न करतो आणि त्यावेळेपुरती आपली मानसिक हालचालही थांबते. पाण्यातला एखादा तुकडा सापडल्यासारखी अवस्था होऊन जाते.

आपले विचार सतत पुढे जातात आणि तार्किक रीतीने एखाद्या निष्कर्षाला पोहोचतात, असे आपल्याला नेहमीच म्हणावेसे वाटते. पण होते ते विचारवंताच्या म्हणण्याप्रमाणे असे की, आपण कुठेतरी घोटाळतो, मनात विस्कटलेले विचार गोळा होतात आणि मधूनच एखादी कल्पना चमकते. म्हणजे प्रत्यक्ष काय घडत होते यापेक्षा मागाहून त्यातून ओळीने एक नियमबद्ध विचारसूत्र आपण बनवीत असतो आणि ते काही खरे नसते.



अनुक्रमणिका

आता या ठिकाणी विचारसूत्रता मागून आणावी अशी सक्ती आपल्याला का वाटते? असा वेगळाच प्रश्न उपस्थित होतो. वीनी हेडच्या मार्गाने बर्मिंगहॅमला जावे असे मनात आले असताना आपण त्या प्रवासाकडे मागे वळून पाहू लागतो आणि ती अगदी साधीच सहल होईल असे समजून ती गोष्ट रद्द करतो.

आपल्या मनात आलेले विचार आठवून त्यांची नोंद करायची झाल्यास तसा एकूण अनुभव तसाच्या तसा न ठेवता तो आपण मुद्दाम बदलून घेतो. तो आपल्या जाणीवेच्या कक्षेत टिकवून ठेवण्यासाठी. आपल्या मानसिक हालचालीत एकसूत्रता आणणे भाग पडते. शिवाय मनातला गोंधळ नेमका टिपून ठेवता येत नाही. निरर्थक भाषेपेक्षा अर्थवाही शब्दरचना आपल्या सहजच लक्षात राहाते आणि संगीत हे तर सुव्यवस्थित अर्थवाहीपणाचा पुरस्कार करणारे असल्याने त्यातल्या सुरावटी वा सुरेल शब्द अधिक सहजपणे आपल्या स्मृतीत येऊन राहातात.

अर्थात अशा सुसूत्रपणाची निर्मिती जाणीव ठेवून वा ठरवून केली जाते असे मात्र होतेच असे नाही. ती मानसिक प्रक्रिया आपणा सर्वांच्या मनात फारसा व्यत्यय न येता परस्पर घडून येते. पूर्वी विस्कळीत असलेल्या घटना आपण जुळवून घेतो. परस्पर विरुद्ध गोष्टी एका ठिकाणी जोडतो आणि त्यातून एकसंधपणा आणण्याचा आपला प्रयत्न असतो. १८ व्या शतकातील तत्त्वज्ञ जे. जी. हर्डर त्याचेही या संदर्भात म्हणणे असे.....

वेगवेगळ्या किंबहुना विसंगत माहितीतून संयुक्त आकृतीची निर्मिती करणे ही माणसाच्या मनाची संघटनात्मक आणि प्राथमिक स्वरूपाची हालचाल असते. हर्डरच्या सामाजिक आणि नैतिक दृष्टिकोनानुसार या विचाराला प्रमुख स्थान दिले पाहिजे. त्याच्या म्हणण्याप्रमाणे कोणतीही निर्मिती, मग ती अबोध मनातून वा जाणीवपूर्वक झालेली असो, तिचा उगम अगर हेतूपूर्वक रचना ह्या तिच्याच म्हणून म्हणता येणाऱ्या आकृतीमयतेनेच ठरविल्या जातात आणि त्याच्या साहाय्याने माणसाला त्यापुढे निरीक्षण करता येते. त्याची समज करून घेऊन तो आपली हालचाल करतो आणि आणखी निर्मिती करतो किंबहुना आपले जीवन व्यतीत करतो.

मनात जमा झालेली विसंगत आणि तुटक माहिती एकसंध करून घेण्याचा ध्यास माणसाला लागलेलाच असतो असे त्याच्या प्रकृतीत वेगळे काय असते?

ठराविक संवेदनांना तसाच प्रतिसाद देता यावा अशी मानव जातीच्या मनोरचनेची व्यवस्था कोणाकडून अगोदरच केली गेलेली नसते. एकूण विकासक्रमाच्या खालच्या स्तराच्या बहुतेक प्राण्यांची मनोरचना तशी असू शकेल. माणूस म्हणून आपणही तसे असतो तर जास्त सुखी झालो असतो. पण तसे झाले असते तर वातावरणातील हरघडी होणाऱ्या बदलांना आपण दाद दिली नसती आणि आपल्यातला लवचिकपणा कमी झाला असता, एवढेच नाही तर आपल्या मनात कल्पकता आणि शोधकवृत्ती यांचा मागमूसही लागला नसता. जुन्या आणि आनुवंशिक अशा संवेदनांच्या मर्यादेतच राहाणाऱ्या त्या खालच्या स्तरावरील प्राण्यांना कसलेही प्रश्न पडत नाहीत. वागणुकीत बदल करावा असे वाटत नाही. त्याचप्रमाणे समजून घेऊन विस्कळीत गोष्टीत एकोपा आणावा असेही त्यांच्या मनात येत नाही. निसर्गाने नेमून दिलेल्या मर्यादेतच

आणि तीही प्रकृतीत भिनून गेलेली असल्याने त्यांना दुसरे काहीच करता येत नाही.

असा खालच्या स्तरावरील प्राणी निसर्गाशी एकरूप झालेला असतोही पण त्यांच्यातील निबरपणामध्येच त्याचा विनाश संभवतो. बाह्य परिस्थितीतील बदलाबरोबर तो आपल्या वर्तनात लगेच फरक करू शकत नाही आणि टिकून राहायचे तर असा फरक करणे आवश्यक असते. निसर्गाकडून होणारी निवड सावकाशीने होत असते आणि वातावरणातील वा इतर प्रकारचा बदल झाला असताना त्याच्याशी जुळवून घेण्याच्या अगोदरच ती विवादित प्राणीजातच नष्ट होऊन जाते.

या बदलत्या परिस्थितीशी जुळवून घेण्याची माणसांची प्रवृत्तीही त्यांच्यात नसल्याने अशी स्थिती उद्भवते. बाह्यपरिस्थितीशी नेमके एकरूप होण्यासाठी माणसांची आनुवंशिक तयारी नसते. त्याकरिता ती नवीन उमेदीने आपल्यात आणावी लागते. यामुळेच तर माणूस ध्रुवप्रदेशात, विषुववृत्तावर किंवा अंतराळातल्या ठिकाणी टिकून राहू शकतो. माणसाची वर्तणूक ही त्याच्या शिकून घेण्याच्या चिकाटीवर तसेच पिढ्या न् पिढ्या होणाऱ्या त्याच्यावरील संस्कारभेदावर अवलंबून असते. होत असलेल्या बदलांना आपण होऊन प्रतिसाद देऊन स्वत:ला सांभाळून घेण्याची ऊर्मी लहान मुलांतही अल्प प्रमाणात असते. पण त्यांच्या जाणतेपणात मात्र अशा फरकांना तोंड देणे हे त्यांच्या शिकून घेण्याच्या आणि अनुभव मिळविण्याच्या उद्युक्ततेवर अवलंबून असते.

आपली वागणूक ही उपजतच वा आनुवंशिकरीत्या पोसली जात नसल्याने बाह्य वस्तुमानातील दुवे हुडकून काढणे आणि नवीन कल्पना गुंफणे ही कार्ये सततच्या आपल्या मानसिक हालचालींकडून होत असतात आणि त्याची आपल्याला जाणीवसुद्धा असत नाही. त्रिकोण आहे म्हणून काही आपण तीन बिंदू बघत नाही. झोपेतसुद्धा वेगवेगळ्या गोष्टी एकत्र जुळविण्यात आपला मेंदू कार्यरत असतो. स्वप्नातून आपल्या पुढे लक्षात येते ते असे की मागील अनुभवाशी नवीन घटना ताडून पाहाताना आपण कसलीतरी निवड आणि कोणता तरी चौकसपणा करीतच असतो. स्वप्नांमध्ये नेहमी आढळून येणाऱ्या अति विसंगत गोष्टी अशा प्रक्रियेतूनच घडत असाव्यात आणि त्यातूनच फार पूर्वीच्या आणि कालच्या घटना एकमेकींशी जुळू पाहाता व त्यातून एखादी कर्मकथा निर्माण होते. अशी निवडानिवड करण्याची प्रक्रिया आणि कल्पनासूत्रांची गुंफण सतत आणि अजाणता, समजूनही आपण करीत असतो. त्यामुळे तशा त्या होतच असतात असे मानून आपण त्यांची दखल घेत नाही पण तसे काही अनपेक्षित घडले की आपल्याला कमालीचे समाधान वाटते. नवीन आकृती निर्माण करण्याचा, नवीन प्रकारचे संबंध सापडण्याचा प्रयत्न करणे ही 'उच्च दर्जाची' मानसिक प्रक्रिया म्हणून नेहमीच समजली जाते कारण ती आकस्मिकरीत्या आणि संवेदनातून उद्भवलेली नसते. एखादी अभिनव कल्पना सुचली की सुचवणारालाच नव्हे तर ती ऐकणाराला आणि समजून घेणाऱ्यालाही महत्त्वाची वाटते. वैज्ञानिक उपपत्ती आणि विश्वातील घटनांचा अर्थ लावणे या बौद्धिक प्रयत्नाबाबतच नाही तर अभिनव कलाकृतीच्या निर्मिती संबंधातही ही गोष्ट खरी आहे. 'युरेका'

(सापडले) हा नवीन आकृतिमयतेविषयीचा उल्हसित उद्गार याचेच द्योतक आहे. मग त्याचा आपल्या जवळच्या व्यावहारिक उलाढालीशी संबंध असो अगर नसो. भूमितीशी प्रथम गाठ पडली त्याबद्दलची बर्ट्रान्ड रसेलची हकिकत याठिकाणी उद्‌बोधक आहे.

"अकरा वर्षांचा असताना प्रथमच मी युक्लिडच्या अभ्यासाला सुरुवात केली. माझा भाऊ मला शिकवीत होता. माझ्या आयुष्यातील ही एक अत्यंत महत्त्वाची घटना होती. प्रथमच प्रेमात पडण्यासारखे जगामध्ये काही रम्य आहे याची मला कल्पना नव्हती."

रसेलला आपल्या इतक्या लहान वयात युक्लिडमध्ये आनंद वाटावा ही अगदी असामान्य घटना आहे की ती सर्वसामान्य माणसाच्या वैशिष्ट्याचा मी म्हणतो तसा नमुना नाही. लहानपणी खाजगीरीत्या शिकलेला हा पोरका मुलगा अपवादात्मक बुद्धीचा असल्याकारणाने इतर मुलांच्या मानाने तो 'तार्किक संम्मिलन' या विषयाकडे झुकला असल्यास नवल नाही. तथापि मानव निरपेक्ष विचारपद्धतीत रस घेणारा रसेल हा काही एकटाच माणूस नव्हता. आलेल्या अनुभवाचा अर्थ माणसे निरनिराळ्या तऱ्हेने लावतात आणि अमूर्त विषय वस्तूकडे विशेष आकर्षित होणारी माणसे त्यांच्या बाल्यावस्थेत इतरांपासून दुरावलेली असतात असे मी इतर ग्रंथात सूचित केले आहे. अतीव जिज्ञासा असलेली माणसे समाजव्यवहाराशी नीटसे जुळवून घेत नाहीत आणि कोणत्या तरी नवीन उपक्रमात गुंतून राहातात. संतुष्ट वृत्तीत निर्मिती कर्तृत्वाला वाव मिळत नाही.

पण लहान मुले आणि वयात आलेली माणसे समस्या सोडविण्यात, संबंध जुळविण्यात, रचनाकृतीचे आकलन करून घेण्यात तसेच नवीन तंत्रे शिकून घेण्यात रस घेतात. बाजूच्या कोलाहलाने होणारी त्रस्तता कमी करणारी आणि आत्मविश्वास वाढविणारी कोणतीही गोष्ट आपल्याला सुख प्राप्त करून देते. मग तिच्यासकट बौद्धिक हालचालीही येतात.

अभिजात संगीताचा निरपेक्ष वृत्तीने विचार करू लागलो तर स्वरसमूहातील एक अमूर्त सूत्र आहे असे त्याचे आपण वर्णन करतो. म्हणजे त्याचा बाह्य जगाशी आणि सुरुवातीला तर आपल्या अंतर्मनाशी सुद्धा संबंध नसतो. गणित आणि संगीत या दोन्हीमध्ये साम्य असते असे म्हटले जाते याचे कारण दोन्हीतले विचार हे तार्किक आणि अमूर्त अशा विषयात आणि कल्पकतेतील सूत्रे जुळवून आणण्यात गुंतलेले असतात. विटगेनस्टाईन या आणखी एका तत्त्वचिंतकाला संगीताचे कमालीचे महत्त्व वाटत असे. 'प्रिन्सिपिया' या ग्रंथाविषयी तर तो अत्यंत हळवेपणाने बोलत असे. आपले ह्या ग्रंथाविषयीचे मत व्यक्त करताना 'सदर ग्रंथ म्हणजे संगीतच आहे' असे तो म्हणते असे. व्हाईटहेडने आपल्या १९२५ मधील 'लोवेल व्याख्यान सत्रात' संगीत आणि गणित यांची तुलना केली आहे. अलिकडे विकसित झालेले गणित ही "माणसाची अभिनव निर्मिती म्हटली पाहिजे. संगीताचेही असेच वर्णन होऊ शकते."

बर्ट्रांण्ड रसेल म्हणतो, "पद्धतशीरपणाचा, अंतर्गत संवादाचा आग्रह ही माणसाची बौद्धिक चेतना असते आणि ती इतर क्षेत्रांपेक्षा गणित विषयात मोकळेपणाने विहार करू शकते."

जी. एच. हार्डीचे[२३] मत असे की, 'चित्रकार किंवा कवी यांचासारखाच गणितज्ज्ञ हा कल्पना

सूत्रकार असतो. त्यांची सूत्रे चित्रकार अगर कवींच्यासारखीच रूपवान असली पाहिजेत. रंग अगर शब्द यांच्याप्रमाणेच त्याच्या कल्पना संमिलित झाल्या असल्या पाहिजेत. रूपकता सौंदर्य हीच त्यांची कसोटी आहे. सौंदर्यहीन अशा गणित विषयाला या जगात कायमची जागा नसते'.

अधिक माहितीवरून लक्षात येते ते हे की, गणिताबद्दलची माझी आस्था जेवढी तितकेच जी.एच.हार्डी यांचे संगीताचे कौतुक तोकडे आहे. तरीसुद्धा नवल वाटते की संगीतापेक्षा गणितात रस घेणारी माणसे अधिक आढळून येतात असेही तो म्हणतो. त्याच्या 'ए मॅथॅमॅटिशियन्स ॲपॉलजी' या ग्रंथाचे समीक्षण करताना ग्रॅहम ग्रीन हा कादंबरीकार म्हणतो की सृजनशील कलावंत म्हणजे काय असते हे हार्डीला मुळातून कळले होते. हार्डीच्या म्हणण्याप्रमाणे शुद्ध गणित हे पार्थिव जगापासून अलिप्त असते आणि गणिती कल्पनेचा माणसाच्या व्यवहाराशी संबंध नसतो. नंतर तिचा तसा वापर केला गेला असल्यास ती वेगळी गोष्ट होईल. विवेकप्रेरक गणिती कल्पनात साकल्य, सखोलपणा, अपरिहार्यता, आटोपशीरपणा आणि अनिवार्यता ही वैशिष्ट्ये प्रामुख्याने असतात असे हार्डीचे म्हणणे आहे.

संगीतालाही या कसोट्या लावता येतात. पाश्चात्य संगीताच्या सौंदर्यविचारानुसार साकल्य, सखोलता आणि अपरिहार्यता हा गुणसमुच्चय थोर मानल्या जाणाऱ्या संगीताशी समीक्षकांकडून जुळविला जातो. अर्थात यातल्या काही गुणांचे वर्णन नकारात्मक रीतीनेच करावे लागते. म्हणजे असे की संगीत हे सातत्याचे आवरण होऊ शकत नाही. कारण ते एखाद्या प्रादेशिक संकेताशी जखडलेले किंवा त्यात सखोलता नसते. त्याचे कारण त्यातली लयकारी ही निरस वा कंटाळवाणी असते. अलिकडचे लोकप्रिय संगीत हे त्याचेच उदाहरण होय. याच्या उलट अपरिहार्यता हा सगळ्या थोर संगीतकृतींचा सद्‌गुण असतो. एकदा पूर्णपणे समजली की तिची रचना आणखी वेगळ्या रीतीने झाली असती अशी कल्पना करवत नाही.

अनपेक्षितता असली पाहिजे ही केलर · आणि मेयर या दोघा संगीतकारांची भूमिका आहे. अभिनव स्वरसमूह निर्माण करण्याची आणि त्यांची अनपेक्षित समाप्ती करण्याची रचनाकारांची कुवत त्यांच्या अपरिहार्यतेच्या भावाशी निगडित असते. हा मात्र एक प्रकारचा विरोधाभास वाटतो. रचनाकार ठराविक रीतीने आपल्या संगीताचा विस्तार करीत असतो. त्यावेळी त्याने दुसऱ्या पद्धतीने आपली कार्यसिद्धी करायला हवी असे ऐकणाराला वाटते. उलट एखाद्या कृतीत काहीं नवीन गुण दिसून आला तर त्याच्यापेक्षा इतर काही होणे शक्य नव्हते, अशी आपली भावना होते.

संगीताच्या मांडणीत आटोपशीरपणाला महत्त्व दिले जाते ही गोष्ट सायवेलियसच्या 'फोर्थ (चौथ्या) सिम्फनी'मध्ये आढळून येते. तिला सेलिल ग्रे या रचनाकार आणि संगीताच्या इतिहास लेखकाने संगीताचा 'शुभ्र संकोच' असे नाव दिले आहे. म्हणजे त्याने त्याच्याशी सबंध वस्तुजात एकत्रित असलेल्या तारकेचे स्वप्न कल्पिले आहे. पण आत्यंतिक आटोपशीरपणामुळे ऐकणाऱ्याच्या लक्षवेधीपणावर फार ताण पडतो. याचे कारण संगीतात त्याना पुनरावृत्ती हवी असते. आटोपशीरपणा अगदी टोकाला नेला आणि पुनरावृत्ती किमान स्तरावर आणली तर

ऐकणाराला संगीतातली आकारमयता लक्षात येत नाही. सीरियल (धारावाही) संगीताची रसग्रहण करताना त्याची आकृती करणे आवश्यक असते. मग त्यावेळी श्रोता हा त्या संगीताचे शिक्षण घेतलेला नसला किंवा त्याची परिभाषा त्याला समजत नसली तरी आकृतीची समज ही त्याच्या संगीतानुभाचा प्रमुख भाग असते.

गणितात असतो तसा संगीताच्या सौंदर्यविचारात संक्षिप्ततेला फारसा वाव नसतो. शूबर्टचे 'हेव्हनली लेंग्थ' संगीतप्रेमींना आवडते, तर इतरांना त्याबद्दल उत्साह वाटत नाही. 'संक्षिप्त वॅग्नेर' अशी कल्पना करवत नाही. त्यांच्या संगीताच्या प्रदीर्घतेतच त्याचा परिणाम दडलेला असतो.

याच्या उलट संगीताच्या कृतीत आशय मोजका आणि विस्तार नको इतका असतो, असे समीक्षक मधूनमधून म्हणत असतात. त्या टीकेमधील गर्भितार्थ असा की त्यातला आशय आणि आकार हे वेगळे करता येतात. चांगला विषय असूनही तो वाढवून विचका कसा केला जातो यांची ते उदाहरणे देतात. पण उच्च संगीतात अशी विभागणी सहजासहजी दिसून येत नाही कारण त्यातील आशय आणि आकृतिमयता यामधील अभंगात्वामुळे श्रोत्यांना उलट अपरिहार्यतेचा अनुभव येतो.

संगीत आणि गणित यात साम्य पाहायचे तर ते असे असते की त्या दोहोमधील कल्पनासूत्रे मुख्यत: शब्दविरहित असतात. भाषा ही इतकी व्यामिश्र, कार्यशील आणि मानव संबंधित की, संवादाचे साधन असणारी आणि आपल्या अनुभवाचा खुलासा करणारी आहे. म्हणून तिला आपण गैरवाजवी महत्त्व देतो. वाचिक आणि लिखित भाषा विकसित झाली नसती तर संगीत हेच परस्पर संवादाला पर्याय झाले असते, हा प्राऊस्टचा विचार या ठिकाणी लक्षात घेण्यासारखा आहे.

कोणत्याही प्रसंगाचा अर्थ लावताना त्यातील घटकांचे परस्परसंबंध जाणून त्यातली व्यवस्था शोधावी लागते. गणित हे साकल्यरूप दाखविते. ते तपशिलात जात नाही. व्हाईटहेड म्हणतो त्याप्रमाणे गणितातील सत्यता ही त्याच्या संपूर्ण तार्किक अशा साकल्य रूपात असते. निरपेक्षतेच्या अशा भव्य स्थरावर संगीतसुद्धा पोहोचू शकते. विशेषत: त्यासाठी आपल्याला संगीतकाराच्या अखेरच्या कृतीकडे वळावे लागेल. उदाहरण म्हणून माल्कम बॉईड बाखचे 'म्युझिकल ऑफरिंग' आणि 'आर्ट ऑफ फ्यूज' यांचा निर्देश करतो. या दोन्ही कृती मानवी संगीतापासूनच्या दूर प्रदेशात गणित आणि तत्त्वज्ञान यांच्या संगतीत वास करतात.

संगीताची समज असणाऱ्या कोणालाही बॉइडचे हे वर्णन उचित वाटेल. पण त्याने वर्णिलेला हा प्रदेश वस्तुनिरपेक्ष आहे काय की तो या ठिकाणी केवळ उत्प्रेक्षा वापरतो? संगीतातील आणि गणितातील कल्पनासूत्रे ही माणसाची उत्स्फूर्त निर्मिती आहे की ती अगोदरच अस्तित्वात होती? प्रख्यात गणिती जी. एच. हार्डी हा परमेश्वरावर भरवसा न ठेवणारा खंबीर माणूस होता. इतका की निवडणुका असल्या तरी कोणत्याही कॉलेजच्या चॅपलेमध्ये जाण्यास तो तत्पर नसायचा. तरीसुद्धा गणितातील वास्तवता ही अवतीभोवतीच्या जगतापासून स्वतंत्र असते आणि

गणिती प्रमेये ही निर्मिती नसून निरीक्षण आणि शोधकता यांची ती संतती होय असे त्याचे मत होते त्याने लिहिले आहे ते असे,"३१७ ही संख्या हे विधान आपण समजतो म्हणून नव्हे तर किंवा आपली मने तशी वळविली असतात म्हणून नव्हे, तर तसे असतेच आणि गणिती वास्तवही तसेच रचलेले असते."

रॉजर पेनरोझचेही असेच मत आहे. तो विचारतो,"गणित ही नवनिर्मिती की शोध आहे? गणितज्ज्ञ आपल्या निष्कर्षाप्रत येतात त्यावेळी ते केवळ त्यांच्या मनातल्या विचारकृती मांडतात, आणि त्यांना वास्तवतेचा आधार नसतो. पण ते इतक्या परिणामकारक रीतीने लोकांत प्रस्तुत करतात की कोणालाही त्या खऱ्या वाटाव्यात इतके त्यांना मूर्ख ठरविले जाते किंवा अगोदरच असलेली सत्य परिस्थिती ते पुन्हा उलगडवून दाखवितात. मात्र वास्तविक तिचे अस्तित्व गणितज्ज्ञाच्या आवाक्यात नसून तेही स्वतंत्र असते. म्हणून आता मात्र वाचकांच्या लक्षात येईल की मी याबाबतीत दुसऱ्या बाजूचा आहे.

सगळ्या गणिती रचना या आपल्यापुरत्या स्वतंत्र असून निरंकुश असतात असे पेनरोझ म्हणत नाही. त्यातल्या काही माणसाच्या बुद्धिमत्तेच्या द्योतक असतात. इतर काहीमध्ये तर पूर्वीपेक्षा नवीन असे उद्भवलेले दिसून येते. त्यावेळी गणितज्ज्ञाला ईश्वराचे हात लाभले असे समजले जाते. ह्या विचारसरणीला पेनरोझ "गणितातील प्लेटोवाद" म्हणून संबोधतो.

इतर गणितज्ज्ञांचे मात्र ठाम मत असे की, गणित हे माणसाचे संपूर्णपणे विचारकर्तृत्व आहे. क्रोनेवर याचे विधान प्रसिद्धच आहे. "ईश्वराने पूर्णांक निर्माण केले. बाकीचे कार्य माणसाचे आहे." म्हणजे पेनरोझ दोन्ही बाजूने बोलतो.

काही गणिती रचना या शोधल्या गेलेल्या आहेत आणि त्या नवनिर्मिती नाहीत. अशा विचाराला काही गणिती प्रश्न सहज सोडविले जातात या युक्तिवादाचे पाठबळ मिळते. गणिती कोड्याचा उलगडा किंवा नवीन आकृती गणितज्ज्ञाच्या मनात उत्स्फूर्तपणे येतात. मग त्या अगोदर त्याचा जाणीवपूर्वक प्रयत्न कितीही झालेला असो. एकदम सुचलेल्या प्रश्नाचे निरसन या गोष्टीला खास महत्त्व दिले जाते आणि मग ती 'दैवी देणगी आहे' असेही म्हटले जाते. गणितज्ज्ञ गॉस एका प्रमेयाच्या उलगड्यात अनेक वर्षे गुंतला होता. तो लिहितो,"अखेरीस दोन दिवसांपूर्वीच मला यश लाभले. ते अर्थातच माझ्या क्लेशकारक कष्टामुळे नव्हे तर ईश्वराच्या कृपाप्रसादामुळे. एखादी वीज चमकावी तसे मला ते कोडे सुटले. मला त्यापूर्वी जे ज्ञात होते त्याचा माझ्या यशाशी कसा संबंध जुळून आला ते मला सांगता येत नाही."

आपली बुद्धी ही परमेश्वराची देणगी आहे असे हडनप्रमाणे स्ट्रॉन्हीन्स्की समजत असे आणि तिचा वापर करण्याचे बळ त्याने द्यावे म्हणून तो नियमाने प्रार्थना करीत असे. संगीताभिमुख प्रवृत्ती ही आपल्याकडेच आहे असे म्हणून तिचा विकास करण्याचे श्रेय आपणच घेणार अशी परमेश्वराकडे तो कबुली देत असे. "दि राईट ऑफ स्प्रिंग" या गीताचे बीज आपल्याला स्वप्नातून लाभले असे स्ट्रान्हीन्स्की म्हणायचा. "ला साक्रे ड्यू प्रिन्टेप्स"च्या मागे काही फारशी परंपरा मदतीला नव्हती. माझे कानच फक्त होते. जे ऐकले ते मी लिहीत गेलो. 'ला साक्रेच्या' प्रवासाचे

मी एक वाहन होतो.'

काही स्वप्ने ही परेमश्वराचे आदेश असतात, ह्या युंगच्या मताला स्ट्रान्हीन्स्कीचा पाठिंबा होता. तरी परमेश्वराच्या अस्तित्वाबद्दल काहींना शंका असते. मग त्यांना अबोधाशिवाय जाणिवेच्या मनाला बाह्यघटनांचा अर्थ एकसारखा लावावा लागतो आणि त्यातून नव्या संगती आणि कल्पना संभवल्यास त्या सुदैवाने अभिनव आणि उत्स्फूर्त ठरतात आणि त्या कल्पना स्वयंप्रेरित वाटल्यामुळे तसेच त्या विचारपूर्वक उद्भवलेल्या नसल्याने धार्मिक प्रवृत्तीचे लोक दैवी मानतात हे समजण्यासारखे आहे.

संगीत आणि गणित यामधील साम्य अधिक वाढवणे शक्य नाही. दोन्ही विषयांचा 'अमूर्ताशी' संबंध असला तरी गणितामधील प्रमेये सिद्ध करता येतात तर संगीतातील वास्तवता वेगळ्या प्रकारची असते. दोहोत असा फरक असतोच. संगीत ऐकण्यासारखे रंजक असले तर त्याची समाप्ती ही सौंदर्यदृष्ट्या अपरिहार्य वाटते. तर गणिताच्या संबंधातील दिसून येणारी अपरिहार्यता ही तार्किकतेची परिणती असते.

अमूर्त कल्पनांची संगतवार गुंफण करणे ही माणसाची एक महत्त्वाची कार्यसिद्धी आहे. ही गोष्ट गणित आणि संगीत यांच्याकडून दाखविली जाते. अशी गुंफण समजदार श्रोत्यांना उंचबळून टाकते. मग तिचा संबंध त्यांच्या व्यवहारातील जीवनाशी नसला तरी चालतो. सौंदर्यदृष्टीने केलेले कलाकृतीचे रसग्रहण ही बौद्धिक कसरत नसून ते माणसाच्या भावविश्वाशी निकटचा स्पर्श करून जाते. पूर्वी जिथे संगतवारपणा आणि आकृतिमयता नसते, तिथे त्यांना ती संगीतामधून दिसते आणि अशा पूर्णाकृतीचे चिंतन त्यावेळी त्याला हृदयस्पर्शी वाटते.

संगीतातील वास्तवता ही संगीतकाराच्या मानसिकतेपासून अलग असते या गोष्टीवर माझा विश्वास नाही. भिन्न संस्कृतींच्या परंपरेवर संगीत अवलंबून असल्याने ते तेवढ्यापुरतेच तिथे भावत नाही. गणिताचे तसे नाही. तरीही संगीत माणसाच्या पूर्वापार चालत आलेल्या मानसिक हालचालीचे द्योतक आहे याबद्दल मात्र मला शंका नाही. बाह्य जगात दिसून येणाऱ्या विसंगतीतून सुबक रचना करण्याचा त्या हालचालीतला तो प्रयत्न आहे. त्याचप्रमाणे पेनरोझने गणिताविषयी सुचविलेली विचारसरणी ही उत्कृष्ट संगीत आणि तसे नसलेले संगीत यामधील फरक समजण्याला उपयुक्त ठरेल असे मला वाटते. पेनरोझ स्वत:च म्हणतो,

"थोर कलाकृती या तशा नसलेल्या कृतीपेक्षा परमेश्वराच्या अधिक जवळ असतात. त्यांच्यातून शाश्वत सत्ये प्रकट होतात आणि त्या सत्यांचे अस्तित्व अगोदरच निर्वात प्रदेशात असते. उलट कमी प्रतीच्या कलाकृतींचे स्थान माणसाने स्वेच्छेने निर्माण केलेले असते आणि हा विचार सगळ्याच कलाकारांनी मान्य केलेला आहे."

गणित आणि संगीत यामधील कल्पनासूत्रे ही दोन्हीही सूत्रे माणसाच्या भावप्रकृतीशी निगडित असली तरी संगीत हे त्या सूत्रात अनुस्यूत असलेल्या उत्कटतेशी संबंध ठेवते. दोहोंना लाभणाऱ्या प्रतिसादातही असाच फरक जाणवतो. उत्कट भाव माणसांच्या शरीरातून प्रकट होतात. उत्कटतेविरहित भावांचा तसा परिणाम होत नाही.

माणसाला वाटणारी आशा, भीती, आदर, कंटाळा अगर आनंद हे भाव त्याच्या शरीराला व्यापून टाकत नाहीत. कारण तशी उत्कटता आणि सातत्य त्यात नसते. मानवी उत्क्रांती या शास्त्राचा जनक डार्विन म्हणतो त्याप्रमाणे एखादा माणूस दुसऱ्याचा अतोनात द्वेष करीत असेल, पण त्याचे शरीर त्यामुळे व्यापून गेले नसेल, तर तो चवताळलेला असतो असे म्हणता येणार नाही.

गणित आणि संगीत या दोन्हींच्या सौंदर्यदृष्टीने होणाऱ्या आकलनात बरेचसे साम्य असले तरी गणित हे संगीताप्रमाणे माणसाच्या शारीरिक प्रक्रियेवर परिणाम करीत नाही. जगात कोणतीतरी सुव्यवस्था आहे हे गणित आणि संगीत या दोन्हीवरूनही पटून येते. पण संगीत निर्माण करताना वा ते ऐकताना जसे शारीरिक प्रक्रियेत बदल घडवून आणते तसे गणिताकडून होत नाही.

गणितापेक्षा संगीत हे तितकेसे अमूर्त नसते याचे कारण ते संबंध शरीर जागृत करते आणि त्यातील ध्वनीसमूह हा माणसांमधील भावनिक संवाद असतो. त्याचे स्वरूप बौद्धिक तसेच भावनिक आहे. म्हणून त्याच्याकडून माणसातील मन आणि त्यांचे शरीर यात संयोग जुळून येतो. याच कारणाने संगीत अधिक व्यक्तिसापेक्ष आणि व्यक्तिगत जीवनातील चढउतारांना सामोरे जाते पण अमूर्ताशी संबंध दोन्ही विषयात सारखाच असतो. म्हणूनच पायथागोरियन मताच्या लोकांच्या विश्वातील सुसंवाद हा संगीतमय आणि गणितासारखा असतो असे म्हटले असल्यास नवल नाही.

सुरांच्या समूहात एकसूत्रता आणणारे लय, आलाप आणि सहसंवाद हे प्रमुख घटक असतात आणि त्या सगळ्याचे एकमेकांशी नाते जुळते. तसेच ते जुळून येताना श्रोत्यांच्या शारीरिक हालचालींशी सुसंबद्ध होतात. पण ते कोणत्या रीतीने ते त्यांना पुरेसे कळत नाही... ... उदाहरणार्थ काही आवाज ऐकल्यावर एखाद्याची दातखिळी बसते किंवा अंगावर शहारे येतात. संशोधनांती असे दिसून आले आहे की दगडी पाटीवर नखांनी गिरवणे वा करकर ऐकताना येणारा तिटकारा 'सार्वत्रिक असतो'. तथापि हे असे का होते ते कोणाला समजत नाही. गोंगाट हा सहसा फार मोटा नसतो किंवा त्यापासून काही धोकाही वाटत नाही. तो फक्त कर्णकटु असून त्याला काही नेमके कारण नसते. आपला मेंदू हा नाजूक वा पातळ काचेसारखा असावा आणि ठराविक रीतीने येणाऱ्या ध्वनीमुळे तो तडकून जाण्याचा संभव असतो.

एखादे संगीत आपल्याला हेलावून टाकते असे सांगताना उद्दीपित करते आणि शारीरिक परिणाम घडवून आणते असे आपल्याला म्हणायचे असते आणि आपले शरीरही त्यात गुंतले की त्यात गतिमानता येते. त्यात स्नायूंना ताण बसतो. शरीर झोके घेते वा मान हलविली जाते. लहान मुले गाणी म्हणत असताना आपले हातपाय हलवितात. तसेच संगीताच्याबरोबर आपल्या शरीराची खळबळ ताब्यात ठेवणे काही श्रोत्यांना मुश्किल होते, हेही आपण बघितले आहे. गतिमानता आणि भावोद्रेक हे शाब्दिक वा वास्तव अर्थाने वेगळे होत नाहीत असा याचा अर्थ आहे.



अनुक्रमणिका

रोजन सेशन्स हा संगीतरचनाकार तर असे विचारतो, "संगीताचे मूलबीज हे ध्वनींमध्ये नसेल इतके ते त्याच्या गतीशीलतेत असते. पुढे जाऊन मी असेही म्हणतो की, माणूस म्हणून आपल्याला संगीताचे महत्त्व वाटते त्याचे कारण त्यातील गतीशीलता ही मानवी स्वरूपाची असते. ती मूलग्राही असते आणि आपल्या प्रतिसादात्मक आविर्भावातून ती आकार घेते."

जॉन ब्लॅकिंगच्या मताप्रमाणे संगीतनिर्मितीची प्रेरणा ही शारीरिक हालचालीच्या लयकारीतून उगम पावते आणि त्याची मांडणी करणारा गायक अगर वादक हा अगोदर त्याच्या रचनेपेक्षा रचनाकाराच्या व्यक्तिमत्त्वाशी एकरूप व्हावा लागतो. दक्यूसी हा पियानोवादन करीत असताना ही जाणीव करून देत असे. इतकी की तो रचनाकाराशी तद्रूप झालेला दिसे.

संगीत हे कालगतीत आकृतिबंध आणते आणि आपल्यापुरते संगीताचे हेच कार्य आहे असे काही संगीतकार म्हणतात. संगीतातील कालगतीची जाणीव त्याच्या रचनेनुसार बदलत जाते. सोनाटा ह्या गानप्रकाराची एखाद्या प्रवासाशी तुलना करता येते. त्या प्रकारातील घटक सुरुवातीला अलग असून अखेरीला मात्र ते एकरूप होतात. सगळेच संगीत अर्थात तसे नसते. कोणतीही मैफिल काही वेळापुरती असली तरी त्यातला संगीताचा काही भाग त्यातील आकृती–मयतेशी निगडित असतो आणि त्यामुळे त्यातले घटक समाप्तीच्या समयी एकत्र होतही नाहीत. कदाचित ते तसेच स्थिर आहेत असे वाटून जाते. स्ट्राव्हीन्सीने कालमानाचे दोन प्रकार कल्पिले आहेत. त्यांना तो सायकॉलॉजिकल (मनोजीवनविषयक) आणि ॲन्टॉलॉजिकल (अनुभवात्मक) अशी नावे देतो. सायकॉलॉजिकल कालगतीत माणसाच्या मन:प्रवृत्तीनुसार बदल होतो. त्यावेळी तो कंटाळलेला, उत्तेजित, दु:खात किंवा सुखासीन अवस्थेत असतो. ॲन्टॉलॉजिकल काल हा आहे तसाच राहातो आणि मोजलाही जातो.

"ॲन्टॉलॉजिकल कालगतीवर संगीत आधारलेले असते आणि त्यात समानतेच्या तत्त्वाचा प्रभाव असतो. उलट विकास पावणारे संगीत हे सायकॉलॉजिकल कालमापनाशी वा त्यातल्या गतीशी निगडित राहून विरोधात्मक विचारसरणी अनुसरते. निर्मितीच्या प्रक्रियेत या दोन्ही तत्त्वप्रणालींचा वापर असतो. आणि त्या वैविध्य आणि एकता या मूलगामी कल्पनांशी सुसंगत असतात."

रचनाकारांच्या भावनात्मक प्रवृत्तीला प्रकट करणारे संगीत हे स्ट्राव्हीन्स्कीला ॲन्टॉलॉजिकल कालमापापेक्षा अधिक महत्त्वाचे वाटते. कारण ते सायकॉलॉजिकल कालगतीशी संबंध ठेवून असते. संगीत ऐकण्यात एखादा श्रोता मग्न होतो त्यावेळी वेळ कसा झपाट्याने निघून गेला याचे त्याला नवल वाटते. उलट मनोजीवनाशी फारसा संबंध नसलेले हे स्ट्राव्हीन्स्कीला, ॲन्टॉलॉजिकच्या जवळ गेलेले आढळून येते.

"माझ्यापुरते बोलायचे तर विरोधापेक्षा समानतेकडे झुकणारे संगीत हे मला अधिक समाधान देणारे वाटते. विरोधाचा परिणाम तात्काळ होतो. उलट समानतेचा प्रभाव घडून येण्याला बराच वेळ लागतो. विरोध हा विविधतेचा घटक असेल तर, समानता ही एकतेच्या प्रयत्नातून जन्म पावते."



अनुक्रमणिका

बायन नॉर्थकॉट हा संगीत समीक्षक मेसिएन या संगीकाराच्या मताचा आपल्या अलिकडच्या लेखात उल्लेख करतो तो असा की सृजनकार्य हे सर्वत: दैवी आदेशांची सिद्धी असते ! आणि म्हणतो की मेसिएन हा एखाद्या उद्दिष्टाकडील प्रगमनशीलतेकडे त्यामुळे दुर्लक्ष करतो. बायनचे असेही म्हणणे आहे की मेसिएनचे संगीत हे प्रत्यक्ष कालमानाकडे झुकते आणि त्यामुळे स्ट्राव्हीन्स्कीच्या मताचे समर्थन होते.

ब्रुकनेर हा दुसरा रचनाकार धार्मिक वृत्तीचा आहे. त्याच्या संगीतातील स्थिरतेला एखाद्या कॅथेड्रलच्याभोवती फिरण्याची उपमा दिली जाते. त्याच्या सिम्फनी अनेक घटनांचा समावेश असूनही एखाद्या उद्दिष्टाकडे जाण्याची गतिमानता नसते. पण असे सर्वसामान्य विधान करणे चुकीचे होईल. सगळेच धार्मिक वृत्तीचे रचनाकार शाश्वत सत्याचा पुरस्कार करीत नाहीत. हेडन हा सुद्धा धार्मिक वृत्तीचा होता. पण त्याच्या काही संगीतातील भाग 'स्ट्रम ॲण्ड ड्रँग' या गीतामुळे वेगळे झाले होते. शिवाय त्याचे वृंदसंगीत मैफिलीतील मांडणी सोनाटाप्रमाणे विशिष्ट उद्दिष्टाकडे जात असे. अर्थात त्याने आपल्या कल्पनेप्रमाणे सोनाटाचे नवीन अनेक प्रकार आचारात आणले होतेच.

शाश्वत सत्ये आणि ईश्वराशी संवाद साधण्याची धार्मिक प्रवृत्ती यात संगीत हे समाविष्ट झालेले असते अशी स्ट्राव्हीन्स्कीची विचारसरणी आहे. पण तिचा अनुसार केल्यास स्वत:च्या भावनाट्यात गुंतलेला संगीतरचनाकारांवर काहीसा अन्याय होतो. कारण तो सुद्धा एकतेच्या शोधात असतो आणि विरोधी घटकात ती साधण्याचा प्रयत्न करतो. तथापि स्ट्राव्हीन्स्कीने कालमानातील फरक उचितपणे नमूद केले आहेत. कारण ते आपल्या संगीत ऐकण्याच्या अनुभवाचे महत्त्वाचे भाग आहेत. बीथोव्हेनच्या पुढच्या पुढच्या क्वार्टेटस्वर जोसेफ केर्मान आणि जे. डब्ल्यू सुलिव्हन . या दोघांनी टीका केली आहे. विशिष्ट उद्दिष्टाकडे प्रगत होण्याऐवजी ती क्वॉर्टेटस् दूर जातात असे त्याचे म्हणणे आहे. ते उद्दिष्ट सोनाटा प्रकाराने आपले लक्षण म्हणून मानले आहे. संगीतातील गतिमानता ही एका मध्यवर्ती अनुभवकेंद्रातून उत्सर्जित होते. असे सुलिव्हनचे म्हणणे आहे. तरीही संपूर्ण स्वास्थ्याकडे आतुरतेने बघणाऱ्या संगीतालासुद्धा आविष्कारासाठी वेळ लागतोच.

स्फुरलेले नाही अशा किंवा केवळ डोके चालवून मांडणी केलेल्या संगीतापेक्षा थोर संगीत वेगळे करता येते, म्हणून ते कसल्यातरी विरळ आणि विस्तृत वातावरणातून अवतरते असा मात्र त्याचा अर्थ नाही. स्वत:च्या मनाचा ठाव घेण्याचा साभास हा त्याच्या बाहेर असलेल्या वास्तवाशी फारकत करून करणे ही एक अवघड गोष्ट आहे. पण त्या कारभारात एखादा रचनाकार यशस्वी झाला तरी त्याला आपल्या सखोल भावप्रकारांना नंतर तोंड द्यावे लागते आणि पुढे त्यांना बोधक्षम करून स्वरांचे रचनाबंध निर्माण करावे लागतात. त्या एकूण प्रक्रियेला आपण संगीत म्हणून समजतो. जॅकेस लान हा वादग्रस्त फ्रेंच मानसतज्ज्ञ म्हणतो की आपले मनोविश्व हे भाषेसारखे रचलेले असते. पण ते गणित किंवा संगीतासारखे रचित असते असेही म्हणता येईल. अबोध मनाच्या अंतर्मनात सुसूत्रता वा एकजीवीपणा नसलेल्या विकाराची काहील

खवळत असते, ही फ्रॉईडची सुरुवातीची कल्पना आता मागे पडली आहे; जाणीव झालेले आणि अबोध अशा मनाच्या दोन्ही विभागातूनही निर्मितीचे कार्य सिद्ध होत असते.

ऐकण्यासारख्या चांगल्या संगीतात रचनाकाराच्या व्यक्तिमत्त्वाच्या बाहेरचेही काही असते. कारण त्यात त्याच्या अबोध मनाच्या हालचालीचे प्रकटन असते. म्हणूनच त्यात रचनाकाराची हेतुपुरस्सरता फारशी असत नाही. ह्या प्रक्रियेला आळवणे, उत्तेजित करणे, तिची वाट पाहाणे यांची जरुरी असते. अर्थात उत्कृष्ट रचनासिद्धी हे माणसाच्या मेंदूचे अपत्य असूनही संपूर्णपणे हेतुपूर्तता त्यात नसते. त्याची हालचाल गूढ रीतीने होत असून त्यावर केवळ बुद्धीचे वर्चस्व असू शकत नाही. त्याला कधीकधी मोकळे सोडले पाहिजे. त्यामुळेच काही लोकविलक्षण निर्मिती होण्याची शक्यता आहे.

काही लोकांच्या मते जगातला कोणताही धर्म हा माणसाला एखादा श्रद्धाविषय प्राप्त करून देतो आणि तो लाभल्यावर जगात त्या राहाण्यातील अर्थ तो लावून घेतो आणि त्यामधील स्वत:ची जागा तो ओळखू शकतो. माणसाच्या वर्तणुकीबद्दल धर्म हा विशिष्ट आदेश देतो आणि देवत्वापर्यंतच्या श्रेणीतील त्याचे स्थान त्याला पटवून देतो. आपण एक ईश्वरप्रणीत योजनेतील भागीदार आहोत अशी त्याची खात्री होते. मग तो कोणत्याही अवस्थेत आपले क्षुल्लक जीवन कंठीत असो. धर्माधर्मात केवढेही अंतर असले तरी जीवनाच्या कोलाहलात एका तऱ्हेची सुसूत्रता आणण्याचा माणसाच्या मनाचा त्यातल्या कोणत्याही धर्माकडून प्रयत्न केला जातो. माणसाचा जीवनव्यवहार हा एकतर्फी, अंदाज येत नसलेला, अन्यायी आणि जुलमी असेलही; पण श्रद्धावान माणसे ईश्वराची तशी इच्छा नाही या कल्पनेतच रममाण होतात आणि पापी जीव त्या कल्पनेला तडा देतात अशी समजूत करून घेतात. तरीसुद्धा याच्या उलट दुसरीही विचारसरणी सांगते त्याप्रमाणे माणूस हा स्वभावत:च समजूतदार आणि सद्वर्तनी असला तरी त्याचे सद्हेतू हे लहरी आणि जुलमी दैवताकडून निष्फळ केले जातात.

संगीत हा श्रद्धेचा विषय नाही. तरी त्याचे महत्त्व आणि मनोवेधकता ही माणसाच्या जीवनानुभवाला विशिष्ट रीतीने आकार देण्याच्या पद्धतीवर अवलंबून आहे. थोर प्रकृतीचे संगीत आपल्या भावनांना आवाहन करते आणि त्यातल्या आकृतिबंधात माणसांचे मनोविकार स्वत:च्याच आनंदात निमग्न राहातात. असे नीलो म्हणतो. संगीत जीवनाला उन्मत्त करते समृद्धी देते आणि त्यात अर्थ व भावार्थही आणते. त्याची रचना करणाऱ्या संगीतकारानंतरही ते टिकून राहाते. व्यक्तिसापेक्ष ते असतेही पण त्याही पलिकडे त्याचे प्रगमन आढळून येते. असंभाव्य अशा जगाच्या हालचालीत ह्या संगीताच्या रसिकांना एक निश्चित आधारस्थान मिळाले. माणसातील भावमीलन, उल्हास आणि आशा यांचा स्त्रोत असून तो कधी आटत नाही. संगीत ही अशी वस्तू आहे की तिच्याकरिता या जगात राहाणे उचित आहे असे नीलोप्रमाणेच माझे मत आहे. हे परत प्रतिपादन करून हा विषय मी संपवितो. संगीताने माझे जीवन समृद्ध केले आहे. तो एक अलभ्य आणि कल्पनातील असा प्रसाद आहे.

---



अनुक्रमणिका

# विज्ञान

## "गणित – विज्ञानाची भाषा" – लेखांक ३

### चित्रा नित्सुरे

"निसर्गात ज्या सुंदर व असंदिग्ध कल्पना आहेत त्या आपल्या या वैशिष्ट्यांमुळे ज्ञानाचा विषय बनतात. सर्व कुरूप, संदिग्ध व दुर्बोध कल्पनांपेक्षा त्या स्वाभाविकपणे श्रेष्ठ ठरतात." – **निकोमॅकस**

अंकगणित, भूमिती, कॅलकुलस, कोऑर्डिनेट भूमिती, संख्या सिद्धांत, टोपोलॉजी इ. गणिताच्या अनेक शाखा आज ज्ञात आहेत. या सर्व शाखा तर्कशुद्ध विचार पद्धतीवर आधारलेल्या आहेत. या सर्वच शाखांनी तंत्रज्ञानाच्या विकासात तसेच दैनंदिन व्यवहार सुलभ करण्यात हातभार लावला आहे. तरीही अंकगणित व संख्यासिद्धांत (Number Theory) या दोन शाखांच्या विवेचनपद्धतीत प्रचंड विरोधाभास आढळतो. गणिताच्या विद्यार्थ्यांना ही तफावत संभ्रमात टाकणारी आहे.

अंकगणिताचे नियम अतिशय सुबोध असतात. साध्या, सोप्या उदाहरणाद्वारे ते समजावता येतात. कल्पनाशक्तीला ताण न देता हे नियम सिद्ध करता येतात. हे नियम स्थल– काल सापेक्ष नसतात. थोडक्यात, हे नियम सार्वत्रिक असतात. या सर्व गुणांमुळे अगदी किमान बौद्धिक कुवत लाभलेला विद्यार्थी देखील ते सहजपणे आत्मसात करू शकतो. अंकगणिताचे नियम शिकल्यावर निरनिराळ्या गणना करणे म्हणजे मेंदूत साठवलेल्या नियमातील योग्य तो नियम निवडून त्याचा वापर करणे इतकं सोपं असत. असे प्रशिक्षण मिळालेला मानवी मेंदू विजेच्या चपळाईने अंकगणिती क्रिया करू शकतो. जणू हिंडत्या फिरत्या गणकयंत्राचाच नमुना! यांत्रिक गणकयंत्राच्या तुलनेत हे मानवी यंत्र अधिक उपयुक्त ठरतं ते त्याच्या सुटसुटीतपणामुळे! वाटेल तेव्हा, हवे त्या ठिकाणी ते सहज नेता येतं.

या विरुद्ध संख्यासिद्धांत ही अतिशय अवघड व क्लिष्ट अशी गणिताची शाखा आहे. यात विशद केलेल्या समस्या वाचल्या की त्या खूप सोप्या आहेत असं वाटतं. काही काही समस्या तर स्वयंसिद्ध वाटतात. उदाहरणादाखल एक समस्या बघूया. " $\frac{p}{q}$ ही एक परिमेय संख्या आहे. ($q \neq 0$). जर q ही संख्या फक्त २,५ या मूळ अवयवांपासून तयार झाली असेल तरच $\frac{p}{q}$ या संख्येला अनावर्ती दशांश संख्येत बदलता येते." हे विधान तपासण्यासाठी p व q च्या काही किंमती निर्धारित करूया. जर $p = 13$ व $q = 4$ असं मानलं तर $\frac{p}{q} = \frac{13}{4} = 3.25$ होते. जर $p = 13$ व $q = 10$ असं मानलं

तर $\frac{p}{q}$ = $\frac{13}{10}$ = 1.3 होते. या दोन्हीं उदाहरणात q चे अवयव फक्त 2 किंवा 5 हेच आहेत. मात्र q = 9 घेतला तर q चा अवयव होते 3 आणि मग $\frac{p}{q}$ ची किंमत होते $\frac{१३}{९}$ = 1.44. ही आवर्ती दशांश संख्या आहे. अशा उदाहरणांच्या मदतीने हे विधान सिद्ध करता येते. पण हे विधान p व q च्या सर्व किंमतीसाठी लागू पडतं किंवा नाही यासाठी p व q च्या निरनिराळ्या किंमती ठरवून अमर्याद उदाहरणं सोडवणं केवळ अशक्य आहे. अशा वेळी गणितज्ञ अप्रत्यक्ष पद्धतींचा अवलंब करतात. p व q च्या किंमती निर्धारित न करता हे विधान सिद्ध करण्याचा प्रयत्न करतात. अशा प्रकारच्या सिद्धतेत मांडलेले मुद्दे हे व्यक्तीसापेक्ष भिन्न भिन्न असू शकतात. यात अंतस्फूर्तीस संपूर्ण वाव असतो. एकाच समस्येची वेगवेगळ्या गणितज्ञांनी केलेली उकल वाचली तर त्यातील सामाईक मुद्दे शोधणं महामुश्किल काम असतं. अकल्पनीय चातुर्य व महान गणिती नैपुण्य लाभलेली व्यक्तीच हे करू जाणे. संख्यांचे बहुतेक गुणधर्म अशाच अप्रत्यक्ष पद्धतींनी प्रकाशात आले आहेत. अंतस्फूर्ती, अनुमान व अनुभव यांच्या मिलाफातून आजचा संख्यासिद्धांत विकसित झाला आहे. मात्र या दीर्घ व अवघड प्रवासात अनेक अपघातही झाले आहेत. शतकानुशतके प्रस्थापित असलेली विधाने सत्यतेच्या कसोटीवर न उतरू शकल्याने पदच्युत झाली आहेत. संख्यासिद्धांतात अजिंक्य पर्वतशिखराप्रमाणे असणाऱ्या अनेक समस्यांचे आव्हान आजही गणितज्ञाना पेलता आलेले नाही. अनेक गणिती आजही या समस्यांची उकल शोधण्यासाठी प्रयत्नशील आहेत.

गणितांच्या शाखांचे ढोबळ मानाने दोन प्रकार म्हणता येतील. एक म्हणजे पूर्णपणे सैद्धांतिक स्वरूपाच्या व दुसऱ्या व्यवहारात व तंत्रज्ञानात वारंवार उपयोगी ठरणाऱ्या. या दोन्ही प्रकारच्या कारणास्तव अंकगणित ही इतर कुठल्याही विज्ञान शाखेपेक्षा अधिक उपयुक्त ठरलेली गणिताची शाखा आहे. जनसामान्यांपर्यंत पोचलेली ही एकमेव ज्ञान शाखा आहे.

दुसरीकडे संख्यासिद्धांत म्हणजे किमान उपयुक्तता असणारी गणिताची शाखा असा समज दृढ आहे. केवळ तंत्रज्ञान विकासाच्या दृष्टीने ही शाखा निष्प्रभ ठरली आहे असे नव्हे, तर सैद्धांतिक गणिताच्या प्रांतात देखील हिच्या नशिबी उपेक्षिताचे जिणे आले आहे. अतिशय विरळ व नाजूक धाग्याने ती विज्ञानाच्या मुख्यक्षेत्राशी जोडली गेली आहे.

उपयुक्ततावादी दृष्टिकोनातून संस्कृतीच्या इतिहासाचा अर्थ लावणारे "अंकगणिताचा विकास संख्यासिद्धांताच्या आधी झाला" असा निष्कर्ष काढतात. मात्र वस्तुस्थिती अगदी विरुद्ध आहे. पूर्णांक संख्या सिद्धांत (Theory of Integers) ही गणिताची अति पुरातन शाखा आहे. अंकगणिताचे वयमान अवघे चार शतके इतकेच आहे. ग्रीक भाषेतील "ॲरिथमॉस" (Arithmos) या शब्दाचा अर्थ आहे "संख्या" व ॲरिथमॅटिका (Arithmetica) म्हणजे संख्यासिद्धांत. सतराव्या शतकाच्या अखेरपर्यंत हे शब्द अशाच अर्थाने वापरत असत. अंकगणितासाठीचा त्यांचा समानार्थी शब्द ॲरिथमॅटिक (Arithmetic)

नसून "लॉजिस्टिका" (Logistica) होता. मध्ययुगात याच शब्दाला "अॅल्गोरिजम" (Algorism) ही संज्ञा प्राप्त झाली. शब्दव्युत्पत्तीच्या या इतिहासावरून हे स्पष्ट होते. की संख्या सिद्धांत अंकगणिताच्या आधी विकसित झाला.

आता एक संख्या आख्यान मी सांगणार आहे. गणिती संकल्पनांच्या विकासाशी त्याचा अर्थाअर्थी काहीही संबंध नाही. मात्र या संकल्पना विकसित होण्याची प्रक्रिया कशी असते हे मात्र यातून स्पष्ट होईल.

प्रत्येक पूर्णांकाचे विशिष्ट गुणधर्म मानवाच्या तर्कशक्तीला खुणावत असत. मानवाने आपली प्रतिभा पणाला लावून हे गुणधर्म सर्वांना उलगडून दाखवले. पण दुसरीकडे मात्र याच पूर्णांकांच्या अंगभूत– म्हणूनच बिन महत्त्वाच्या वाटणाऱ्या गुणधर्मांना कुठल्याही निकषावर घासून न पाहाता डोळे झाकून स्वीकारले. अशा विसंगत वर्तनाचे स्पष्टीकरण कसे काय द्यावे?

सतराव्या शतकातील महान फ्रेंच तत्त्ववेत्ता मॉंटेस्क्यू म्हणतो, "मानवी आयुष्य म्हणजे फोल आशा व आधारशून्य भय यांची निरंतर मालिका आहे. अमूर्त, संदिग्ध, धार्मिक गूढ-वादाच्या रूपात या आशा व भय व्यक्त होताना आपण पाहातो. पूर्वी या आशा व भय अधिक ठोस व पार्थिव प्रतिमा धारण करत. नक्षत्रे, मौल्यवान रत्ने, हिंस्त्र प्राणी, जादुई जडीबूटी, शुभ, अशुभ शब्द अगर अंक या सारख्या गोष्टी मानवी भयाचे दलाल होते. अशा दलालांच्या अस्तित्वातून आशा व भय प्रकट होत."

शकुन अपशकुनांच्या सर्व कल्पनांविषयींच्या तीव्र तिटकाऱ्यातूनच विज्ञानाच्या सर्व शाखांची उत्पत्ती झाली असावी. खगोलशास्त्रापूर्वी फलज्योतिष शास्त्र होते. रसायनशास्त्राचा जन्म जादूटोणा, चमत्कार करून दाखवणाऱ्या भोंदूबाबांना ज्ञात असलेल्या रसायनशास्त्रातून झाला. संख्या सिद्धांताच्या आगमनाची पूर्वसूचना एक प्रकारच्या अंकशास्त्राने (Numerology) दिली. अंधश्रद्धा व शुभाशुभलक्षण यांच्याशी आपण आज फारकत घेतली असली तरी अंकशास्त्राला आजही समाजात मान्यता आहे.

बायबलच्या विविध आवृत्यांमध्ये शुभाशुभ अंकांचा उल्लेख असलेले दाखले ठिकठिकाणी सापडतात. हिब्रू (ज्यू) लोकांनी स्वीकारलेल्या बायबलाच्या पुस्तकात जेरिको–वरच्या विजयाची कथा सांगितली आहे. जेरिको हे शहर आता जॉर्डन देशात, मृत समुद्राच्या उत्तरेकडे आहे. ज्यू धर्मोपदेशक मोझेसचा सेनानी जोशुआच्या नेतृत्वाखाली "सात पुजारी सतत सात दिवस, तुतारी फुंकत होते. त्यांनी जेरिकोला वेढा घातला. सातव्या दिवशी या नगराभोवतीचे तट ढासळून पडले व त्या पुजाऱ्यांनी शहराला सात वेळा प्रदक्षिणा केली."

ईश्वरी कोपामुळे झालेल्या महाप्रलयात नोहाची नौका सर्व सजीव सृष्टी वाचवण्याची धडपड करत होती. त्या गोष्टीत "चाळीस दिवस व चाळीस रात्री चालू असलेल्या संततधार वृष्टीमुळे जलप्रलय झाला," असा उल्लेख आहे.

ज्यूंचा देव जेहोवा याने सिनाय पर्वतावर "सतत चाळीस दिवस व चाळीस रात्री" ज्यू

धर्मगुरू मोझेसला उपदेश केला.

सहा, सात व चाळीस हे अंक हिब्रूंना अभद्रसूचक वाटत. ख्रिस्ती धर्मशास्त्रात मात्र सात शुभ मानतात. सात सद्‌गुण, सात महापापे, सात देवात्मे, ख्रिस्त शिष्या मेरी मग्दालिनच्या शरीरातून हाकलून टाकलेले सात पिशाच्च, कुमारीमाता मेरीची सात हर्षनिधान अशा अनेक सप्तकांचा बायबलमध्ये उल्लेख आहे.

बॉबिलोनिया संस्कृतीत व पर्शियन लोकात मात्र साठ व तिच्या पटीत असलेल्या संख्यांना मान देत असत. पर्शियन सम्राट झेरेक्सस आपल्या सैन्यासह हॅलेसपॉन्ट जवळ खाडी ओलांडत होता. अचानक खाडीवरचा पूल कोसळला. तेव्हा संतापलेल्या झेरेक्ससने समुद्रालाच तीनशे फटके मारण्याचा हुकूम सोडला. या झेरेक्ससचा पिता डेरियसचा शुभलक्षणी, दैवी घोडा नदीत बुडाला. तेव्हा त्याने त्या नदीत तीनशे साठ खड्डे खणण्याचे फर्मान सोडले.

अक्षांश- रेखांशाबरोबरच धार्मिक मूल्ये बदलतात असं म्हणतात. विविध धर्मशास्त्रात तीन, सात, दहा, तेरा, चाळीस व साठ या संख्यांना विशेष स्थान आहे. वस्तुत: प्रत्येक संख्येभोवती कुठल्या ना कुठल्या गूढ अर्थाचं वलय असल्याचं दिसतं. स्थलकालानुसार या संख्या वेगळ्या असतात किंवा त्यांचे अर्थ वेगवेगळे असतात. बॉबिलोनिया संस्कृतीत प्रत्येक देवतेसाठी एक ते साठ पर्यंतची संख्या निश्चित केलेली आढळते. ही संख्या स्वर्गलोकातील त्या देवतेचे अधिकार दर्शवते. पायथागोरसच्या शिष्यगणातही अशा प्रकारचे अंकपूजन प्रचलित होते. संख्यामहात्म्याच्या या दोन्ही संप्रदायात विलक्षण साम्य आढळते. बहुदा आपल्या हातून कुठल्याही संख्येचा अनवधानाने देखील अवमान होऊ नये या भीतीनेच एक ते पन्नास पर्यंतच्या सर्व अंकांना त्यांनी दैवी अर्थ चिकटवला असावा.

संख्याशास्त्राचे अतिशय विकृत व हास्यास्पद रूप म्हणजे जॅमिट्रिया (Gematria) : विशेष म्हणजे हिब्रू व ग्रीक लोकात यांचा विलक्षण प्रचार व प्रभाव होता. या लिपीतील प्रत्येक वर्णाक्षराला दोन अर्थ असत- एक ध्वनीसूचक व दुसरा संख्यासूचक. एखाद्या शब्दाच्या प्रत्येक वर्णाक्षराच्या अंकांची बेरीज करून मिळणारी संख्या ही त्या शब्दाची संख्या ठरत असे. ज्या दोन शब्दांच्या संख्या समान असत ते शब्द एकरूप अगर समानार्थी समजले जात. जॅमिट्रियाचा उपयोग बायबल मधील उताऱ्यांचा अन्वयार्थ.......... लावण्याकरता केला जात असे. त्याचबरोबर एक असाही समज आहे की खुद्द बायबलच्या लेखकांनी या कलेचा अभ्यास केला असावा. "पहिला ज्यू" अब्राहम आपला भाऊ एलियासर याच्या सुटकेसाठी जातो अशी एक कथा बायबलमध्ये आहे. जाताना अब्राहमने ३१८ गुलाम बरोबर घेतले होते. हिब्रू लिपीत 'एलियासर' या शब्दासाठीची संख्या देखील ३१८ आहे. बायबलकारांनी निश्चित केलेली गुलामांची संख्या व जॅमिट्रियाप्रमाणे आलेली संख्या एक असणे हा निव्वळ योगायोग म्हणावा की काय?

ग्रीक पुराणात जॅमिट्रियाचे असंख्य दाखले आढळतात. ट्रॉयच्या ट्रोजन युद्धात शौर्य

गाजवलेले हेक्टर, अॅचिलिस व पेट्रोक्लस हे तीन वीर होते. या तिघात अॅचिलिसला सर्वोच्च स्थान प्राप्त झाले कारण त्यांची "जॅमिट्रिया" संख्या होती १२७६, हेक्टरची संख्या ८७ व पेट्रोक्लसची संख्या १२२५ पेक्षाही मोठी होती.

थॅमागोरस हा एका ग्रीक कवीचा कट्टर शत्रू होता. त्याचा अपमान करावा या हेतूने या कवीने थॅमागोरसची 'जॅमिट्रिया' संख्या लॉयमॉस (Loimos) च्या संख्येइतकीच आहे असे सिद्ध केले. लॉयमॉस हा एक प्राणघातक साथीचा आजार होता. हा अर्थ कळला की या कविमहाशयांना काय सुचवायचे होते ते बरोबर ध्यानी येते.

भूत व भविष्य जाणून घेण्यासाठी जॅमिट्रियाचा फलज्योतिषासारखा वापर ख्रिस्ती धर्मशास्त्रात विशेष करून झाला. ६६६ संख्या पवित्र मानत असत. कॅथॉलिक पंथाचे लोक ६६६ संख्येचा अर्थ "ईश्वरप्रणीत श्वापद" असा लावतात. मार्टिन लूथर किंगचा समकालीन एक धर्मगुरू होता. त्याने जॅमिट्रियावर एक सातशे पानी ग्रंथ लिहिला. त्यातील बराच मोठा भाग ६६६ व तिचे गूढ अर्थ याला समर्पित होता. या धर्मगुरूने ६६६ चा अर्थ Antichrist म्हणजेच येशूचे विलोमरूप असा लावला. हा धर्मगुरू मार्टिन लूथरला पाण्यात बघत असे. त्याने लूथरची जॅमिट्रिया संख्या पण ६६६ आहे हे सिद्ध केले. पर्यायाने लथूर हा Antichrist आहे असे सुचवले. याचे प्रत्युत्तर म्हणून मार्टिन लूथरने ६६६ ही संख्या पोपच्या साम्राज्याचे भविष्य सांगणारी आहे हे सिद्ध केले. लवकरच हे साम्राज्य लयास जाणार आहे, या बद्दल आनंद व्यक्त करून त्याने आपल्या अपमानाचे उट्टे काढले.

हिब्रू धर्मशास्त्राच्या अभ्यासकाला आजही जॅमिट्रियाचा अभ्यास करणे बंधनकारक आहे. बायबलमधील सर्व शब्दांच्या जॅमिट्रिया संख्यात भाषांतर करण्यात ही मंडळी किती तरबेज असतात याची कल्पना पुढील प्रसंगावरून येईल.

हिब्रू धर्मगुरू एका पाठोपाठ एक असे अनेक अंक भराभर उच्चारत असतो. या अंकात लक्षात यावा असा कुठलाही परस्परसंबंध नसतो. हा प्रकार सुमारे दहा मिनिटे चालतो. काही अंक लहान असतात तर काही पाचशेच्या घरातले असतात. एक शिष्य हे अंक भराभर लिहून घेतो. हा धर्मगुरू हे अंक पुन्हा एकदा त्याच क्रमाने, अचूकपणे उच्चारणार असल्याची घोषणा करतो. खरोखरच पुन्हा एकदा तो वेगाने हे अंक अस्खलितपणे उच्चारून दाखवतो. श्रोते थक्क होऊन हे बघत असतात. त्याने एवढी मोठी अंकमालिका कधी पाठ केली असावी, या विचारात बुडून जातात. यातली खरी मेख वेगळीच आहे. हिब्रू धर्म ग्रंथातील कुठल्या तरी परिच्छेदाचे जॅमिट्रियाच्या भाषेतले रूपांतर हा धर्मगुरू म्हणून दाखवत असतो.

आता पायथागोरसच्या संख्यामय तत्त्वज्ञानाकडे वळूया. या तत्त्वज्ञानात संख्यापूजनाला सर्वोच्च स्थान आहे. त्यांना सम संख्या विद्राव्य, म्हणूनच क्षणभंगूर, ऐहिक व स्त्रीलिंगी वाटतात. प्रत्येक संख्येशी एकेका मानवी वैशिष्ट्याचा संबंध जोडला होता. 'एक' हें तर्काचे प्रतीक होते,कारण ही संख्या कुठल्याही घातांकासाठी अपरिवर्तनीय असते. ( $1 = 1^2 = 1^4 = 1^9$



अनुक्रमणिका

इ. इ. ) दोन व्यक्ती एकत्र आल्या की भिन्न मतप्रवाहांचा उगम होतो म्हणून की काय "दोन" ही "मत"प्रदर्शक संख्या होती. "चार" हे न्यायाचे प्रतीक व "पाच" ही विवाहदर्शक संख्या मानली जात असे. पहिली स्त्रीलिंगी संख्या २ व पहिली पुल्लिंगी संख्या ३ यांचा संयोग (बेरीज) होऊन ५ ही संख्या बनते.

चिनी पुराणात पण अशा संख्यापूजनाचे अनेक दाखले आढळतात. येथे विषम संख्या दिवस, श्वेत वर्ण, ऊष्णता, सूर्य, अग्नी यांची प्रतीके असत तर समसंख्या रात्र, कृष्णवर्ण, शीतलता, घन पदार्थ, पाणी व पृथ्वी यांची प्रतीके असत. सर्व संख्या एका पाटीवर मांडलेल्या असत. ही पाटी अतिशय पवित्र मानत. Lo Chou नावाची ही पाटी वापरणाऱ्याला संख्यांचे गूढ, जादुई गुणधर्म जाणून घेता येत.

"आशीर्वाद दे, हे ईश्वरी अंका, सर्व देवगण व मानवांच्या निर्मात्या, वर दे! हे परम पवित्र चौकटी, सृष्टीच्या आरंभापासून अंतापर्यंतच्या सर्व निर्मितीची तूच प्रेरणा आहेस. पवित्र दैवी अंकांची सुरुवात एक या विशुद्ध अंकाने होते. अंकांचा विकास फक्त चारपर्यंत होतो. यानंतर जन्म होतो तो पवित्र 'दहा'चा. ही संख्या सर्व अंकाना एकत्र बांधू शकणारी, सर्व-समावेशक, कधीही क्षय न पावणारी अशी महत्त्वाच्या पदावर विराजित आहे."

संख्यांच्या पवित्र चौकटीला उद्देशून पायथागोरसचे अनुयायी ही प्रार्थना म्हणत असत. ही चौकट म्हणजे चार महातत्त्वांचं म्हणजेच अग्नी, जल, वायू व पृथ्वीचे प्रतीक होती. प्रथम चार अंकांच्या एकत्रीकरणातून अर्थात $1 + 2 + 3 + 4 = 10$ दहाची निर्मिती होते हे अंकगणिती सत्य पायथगोरसला काही वेगळ्याच आशयाने स्पर्शून गेले असावे. या विषयीची एक आख्यायिका प्रसिद्ध आहे– पायथागोरसने आपल्या नव्यानेच झालेल्या शिष्याला पहिले चार अंक मोजायला सांगितले. इथे एक मुद्दा लक्षात ठेवायला हवा की "अंक मोजणे" हे त्याकाळी चिन्हरूपात संख्यांची बेरीज करणे अशा स्वरूपात होत नसे..पण संख्या टिंबांच्या रूपात मांडलेल्या असत. प्रथम चार अंक (म्हणजे $1 + 2 + 3 + 4$ अशी सर्व टिंबं) मोजल्यावर उत्तर आले दहा. या उत्तरावर पायथागोरस उद्गारला," बघ तू ज्या संख्यांना फक्त चार समजत होतास, प्रत्यक्षात ती दहा आहे. एक परिपूर्ण त्रिकोण आहे."

इथे परिपूर्ण त्रिकोणाचा संदर्भ समजावून घेणे आवश्यक आहे. टिंबांच्या चढत्या अगर उतरत्या मांडणीने समभुज त्रिकोणाकृती तयार होते. हाच पायथागोरसचा परिपूर्ण त्रिकोण. असे त्रिकोण रचू शकणाऱ्या संख्यांना त्रिकोणी संख्या म्हणत. सोबतच्या चित्रात काही त्रिकोणी संख्या दाखविल्या आहेत. १, ३, ६, १०, १५, २१.......... अशा क्रमाने या त्रिकोणी संख्या



वाढत जातात त्रिकोणी संख्यांप्रमाणेच पायथागोरसने परिपूर्ण वर्ग संख्यांची व्याख्या पण दिली

होती. जितक्या टिंबांच्या मांडणीने चौरसाकृती तयार होते तिला पूर्ण वर्ग संख्या असे म्हणत. १,४,९,१६,२५,......... या सर्व पूर्ण वर्ग संख्या होत.



या टप्प्यावरच संख्यासिद्धांताची खऱ्या अर्थाने सुरुवात झाली असावी. या संख्या सिद्धांताला भूमितीचा असा आधार लाभावा हा विलक्षण योगायोग आहे. दोन लगतच्या त्रिकोणी संख्यांची बेरीज पूर्ण वर्गसंख्येइतकी असते हे पायथागोरसच्या शिष्यांना ज्ञात होते. उदाहरणार्थ १६ ही चौथी पूर्ण वर्ग संख्या आहे. तिसऱ्या व चौथ्या त्रिकोणी संख्यांची बेरीज देखील 6 + 10 = 16 येते. पायथागोरसने ही बेरीज टिंबांच्या मांडणी पद्धतीनेच केली असावी.




हल्ली शाळातून काही क्रमवार नैसर्गिक संख्यांची बेरीज करण्याच्या पद्धती शिकवतात. त्यांचे मूळ या त्रिकोणी संख्यात सापडतं. प्रत्येक त्रिकोणी संख्या ही क्रमवार नैसर्गिक संख्यांची बेरीजच असते. उदाहरणार्थ १५ ही पाचवी त्रिकोणी संख्या म्हणजे

1 + 2 + 3 + 4 + 5 अशा तऱ्हेने मांडता येते. सातवी त्रिकोणी संख्या म्हणजे

1 + 2 + 3 + 4 + 5 + 6 + 7 = 28 होते. सिद्धांत रूपात असे म्हणजता येईल की 'n' वी त्रिकोणी संख्या म्हणजे १,२,३,४,५,........ अंकगणितीय श्रेणीतील पहिल्या n पदांची बेरीज असते. अंकगणितीय श्रेणीचे n वे पद $\frac{१}{२} \times n \times (n + 1)$ या सूत्राने काढता येते.

या सूत्रानुसार n व्या त्रिकोणी संख्येच्या आधीची संख्या होते,

$$\frac{१}{२} \times (n - 1) \times n$$

या दोन लगतच्या संख्यांची बेरीज होईल

$$\frac{१}{२} \times (n - 1) \times n + \frac{१}{२} \times n \times (n + 1)$$

$$= \frac{१}{२} \times n \times (n - 1 + n + 1)$$

$$= \frac{१}{२} \times n \times 2n = n^2$$

अंकगणितीय श्रेणीची विविध सूत्रे उपलब्ध असल्याने आता भूमितीचा आधार घ्यावा लागत नाही. मात्र भौमितिक आकृती व संख्यांचा दुसरा, तिसरा घात अशा दोन्ही अर्थाने वापरले जाणारे वर्ग, घन हे शब्द संख्या सिद्धांत व भूमिती यांच्यातील नातं स्पष्ट करतात. आज हे नातं नामशेष झालं आहे. या त्रिकोणी चौरस अगर इतर बहुभुजाकृती संख्या



अनुक्रमणिका

विज्ञानाच्या विकासाच्या दृष्टीनेही फारशा महत्त्वाच्या नाहीत. इसवी सन १०० च्या सुमारास या संख्याचा अभ्यास वैज्ञानिक संशोधनाच्या कक्षेत येत असे.

पायथागोरस पंथियांच्या या संख्या भक्तीचा प्रारंभ कसा व कोठे झाला हा वादाचा मुद्दा आहे. पण एक मात्र निश्चित की या गूढ तत्त्वज्ञानाची मोहिनी तमाम ग्रीक विचारवंतांवर होती. महान तत्त्ववेत्ते प्लेटो व ॲरिस्टॉटल देखील याला अपवाद नव्हते. निरंतर बुद्धिवादाची कास धरून वाढलेल्या, तर्कशुद्ध विचारांवर पोसलेल्या आजच्या आधुनिक व्यक्तीला हे दिखाऊ संख्यापूजन पटत नाही. त्याला हा प्रकार म्हणजे अंधश्रद्धेचे उदात्तीकरण करून त्याला तत्त्वज्ञानाचा दर्जा दिल्यासारखा वाटतो. इतिहासकाराच्या चष्म्यातून बघितल्यास मात्र अधिक उदार दृष्टिकोन स्वीकारावासा वाटतो. या तत्त्वज्ञानाची मूळ कल्पना समजून घ्यायची असेल तर आधी धार्मिक गूढवादाचे आवरण काढून टाकले पाहिजे. सामान्य माणसाला विश्वाची रचना, त्याचे स्वरूप समजावून सांगायचे तर ते सोप्या सुगम भाषेत मांडले पाहिजे. संख्या व भौमित्तिक आकृतीबंध चटकन लक्षात राहातात म्हणून जॅमिट्रिया अगर बहुभुजाकृती संख्यांचा प्रपंच मांडलेला आढळतो. पायथागोरसचा पट्ट शिष्य– फिलॉलस याने अशा प्रकारचे विचार व्यक्त केले आहेत. इसवी सन पहिल्या–दुसऱ्या शतकातल्या विचारवंत निकोमॅकसनेही अशाच प्रकारचे मत प्रकट केले आहे. पायथागोरसच्या तत्त्वांचा पुरस्कार करणाऱ्या व्यक्तींना नव पायथागोरियन म्हणून संबोधले जाते. निकोमॅकस याच पंथाचा एक प्रतिनिधी होता.

"सर्व ज्ञात वस्तूंचा संख्यांशी घनिष्ट संबंध असतो. संख्यांच्या अभावी कुठलीही कल्पना अगर वस्तू समजावून घेणे अगर जाणणे केवळ अशक्य आहे." – फिलॉलस.

"निसर्गातील सर्व वस्तू एका कसबी कारागिराच्या कौशल्याने रचलेल्या असतात. ही रचना विलक्षण आखीव रेखीव, क्रमबद्ध व प्रतवार असते. या रचनेमागची प्रतिभा व तर्क-शक्ती अनुपम आहे. केवळ गणिती प्रज्ञेलाच हे सौंदर्य टिपता येते. म्हणूनच ते अमूर्त तरीही वास्तव व शाश्वत आहे."– निकोमॅकस.

कोणीतरी एकदा पायथागोरसला विचारले, "खरा मित्र कसा असावा?" त्यावर त्याचे उत्तर होते, "खरा मित्र म्हणजे जणू दुसरा मीच– जसे २२० व २८४!" पायथागोरसच्या विलक्षण प्रतिभेचे प्रतीक म्हणून हे उत्तर अजरामर झाले आहे. यातलं मर्म जाणून घ्यायचं तर २२० व २८४ या संख्यांची पूर्ण ओळख होणे आवश्यक आहे. या दोन्ही संख्यांचे अवयव कोणकोणते ते प्रथम बघूया. २८४ चे अवयव आहेत. १,२,४,७१ व १४२. अर्थात या सर्व संख्यांनी २८४ ला भागले असता शेष काही उरत नाही. २२० चे अवयव आहेत. १,२,४,५,१०,११,२०,२२,४४,५५ व ११०. आता २८४ च्या सर्व अवयवांची बेरीज करूयां–

$1 + 2 + 4 + 71 + 142 = 220$

तर २२० च्या सर्व अवयवांची बेरीज होते–

1 + 2 + 3 + 4 + 5 + 10 + 11 + 20 + 22 + 44 + 55 + 110 = 284.

ज्याप्रमाणे २२० व २८४ या संख्या एकमेकात सामावल्या आहेत, तसेच एकमेकाच्या हृदयात वास्तव्य करणाऱ्या व्यक्ती म्हणजेच मित्र होय. पायथागोरसने अशा संख्यांना Amicable Numbers अर्थात मित्र संख्या म्हटले. अशी संख्यायुगुले शोधून काढणे हे ग्रीकांपुढे मोठे आव्हान होते. अशी नेमकी किती संख्यायुगुले अस्तित्वात आहेत हा प्रश्न अनुत्तरित आहे. सुमारे शंभर युगुले मात्र ज्ञात आहेत. पायथागोरसपूर्वी हिंदूंना देखील अशा मित्र संख्या ज्ञात होत्या. हिब्रू लोक अशा संख्यांचा संबंध शुभाशुभाशी जोडत असत.

मध्ययुगातील एका राजपुत्राची आख्यायिका प्रसिद्ध आहे. या राजपुत्राच्या नावातील वर्णाक्षरांची बेरीज २८४ होती. वाग्दत्त वधू निवडताना त्याने एक अट घातली होती. त्या मुलीच्या नावाच्या वर्णाक्षरांची बेरीज २२० असावी. २२० व २८४ या संख्यांचा संगम म्हणजे सुखी संसाराची प्रत्यक्ष देवलोकाकडून मिळालेली हमी असा त्याचा विश्वास होता.

आता थोडं परिपूर्ण संख्यांविषयी. एखाद्या संख्येच्या अवयवांची बेरीज बरोबर त्या संख्येइतकी आली तर तिला परिपूर्ण संख्या (Perfect Number) म्हणत. उदाहरणार्थ १४ ही संख्या बघूया. हिचे अवयव आहेत १, २ व ७. यांची बेरीज होते १०. याचा अर्थ १४ ही संख्या तिच्या सर्व अवयवांच्या बेरजेपेक्षा मोठी आहे. अशा संख्येला म्हणायचं अधिक संख्या (Excessive Number). दुसरं उदाहरण बघूया. १२ या संख्येचे अवयव आहेत १, २, ३, ४ व ६. यांची बेरीज होते १६. म्हणजेच १२ ही संख्या तिच्या अवयवांच्या बेरजेपेक्षा कमी भरते. म्हणून ती झाली न्यून संख्या (Defective Number) पण ६ किंवा २८ या लहानात लहान परिपूर्ण संख्या आहेत.

$$6 = 1 + 2 + 3 \quad \text{व}$$

$$28 = 1 + 2 + 4 + 7 + 14,$$

परिपूर्ण संख्यांची ही उदाहरणं हिंदू व हिब्रू लोकांनाही ज्ञात होती. बायबलच्या काही भाष्यकारांनी या संख्यांचा "अत्युच्च रचनामूल्य असणाऱ्या संख्या" असा गौरवपूर्ण उल्लेख केला आहे. विधात्याने सृष्टीची रचना ६ दिवसात केली असा बायबलमध्ये उल्लेख आहे. शिवाय चांद्रमास हा २८ दिवसांचा असतो. या दोन्ही घटनांचा परिपूर्ण संख्यांशी असलेला संबंध बहुधा भाष्यकारांना अभिप्रेत असावा.

परिपूर्ण त्रिकोणाकृती संख्या



पूर्णवर्ग संख्या




ईश्वरी प्रकोपामुळे झालेल्या जलप्रलयाचा व नोहाच्या नौकेचा उल्लेख लेखाच्या आरंभी केला आहे. या प्रलयानंतर पृथ्वीची पुनर्निमिती झाली. नोहाच्या नौकेतून वाचलेले आठ जीव पृथ्वीवर परतले. बायवलच्या भाष्यकारांनुसार आठ ही संख्या परिपूर्ण नाही. म्हणून पृथ्वीची पुनर्निर्मिती सदोष झाली आहे. ६ व २८ च्या पुढच्या परिपूर्ण संख्या निकोमॅकसने शोधल्या. अशा संख्या फार थोड्या आहेत. यावर निकोमॅकस आपल्या "ॲरिथमॅटिका" या ग्रंथात म्हणतो– "निसर्गात कुरूप व निकृष्ट गोष्टी उदंड प्रमाणात विखुरलेल्या आढळतात. सौंदर्य व उत्कृष्टता मात्र अभावानेच आढळते. त्याचप्रमाणे अधिक व न्यून संख्या, परिपूर्ण संख्यांच्या तुलनेत प्रचंड प्रमाणात असतात. संख्यापटावर या संख्या अनियमितपणे विखुरलेल्या दिसतात. परिपूर्ण संख्या मोजक्याच असल्या तरी संख्या पटावर त्यांना सहज शोधता येते. एक अंकी संख्यात ६ ही एकमेव परिपूर्ण संख्या आहे. दोन अंकी संख्यांपैकी २८, तीन अंकी संख्यात साधारण मध्यावर ४९६ ही परिपूर्ण संख्या आहे. चार अंकी संख्यांच्या गटात ८१२८ ही परिपूर्ण संख्या आहे. या सर्व संख्यांच्या एकक स्थानी ६ किंवा ८ हेच अंक असतात. या सर्व संख्या अनिवार्यपणे सम आहेत."

एकक, दशक, शतक, सहस्त्र इ. प्रत्येक दशमान गटात फक्त एकच परिपूर्ण संख्या असते हा निकोमॅकसचा निष्कर्ष अपुऱ्या माहितीवर आधारलेला आहे. ८१२८ नंतरची परिपूर्ण संख्या आठ अंकी आहे. (३,३५,५०,३३६). पाच, सहा व सात अंकी संख्यांच्या गटात एकही परिपूर्ण संख्या नाही. परिपूर्ण संख्यांची इतर वैशिष्ट्ये मात्र निकोमॅकसने अचूक वर्तवली आहेत. विषम आणि परिपूर्ण अशी संख्या अस्तित्वात असल्याचे एकही उदाहरण नाही. विषम संख्या परिपूर्ण का नसतात हे मात्र एक कोडेच आहे.

भूमितीचा जनक, प्रसिद्ध गणिती युक्लिडचा "एलिमेंट्स" हा ग्रंथ प्रसिद्ध आहे. त्याने या ग्रंथात परिपूर्ण संख्यांवर एक स्वतंत्र अध्याय लिहिला आहे. एकंदरीतच ग्रीकांना परिपूर्ण संख्यांविषयी विशेष कुतूहल वाटत असे. युक्लिडने अशा संख्या शोधून काढण्यासाठी एक सूत्र दिलं आहे. P ही एक घन पूर्णांक संख्या असली तर

$2^{P-1}(2^{P}-1)$ ही एक परिपूर्ण संख्या असते.

उदा. जर P = 2 तर $2^{P-1}(2^{P}-1)$ ची किंमत होते

$$2^{2-1}(2^{2}-1) = 2 \times (4-1) = 2 \times 3 = 6$$

आतापर्यंत फक्त १२ संख्या या सूत्राच्या मदतीने शोधता आल्या आहेत. या १२ संख्यासाठी p ची किंमत खालील पैकी असते.

P = 2, 3, 5, 7, 13, 17, 61, 107, 127, 257

P च्या कुठल्याही किंमतीने परिपूर्ण संख्या मिळत नाही. $(२^{p} - १)$ हा अवयव अविभाज्य संख्या असला तरच $२^{p-1}(२^{p} - १)$ ही संख्या परिपूर्ण असते. गतिमान गणकयंत्राने या पुढच्या आणखी पाच संख्या शोधल्या आहेत.

गणितज्ज्ञाना खुणावणाऱ्या संख्यांचा आणखी एक प्रकार म्हणजे अविभाज्य संख्या. या संख्यांना कुठल्याही संख्येने नि:शेष भाग जात नाही. अपवाद फक्त १ व ती संख्या यांचा. १,३,५,७,११,१३ इ. काही अविभाज्य संख्यांची उदाहरणे. संख्यांच्या मोठ्या पसाऱ्यातून अशा संख्या निवडून काढण्याची अभिनव पद्धत इरेटोस्थेनसने शोधली. ही पद्धत 'इरेटोस्थेनसची चाळणी' (The sieve of Eratosthenes) या नावाने प्रसिद्ध आहे. १ ते १०० मधील अविभाज्य संख्या शोधण्याचे काम ही चाळणी करते. 10 x 10 रकाने असलेल्या चौरसात १ ते १०० हे अंक लिहितात. २,३,५ च्या पटीत असणाऱ्या सर्व संख्यांवर फुली मारली की उरलेल्या संख्या अविभाज्य असतात. या पुढील म्हणजे १ ते १००० मधील अविभाज्य संख्या निवडण्यासाठी ३१ पर्यंतच्या संख्यांचे विभाज्य फुली मारून वेगळे काढायचे असतात. (31) = 961 ही १००० पेक्षा लहान अशी शेवटची वर्ग संख्या आहे. अविभाज्य संख्यांचे तक्ते तयार करण्यासाठी आजदेखील ही पद्धत थोड्या फार फरकाने वापरतात.

| | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| 1 | 2 | 3 | 4 | 5 | 6 | 7 | 8 | 9 | 10 |
| 11 | 12 | 13 | 14 | 15 | 16 | 17 | 18 | 19 | 20 |
| 21 | 22 | 23 | 24 | 25 | 26 | 27 | 28 | 29 | 30 |
| 31 | 32 | 33 | 34 | 35 | 36 | 37 | 38 | 39 | 40 |
| 41 | 42 | 43 | 44 | 45 | 46 | 47 | 48 | 49 | 50 |
| 51 | 52 | 53 | 54 | 55 | 56 | 57 | 58 | 59 | 60 |
| 61 | 62 | 63 | 64 | 65 | 66 | 67 | 68 | 69 | 70 |
| 71 | 72 | 73 | 74 | 75 | 76 | 77 | 78 | 79 | 80 |
| 81 | 82 | 83 | 84 | 85 | 86 | 87 | 88 | 89 | 90 |
| 91 | 92 | 93 | 94 | 95 | 96 | 97 | 98 | 99 | 100 |



अनुक्रमणिका

अविभाज्य संख्यांच्या आधुनिक तक्त्यात १०,०००,००० पर्यंतच्या संख्यांचा समावेश आहे. इरेटोस्थेनसची ही पद्धत पूर्णपणे अनुमानजन्य आहे. हिची उपयुक्तता मर्यादित आहे. या पद्धतीने अविभाज्य संख्यांचे इतर गुणधर्म समजत नाहीत. अविभाज्य संख्या किती आहेत? युक्लिडने या प्रश्नाचे उत्तर दिले. हे उत्तर गणिती प्रावीण्याचा आदर्श म्हणून अजरामर झाले आहे. हे उत्तर काय होतं हे जाणून घेण्यापूर्वी फॅक्टोरियल संख्या (Factorial Numbers) ही संकल्पना समजून घेणे आवश्यक आहे. एखाद्या संख्येची फॅक्टोरियल संख्या म्हणजे त्या संख्येचा तिच्याहून सर्व लहान संख्यांशी केलेला गुणाकार. या संख्या चिन्ह रूपात n ! किंवा |n अशा लिहितात.

उदा. $5! = 5 \times 4 \times 3 \times 2 \times 1 = 120$

$10! = 10 \times 9 \times 8 \times 7 \times 6 \times 5 \times 4 \times 3 \times 2 \times 1 = 36,288,00$

सूत्र रूपाने $n! = n \times (n-1) \times (n-2) \times \ldots \times 3 \times 2 \times 1$

X (१ ते ११) पर्यंतच्या संख्यांच्या फॅक्टोरियलचा तक्ता पुढे दिला आहे) X

युक्लिडने सिद्ध केले की "कुठलीही अविभाज्य संख्या सर्वात मोठी अविभाज्य संख्या होऊच शकत नाही. थोडक्यात अविभाज्य संख्या अनंत आहेत." युक्लिड म्हणतो की जर n ही एक अविभाज्य संख्या असली तर (n ! + 1) ही देखील एक अविभाज्य संख्याच असते. हे जर सत्य नसलं तर n व ( n ! + 1) च्या दरम्यान इतर मूळ संख्या असतील. उदाहरणार्थ जर n = 3 असेल तर ( n ! + 1) = ( 3 x 2 x 1 ) + 1 म्हणजेच 7 होते. 7 देखील अविभाज्य संख्या आहे. जर n = 7 मानले तर (n! + 1) ची किंमत होते 5041. ही संख्या 71 चा वर्ग आहे म्हणूनच अविभाज्य संख्या नाही. पण 7 व 5041 च्या दरम्यान 71 ही 7 पेक्षा मोठी संख्या आहेच. सर्वसामान्य संख्यासाठी हे विधान सिद्ध करण्याची युक्लिडची पद्धत अशी होती:–

"दोन लगतच्या संख्यांना सामाईक विभाजक नसतो. हा नियम n! व (n! + 1) या दोन संख्यांना पण लागू होतो. (n! + 1) चा एखादा अवयव अविभाज्य असला तर त्याची किंमत n ! पेक्षा निश्चितच वेगळी असेल. ही संख्या n पेक्षा मोठी असेल म्हणजेच n व (n! + 1) च्या दरम्यान असेल नाहीतर खुद्द (n! + 1) हीच एक अविभाज्य संख्या असेल. या दोन्ही पर्यायांचा निष्कर्ष हा की n ही एक अविभाज्य संख्या असली तर तिच्याहून मोठी अविभाज्य संख्या निश्चितच अस्तित्वात आहे.

अविभाज्य संख्यांशी संबंधित पुढचा प्रश्न म्हणजे त्यांची प्रत्येक दशमान गटात असलेली विभागणी. हजार संख्यांच्या प्रत्येक गटात असणाऱ्या अविभाज्य संख्यांचा आकडा त्यांची घनता दर्शवतो. अनेक गणितज्ज्ञांनी कौशल्य पणाला लावले पण समाधानकारक उत्तर सापडलं नाही. उत्तर शोधण्याच्या या धडपडीतून एक सत्य मात्र प्रकाशात आलं– संख्या कितीही मर्यादेपर्यंत वाढवल्या तरी त्यांची घनता फारशी घटत नाही.



अनुक्रमणिका

फ्रेंच गणिती बर्ट्रान्डने 1845 मध्ये सिद्ध केले की कुठलीही संख्या व तिची दुप्पट या दरम्यान निदान एक तरी अविभाज्य संख्या असतेच. 50 पन्नास वर्षांहून अधिक् काळ हे विधान "बर्ट्रान्ड चे गृहीतक" म्हणून मान्यता पावले होते. शेवटी Tchebyshov या रशियन गणितज्ज्ञाने सिद्ध केले की एखादी संख्या व दुप्पट यात जेवढे संख्यात्मक अंतर आहे त्यापेक्षा किती तरी कमी अंतरात अविभाज्य संख्या आढळतात. इटालियन गणितज्ज्ञ वोनोलिसने एखादी संख्या व तिची दीडपट या दरम्यान असणाऱ्या अविभाज्य संख्यांचा आकडा ढोबळमानाने काढण्यासाठी एक सूत्र शोधले. या सूत्रानुसार दहा कोटी (१००,०००,०००) व पंधारा कोटी (१५,०००,००००) या दोन संख्यांच्या मध्ये दशलक्षपेक्षा अधिक अविभाज्य संख्या आहेत.

१९१९ मध्ये ब्रूनस नावाच्या एका डच गणितज्ञाने सिद्ध केले की संख्यांचे परिमाण वाढत गेल्यावर "जुळ्या अविभाज्य" संख्या कमी कमी होत जातात. ११, १३, ३, ५, ७, १७, १९, २९, ३१, ४१, ४३ सारख्या दोन क्रमवार विषम, अविभाज्य संख्यांना जुळ्या संख्या म्हणतात.

एखादी संख्या अविभाज्य आहे किंवा नाही हे ठरवण्यासाठी विभाज्यतेच्या विविध कसोट्या वापरतात. संख्येच्या एकक स्थानी ० किंवा ५ असल्यास तिला ५ ने नि:शेष भाग जातो. संख्येच्या अंकांची बेरीज ९ च्या पटीत असली तर तिला ३ व ९ दोन्हीने नि:शेष भाग जातो. या सोप्या कसोट्या शालेय पातळीवर शिकवतात. विभाजक परिमाणाने मोठा असला की या कसोट्या अधिक क्लिष्ट होतात. संख्येची अविभाज्यता पडताळून पाहाण्यासाठी पास्कलने १६५४ साली व त्यानंतर सुमारे शंभर वर्षांनी लॅग्रोजेने काही प्रमेये मांडली होती. व्यवहारदृष्ट्या ही प्रमेये फारशी यशस्वी ठरली नाहीत. उच्च गणिती मूल्यांमुळे या प्रमेयांना गणिताच्या इतिहासात मानाचे स्थान मिळाले आहे. ही प्रमेये इतकी क्लिष्ट होती की १५ किंवा २० आकडी संख्या अविभाज्य आहे किंवा नाही हे तपासण्यासाठी उपलब्ध सर्व कसोट्यांचा उपयोग केला तरी उत्तर मिळायला मनुष्याचे आयुष्य पुरणार नाही, असे त्यानंतर उपहासाने म्हटले जाई. अविभाज्य संख्या ही अतिशय सोपी संकल्पना आहे. पण सर्व अविभाज्य संख्यांना लागू पडेल असे एकही सूत्र नाही. अनेक शतके लोटली, अनेक गणितज्ज्ञांची प्रतिभा याकारणी खर्ची पडली, पण व्यर्थ!

विख्यात फ्रेंच गणिती फेरमाने (Fermat) १६४० साली घोषणा केली की त्याला अविभाज्य संख्या दर्शविण्यासाठी एक सूत्र सापडले आहे. या सूत्राच्या मदतीने मिळणाऱ्या संख्यांना फेरमा संख्या म्हणतात.

$$2^{2}+1 = 5, \quad 2^{2^{2}}+1 = 2^{4}+1 = 17$$

$$2^{2^{3}}+1 = 2^{8}+1 = 256+1 = 257$$

$$2^{2^4} + 1 = 2^{16} + 1 = 65536 + 1 = 65537$$

5, 17, 257 व 65537 या पहिल्या चार फेरमा संख्या आहेत. फेरमाने या चारी संख्यांची अविभाज्यता तपासली होती. या आधारावर त्याने विश्वास व्यक्त केला की या सूत्रानुसार अनेक अविभाज्य संख्या तयार करता येतील. फेरमानंतर सुमारे शंभर वर्षानंतर आयलरने सिद्ध केले की फेरमाची पाचवी संख्या अविभाज्य नाही. तिला ६४१ ने नि:शेष भाग जातो. त्यानंतर फेरमाच्या इतर डझनावारी संख्या संयुक्त आहेत हे सिद्ध झाले. अपुऱ्या निरीक्षणांवर विसंबून काढलेले अनुमान गणितज्ञाला कसे गोत्यात आणू शकते याचं हे बोलकं उदाहरण आहे.

अविभाज्य संख्या मिळवण्यासाठी आणखी एक सूत्र आहे. $f(n) = n^2 - n + 41$. या द्विधात समीकरणात n च्या निरनिराळ्या किंमती ठेवल्यास f(n) ची किंमत काढता येते.

जर n = 1 असेल तर $f(n) = (1)^2 - 1 + 41 = 41$

n = 2 साठी $f(n) = (2^2) - (2) + 41 = 43$

अशा प्रकारे n च्या किंमती वाढवत नेल्या तर प्रत्येक वेळी एक अविभाज्य संख्या मिळते. हा क्रम n = 40 होईपर्यंत सुरळीतपणे चालू असतो. n = 41 ला f(n) ची किंमत होते 1681. ही एक संयुक्त संख्या आहे व 1681 = 41 x 41 या रूपात व्यक्त करता येते.

अविभाज्य संख्या मिळवण्यासाठी सूत्र शोधण्याचे प्रयत्न फसल्यावर गणितज्ञांनी अविभाज्यता ठरविण्यासाठी अप्रत्यक्ष कसोटी वापरण्याचा प्रयतन केला. फेर्मा प्रमेय मांडले, “ n या एखाद्या पूर्णांकासाठी n – n ही द्विपदी P ची विभाज्य असते. इथे P ही एक अविभाज्य संख्या आहे.”

उदाहरणार्थ P = 5 असली तर

$$n^5 - n = n(n^4 - 1) = n(n^2 + 1)(n^2 - 1)$$

आता यात n च्या ठिकाणी 8 लिहिले तर

$n^5 - n$ ची फोड होते $8 \times (64 + 1)(64 - 1)$

$= 8 \times 65 \times 63$

यात 65 ही 5 ची विभाज्य आहे.

लेबनिझ आणि आयलर सारख्या पंडितांनी या प्रमेयाला मान्यता दिली होती. खरं तर हे प्रमेय संख्येची अविभाज्यता ओळखण्याची कसोटी नव्हे. सर्व अविभाज्य संख्यांमध्ये अनिवार्यपणे आढळणारा हा गुणधर्म आहे. मात्र अविभाज्यता निश्चित करण्यास हा अपुरा ठरतो. गणिताच्या भाषेत हे प्रमेय अविभाज्यतेच्या Necessary व Sufficient या दोन्ही अटी पूर्ण करत नाही. उदाहरणार्थ,



अनुक्रमणिका

जर $n = 2$ व $p = 341$ असली तर

$2^{341} - 2$ ही संख्या ३४१ ची विभाज्य तर आहे पण ३४१ ही अविभाज्य संख्या नाही.

यानंतरचे प्रमेय विल्सन प्रमेय या नावाने प्रसिद्ध आहे. हे प्रमेय म्हणजे अविभाज्यतेची कसोटीच आहे. अविभाज्य संख्यांचे किमान व अनिवार्य गुणधर्मही या प्रमेयाच्या साहाय्याने तपासता येतात. लेबनिझने या प्रमेयाची सिद्धता दिली होती. म्हणून याला लेबनिझ प्रमेय हे नाव अधिक योग्य वाटते. लेबनिझनंतर लॅग्रांजेने देखील हे प्रमेय अविभाज्यतेची संपूर्ण कसोटी आहे असे जाहीर केले. सोबतच्या तक्त्यात विल्सन प्रमेय मांडले आहे.

| n | n ! | n + 1 | | ( n ! + 1 ) | विल्सन निर्देशांक (शेष) |
|---|---|---|---|---|---|
| 1 | 1 | 2 | अविभाज्य | 2 | 0 |
| 2 | 2 | 3 | अविभाज्य | 3 | 0 |
| 3 | 6 | 4 | संयुक्त | 7 | 3 |
| 4 | 24 | 5 | अविभाज्य | 25 | 0 |
| 5 | 120 | 6 | संयुक्त | 121 | 1 |
| 6 | 720 | 7 | अविभाज्य | 721 | 0 |
| 7 | 5040 | 8 | संयुक्त | 5041 | 1 |
| 8 | 40320 | 9 | संयुक्त | 40321 | 1 |
| 9 | 362880 | 10 | संयुक्त | 362881 | 1 |
| 10 | 3628800 | 11 | अविभाज्य | 362880 | 0 |
| 11 | 39916800 | 12 | संयुक्त | 39916801 | 1 |

तक्त्यात जेव्हा (n + 1) ही अविभाज्य संख्या असते तेथे (n ! + 1) ही संख्या (n + 1) ची विभाज्य असते म्हणून शेवटच्या रकान्यात विल्सन निर्देशांक (n ! + 1 ला n + 1 ने भागल्यावर आलेली शेष संख्या) शून्य असते. (n + 1) जेव्हा सुंयक्त संख्या असते तेव्हा विल्सन निर्देशांक शून्येतर असतो. प्रमेय रूपात लिहायचे झाले तर – "(n + 1) ही संख्या (n! + 1) चा अवयव असणे एवढीच अट (n + 1) ला अविभाज्य ठरविण्यासाठी अनिवार्य (necessary) आणि पुरेशी (Sufficient) आहे."

या प्रमेयाला सैद्धांतिक गणितात महत्त्वाचे स्थान आहे. (n + 1) जर एखादी मोठी, अनेक अंकी संख्या असली तर n ! + 1 ही संख्या प्रचंड मोठी होते आणि विल्सन निर्देशांक काढणे अवघड होते. त्याचबरोबर नुसते (n + 1) या संख्येकडे बघूनही ती अविभाज्य आहे का हे सांगता येत नाही.

अविभाज्यता अप्रत्यक्ष पद्धतीने निश्चित करण्यासाठी असे अनेक सिद्धांत मांडले गेले

आहेत. आयलरचा समकालीन गणिती गोल्डबॅकने मांडलेला सिद्धांत "गोल्डबॅकचे गृहीतक" म्हणून प्रसिद्ध आहे. "प्रत्येक समसंख्या ही दोन अविभाज्य संख्यांची बेरीज असते," असे बेधडक विधान गोल्डबॅकने केले. १०००० पर्यंतच्या आणि काही मोठ्या संख्यांसाठी या विधानाची सत्यता पटली आहे. मात्र इतर मोठ्या संख्यांसाठी हे विधान सिद्ध करण्याचे आव्हान आजही गणितज्ज्ञांच्या प्रतिभेला खुणावत आहे.

"दोन घन संख्यांची बेरीज तिसरी घन संख्या असणे अशक्य आहे. तसेच दोन भिन्न भिन्न संख्यांच्या चतुर्थ घाताची बेरीज तिसऱ्या संख्येचा चतुर्थ घात असणे शक्य नाही. वस्तुत: दोनपेक्षा मोठ्या घातांकासाठी अशा प्रकारची समीकरणे मांडता येणारच नाहीत. या विधानाची एक मौलिक सिद्धता मला सुचली आहे. इतक्या अरुंद समासात ती लिहिता येणार नाही."

फेर्माने डायरीतल्या समासात अशी नोंद केली आहे. ही नोंद केली त्याला आज शंभरावर वर्षे उलटून गेली आहेत. फेर्माला सुचलेली सिद्धता गुप्तच राहिली. डायरीतला समास अधिक रुंद हवा होता अशी हळहळही अनेक गणितज्ञांनी व्यक्त केली. फेर्माला पडलेल्या या प्रश्नाचे मूळ इतिहासात थेट इजिप्शियन संस्कृतीत आहेत. ३ : ४ : ५ अशा प्रमाणात बाजू असणाऱ्या त्रिकोणाची माहिती या लोकांना होती. चीनमध्ये असा त्रिकोण सुतारकामासाठी आजही वापरतात. काटकोन त्रिकोणाच्या बाजूंची मापे पूर्णांक प्रमाणात असल्याची अनेक उदाहरणे आज माहीत आहेत. पायथागोरसचे प्रसिद्ध प्रमेय याच त्रिकोणांवर आधारित आहे. या त्रिकोणाच्या बाजूंच्या प्रमाणांना पायथागोरसची त्रिकूटे म्हणतात. (६,८,१०), (९,१२,१५), (१२,१६,२०), (७,२४,२५) ही अशीच काही पायथागोरस त्रिकूटे. इसवी सन तिसऱ्या शतकात डायोफॅन्टस नावाचा गणिती अलेक्झेंड्रियात होऊन गेला. त्याने ॲरिथमॅटिका नावाचा ग्रंथ लिहिला आहे. या ग्रंथात अशी त्रिकूटे शोधण्यासाठी सूत्रे दिलेले आहे. आधुनिक भाषेत $x + y = z$ या समीकरणाचा पूर्णांक उकलसंच म्हणजे पायथागोरसची त्रिकूटे.

१६२१ साली डायोफॅन्टसच्या ग्रंथाची नवीन आवृत्ती फेर्माच्या हाती आली. त्याने या ग्रंथाच्या समासात लिहिले — " $x^n + y^n = z^n$ या समीकरणाची उकल करा. x, y, व z हे पूर्णांक आहेत. पण n हा 2 पेक्षा मोठा पूर्णांक असल्यास या समीकरणाची उकल करणे अशक्य आहे." फेर्माची ही नोंद वाचून अनेक गणितज्ञ बुचकळ्यात पडले.

आयलरने $n = 3$ आणि $n = 4$ साठी असे समीकरण सोडवणे अशक्य आहे हे सिद्ध केले. डिरीक्लेटने $n = 5$ साठी असे समीकरण सोडवण्याची आपली असमर्थता व्यक्त केली.

$x^n + y^n = z^n$ स्वरूपाच्या समीकरणात n अविभाज्य असला व समीकरण सोडवता आलं तर ते n च्या संयुक्त किंमतीसाठी पण सोडवता येते. पण 269 पेक्षा लहान सर्व घातांकासाठी अशा समीकरणांचा उकलसंच असूच शकत नाही याची खात्री झाली आहे. फेर्माने समासात मांडलेला विचार सत्य आहे याचा प्रत्यय तर आला पण याची

कारणमीमांसा मात्र कोणी करू शकले नाहीत. फेर्माने आधीच्या नोंदीत सिद्धता सुचल्याचा जो दावा केला आहे त्याविषयी शंका घेण्यास इथे भरपूर वाव आहे.

फेर्माच्या या कूट प्रश्नाला पुढे अमाप प्रसिद्धी व लोकप्रियता मिळाली. श्री. वुल्फस्कूल नावाच्या गृहस्थाने ही समस्या सोडवणाऱ्यासाठी १०००० मार्क चे पारितोषिक जाहीर केले. या महाशयांनी स्वत: ही समस्या सोडवण्यासाठी बराच वेळ खर्च केला होता. एवढं करूनही समस्येची उत्तराच्या दिशेने तसूभरही प्रगती झाली नाही ही गोष्ट अलाहिदा. वूल्फस्कूलच्या या आवाहनाला प्रचंड प्रतिसाद मिळाला. वर्तुळाचे चौरसात रूपांतर करणे, कोनाचे तीन समान भाग करणे, अविरत चालू शकणारे यंत्र तयार करणे इत्यादि. समस्यांशी अहोरात्र झटापट करणारे हौशे– नवशे– गवशे आता फेर्माच्या प्रमेयावर तुटून पडले. 1908 ते 1911 या तीन वर्षात पारितोषिकसमितीकडे हजाराहून अधिक "परिपूर्ण" उत्तरे येऊन थडकली. समितीकडे पाठवलेले उत्तर पूर्वप्रकाशित असायला हवे ही अट होती म्हणून बरं! अनेकांचा उत्साह या अटीमुळे मावळला तर काही अतिउत्साही अभ्यासकांनी स्वखर्चाने उत्तर प्रकाशित करून समितीकडे पाठवले. मात्र एकाही स्पर्धकाने समस्येचा पूर्वेतिहास जाणून घेण्याचा प्रयत्न केला नव्हता.

पूर्वीच्या गणितज्ज्ञांनी या समस्येविषयी केलेले लेखन नजरेखालून घालण्याचे कष्ट घेतलेले दिसत नव्हते. या समस्येत नेमकी मेख कुठे आहे ते कोणालाच उमगले नव्हते.

गेल्या तीन शतकातील सर्व गणितज्ज्ञांना या समस्येने झपाटून टाकले होते. आयलर, लॅग्रोजे, कुमर, रीमान इ. सर्वांनी फेरमाचे विधान सिद्ध करण्याचे किंवा ते खोटे ठरविण्याचे प्रयत्न केले. पण कोणालाही यश मिळाले नाही. ही समस्या सोडविण्याच्या निमित्ताने जेवढे लिखाण झाले आहे ते एकत्र करायचे झाले तर एखादे छोटेखानी पुस्तकालय भरून जाईल. या प्रदीर्घ पाठलागात कधी गणितज्ज्ञच जनतेच्या टीकेचे लक्ष्य झाले. काही गणितज्ज्ञांनी निरोशेपोटी आत्महत्या केली. काही गणितज्ज्ञ या समस्येच्या उत्तराच्या अगदी जवळ पोचले. पण हे उत्तर मात्र मृगजळाप्रमाणे त्यांना लांब लांब नेऊ लागले. दमछाक झालेले हे गणितज्ज्ञ मग दिशाहीन होऊन भरकटत गेले. या सर्व दुर्दैवी घटनांना कारणीभूत ठरला– फेरमाने समासात लिहिलेला संक्षिप्त, संदिग्ध मजकूर!

आता मात्र हा पाठलाग संपला आहे. अमेरिकेतील प्रिन्स्टन विद्यापीठातील ॲन्ड्रयू वाइल्स ( Andrew Wiles) नावाच्या ब्रिटिश गणितज्ज्ञाने १९९३ साली फेरमाचे हे गृहीतक सिद्ध करून दाखवले. ॲन्ड्रयूच्या या संशोधनाला वृत्तपत्रातून प्रसिद्धी मिळाली. गणिताच्या जगात यामुळे आनंदी आनंद झाला. फेरमाचे गृहीतक अखेर सिद्धांत म्हणून प्रस्थापित झाले. या घटनेमुळे गणित, विज्ञान व तंत्रज्ञान या क्षेत्रात कुठलीही मोलाची भर पडलेली नाही. हा सिद्धांत गृहीतकाच्या पातळीवर राहिला असता तरी काही बिघडत नव्हते. हे ॲन्ड्रयूलाही मान्य आहे. पण गणितातील एक प्रकरण आता पूर्णत्वाकडे गेले आहे. फेरमाचे हे प्रमेय सुटल्याने गणितातील एका नाट्यमय अंकावर कायमचा पडदा पडला आहे.

असे असताना ॲन्ड्र्यूने आपली बुद्धी पणाला लावून काय साधले? निखळ आनंदासाठी कलासाधना व ज्ञानसाधना करणारेच ॲन्ड्र्यूची ही तळमळ व धडपड समजू शकतील. तब्बल सात वर्षे त्याने स्वत:ला घराच्या माळ्यावर कोंडून घेतलं होतं. पत्नी व मुलांना देखील त्याच्या या साधनेत व्यत्यय आणण्याची परवानगी नव्हती. अशा अपार कष्टातून फळाला आली फेरमाच्या प्रमेयाची सिद्धता! हजारांहून अधिक पृष्ठ व्यापणाऱ्या या सिद्धतेत जडबंबाळ संज्ञा, शब्दप्रयोग यांची ठायीठायी मुक्तहस्ताने पखरण केली आहे. या सिद्धतेतील प्रत्येक विधान संपूर्णपणे समजून घेणे, त्याचा समग्र अर्थबोध होणे केवळ जगप्रसिद्ध गणितज्ज्ञांनाच शक्य आहे. फेरमाच्या या प्रमेयाविषयीचे आपले कुतूहल शमविण्यासाठी ॲन्ड्र्यूने गणिताच्या उच्च शाखांतील सर्व पारिभाषिक शब्दांची फौज राबवली आहे.

'फेरमा प्रमेया'ची ही उत्कंठावर्धक कथा चिरशांतीचा अनुभव घेणाऱ्या खुद्द फेरमाच्या कानावर पडली तर त्याला काय वाटेल? तो स्वत: एक हौशी गणितज्ज्ञ होता. टॉऊलोजच्या संसदेत तो अधिकारी म्हणून काम बघत असे. गणिती समस्या सोडवणे हा त्याचा बौद्धिक विरंगुळा होता. राजकारणातली अंदाधुंदी व सततची युद्धे अशा अनिश्चिततेपासून दूर नेण्यासाठी त्याला अशा गणिती समस्या मदत करीत. त्याच्या प्रतिभेविषयी संपूर्ण आदर बाळगूनही असे सांगावेसे वाटते की तो एक आळशी गृहस्थ होता. एखादी समस्या सोडवताना त्यात काही तार्किक त्रुटी राहून गेली तर तो पुन्हा निवांतपणा मिळेपर्यंत त्या त्रुटीविषयी विचार करत नसे. जीवनातील धकाधकीने शिणलेल्या मनाला टवटवी आणण्याचे साधन म्हणून तो गणिताकडे बघत असे.

अशा या ''हौशी'' गणितज्ज्ञाला सुचलेल्या प्रमेयाची सिद्धता व्यवहारदृष्ट्या उपयोगी नाही. पण ती ज्ञानाचा उगम आहे. 'फेरमा समस्या' सोडविण्याच्या प्रयत्नांचे काही अप्रत्यक्ष फायदेही झाले. अनेक नवीन सिद्धांतांचा जन्म झाला. हे सिद्धांत मूळ समस्येपेक्षा अधिक महत्त्वाचे ठरले. काही सिद्धांतांनी तर असा काही दूरगामी परिणाम साधला की मूळ फेरमा समस्या न सुटणे ही इष्टापत्तीच वाटावी. कुमरचा सुप्रसिद्ध आदर्श संख्यासिद्धांत याच काळातला. एकोणिसाव्या शतकातील मौलिक संशोधन म्हणून याची नोंद झाली आहे.

धार्मिक गूढवादातून पूर्णांक संख्या सिद्धांत जन्माला आला. गणिती कूट प्रश्नांचे अनेक टप्पे याने ओलांडले आहेत. आता याला स्वतंत्र विज्ञानाचा दर्जा प्राप्त झाला आहे. गूढवाद म्हटला की त्याचा संबंध आपण निराकार, अमूर्त तत्त्वांशी जोडतो. पण ठोस कल्पना व्यक्त करणाऱ्या संख्या व गूढवाद या परस्परविरोधी तत्त्वांचा मेळ अचंबित करणारा आहे. संख्यांचा हा गूढवाद प्रामुख्याने दोन सूत्रांभोवती फिरत होता. पहिला म्हणजे निश्चित आकृतीबंध असणाऱ्या संख्या. यात पायथागोरसची त्रिकूटे, त्रिकोणी, वर्ग, घन, पिरॅमिड इ. संख्या येतात. या सर्व संख्या साध्या, सुगम भौमित्तिक आकृतींचे प्रतिनिधित्व करतात. दुसरे सूत्र विभाज्यतेचे. विभाज्यतेनुसार संख्यांना भिन्न, परिपूर्ण, अविभाज्य अशी विशेषणे चिकटली. मालमत्तेच्या विभाजनातून संख्यांच्या विभाज्यतेचा प्रारंभ झाला असावा. सुमेरियातील



अनुक्रमणिका

मातीच्या पट्ट्यांवरील मजकूर व इजिप्तच्या पपायरस गवतावरील लेखनातून हेच सूचित होतं. संख्यासिद्धांताची सुरुवात प्रायोगिक विज्ञानाच्या भूमिकेतूनच झाली. गणिताच्या इतर कुठल्याही शाखेला प्राथमिक अवस्थेत विज्ञानाचा दर्जा लाभला नव्हता. या सिद्धांतातील सर्व प्रमेये केवळ तर्काने मांडली गेली. त्यांची सिद्धता होण्यास बहुतेक प्रसंगी शंभराहून अधिक वर्षांचा काळ लागला. असंख्य उदाहरणांच्या मदतीनेच ही प्रमेये सुचत व समजत गेली.

अमूर्त कल्पनांच्या आधी सदैव ठोस कल्पना अवतरल्या. याच नियमानुसार संख्या सिद्धांताचा जन्म अंकगणिताआधी झाला. याच ठोस कल्पनांनी एखादी विज्ञानशाखा विकसित होण्याच्या मार्गात अनेक अडथळे आणले. मानवी मेंदूवर संख्यांची जबरदस्त मोहिनी होती. याच सम्मोहनामुळे संख्या सिद्धांताचा विकास मंद गतीने झाला. परिणामी अंकगणित फार उशिरा विकसित झाले. एखाद्या ग्रह व नक्षत्राच्या मोहात अडकून शास्त्रशुद्ध खगोलशास्त्र धीम्या गतीने विकसित व्हावे तशीच काहीशी ही घटना आहे.

---

व्हेरा माझी पत्नी मला म्हणाली, दर पन्नास मिनिटांना फ्रान्सच्या रस्त्यावर कोणीना कोणी मृत्यू पावतो. पण या आजूबाजूच्या मोटार रहदाऱ्यांकडे पहा. हे सारे वेडे लोक चहूबाजूंनी आपल्याला सोसाट्याने मागे टाकून जात आहेत. परंतु रस्त्यावरती एखाद्या वृद्धेला आपल्या देखत कोणी लुटताना याच लोकांनी पाहिले तर ते त्यावेळी अगदी भयानकपणे सावध असतात. परंतु एकदा मोटारगाडीच्या चाकापाठीमागे ते बसले की मग त्यांची भीती कशी नाहीशी होते?

मी यावर काय बोलणार? फार तर मी असे म्हणालो असतो – मोटार सायकलवर वाकून मोटार सायकल चालविणाऱ्या मनुष्याला आपल्या प्रवासाच्या त्या क्षणावर आपले सारे लक्ष केंद्रित करणे शक्य असते. भूतकाळ आणि भविष्यकाळ या दोन्हींपासून फारकत घेतलेल्या काळाच्या एका तुकड्यात तो सापडलेला असतो. वाहत्या कालप्रवाहातून तो बाहेर फेकला गेलेला आहे, तो कालबाह्य स्थितीत आहे. वेगळ्या शब्दात सांगायचे झाल्यास, तो एका उन्माददायी अवस्थेत आहे. या अवस्थेत आपले वय, आपली पत्नी, आपली मुले, आपल्या चिंता याचे ज्ञानच त्याला नसते. आणि म्हणूनच त्याला भीती वाटत नाही. कारण भविष्यकाळ हाच भीतीचे मूळ आहे, आणि ती व्यक्ती भविष्यकाळापासून मुक्त झाली आहे. तिला भीती वाटावी असे काही शिल्लक राहिलेले नसते.

वेग हा एक प्रकारे उन्मादच आहे. तंत्र – वैज्ञानिक क्रांतीने मानवाला ते वरदान दिले. मोटार सायकलस्वाराच्या अगदी विरुद्ध परिस्थितीत धावणारी व्यक्ती असते. धावणारी व्यक्ती आपल्या शरीरात नेहमी हजर असते. धावल्यामुळे आपल्याला येणारे फोड, आपली होणारी दमछाक याविषयी सातत्याने तिला विचार करणे भागच असते. धावताना आपल्या शारीरिक वजनाची, वयाची जाणीव तिला असते. ती आपल्या स्वत:बद्दल आणि आपल्या आयुष्यात ती ज्या ठिकाणी असते त्याकाळासंबंधी ती कधी नव्हे इतकी जागरूक असते. परंतु ही अशी व्यक्ती जेव्हा वेगासंबंधीची आपली आकलन शक्ती एखाद्या यंत्राकडे सुपूर्द करते, तेव्हा ती अशरीरि, अभौतिक होते, तेव्हा ती व्यक्ती शुद्ध वेग, खुद्द वेगच उन्माद देणारा वेग बनते. **– मिलान कुंडेरा**

## समाजशास्त्र व इतिहास

# भारतीय भोजनातील फळे

सुमती जोशी

## अंजीर

कॅटो हा रोमन मुत्सद्दी इ.स. पूर्व २३४ ते १४९ या काळात होऊन गेला. मार्कस पॉर्शियस हे त्याचे नाव असले तरी त्याला 'कॅटो दि अेल्डर' किंवा 'कॅटो दि सेन्सॉर' या नावाने ओळखत असत. कॅटो हा उत्तम वक्ता आणि लेखक होता. प्राचीन काळात वसलेले कार्थेज शहर म्हणजे सध्याचे ट्युनिस. भूमध्यसामुद्रिक प्रदेशांतील सत्तेचे ते एक मोठे केंद्र होते. इ.स. पूर्वीच्या तिसऱ्या शतकात ग्रीकांनी तेथील वरचढ होऊ पाहाणाऱ्या लोकांशी लढा दिला व कॅटोच्या काळात रोमनांनी कार्थेज निवासीयांना चांगलाच शह दिला. कार्थेजमधील रहिवासी आणि रोमन्स यांच्यामधील युद्ध 'प्युनिक वॉर' म्हणून प्रसिद्ध होते. अखेर इ. स. पूर्व १४६ मध्ये म्हणजे कॅटोच्या कारकीर्दीत कार्थेजचा संपूर्ण पाडाव झाला. कॅटोला दोन गोष्टींचा तिरस्कार होता. स्वदेशबांधवांची ढिसाळ **नैतिकता आणि दुराभिमान** बाळगणारे कार्थेज शहर ! या दोन्ही गोष्टींबद्दलच्या तिरस्काराची धार इतकी होती की त्यात तर-तम भाव करणे कठीण. कॅटो रोमच्या लोकसभेत भाषण करावयास उभा राहिला व कोणत्याही विषयावर भाषण करीत असला तरी आपल्या भाषणाचा शेवट तो "कार्थेजचा पाडाव झालाच पाहिजे !" या वाक्याने करीत असे. परंतु या बाबतीत त्याला त्याच्या सहकाऱ्यांकडून योग्य तो प्रतिसाद मिळत नसे. अखेर कंटाळून एके दिवशी त्याने आपल्या टोग्यामधून (प्राचीन काळातील रोमन लोकांचे पायघोळ वस्त्र) एक ताजा अंजीर काढला आणि तो अंजीर सर्वांना दाखवून कॅटोने विचारले, "तुम्हाला हा अंजीर दिसतो का? तीन दिवसापूर्वी तो कार्थेजमधील अंजिराच्या झाडावर वाढत होता. म्हणजे शत्रू आपल्या किती जवळ आहे हे तुम्ही लक्षात घ्या. त्याचा योग्य वेळी पाडाव केला नाही तर अनर्थ ओढवेल." त्याने केलेल्या या आव्हानामुळे रोमन सैन्याने उठाव करून कार्थेज उद्ध्वस्त केले व शत्रूचा पाडाव केला. रोमन लोकांना आता शत्रू उरला नाही त्याचे श्रेय पराक्रमी योद्ध्यांबरोबर 'अंजिराला' देणे योग्य ठरेल !

जगातील बहुतेक सर्व देशातील अंजिराच्या चढ्या किंमतीमुळे 'श्रीमंती फळात' त्याची गणना होते. फक्त भूमध्यसामुद्रिक प्रदेश याला अपवाद आहे कारण तो प्रदेश म्हणजे अंजिराचे आगरच आहे. तेथे प्रत्येक घराच्या अंगणात एक तरी अंजिराचे झाड असतेच ! अंजिराचे इतके अमाप पीक आल्यामुळे कीटक आणि पक्षी फळे खाण्यासाठी माणसांपेक्षा जास्त वेळा या झाडांना भेटी देतात. कीटकांनी पोखरल्यामुळे आणि पक्षांनी चोची मारल्यामुळे पक्व फळांचा

झाडाखाली सडा पडतो, जणू काही ती जमीन अंजिराच्या जॅमने लडबडली आहे असा भास होतो !

अश्मयुगाचा अस्त झाल्यावर ताम्रयुग सुरू झाले. ताम्रयुगात अंजिराची झाडे होती असा पुरातत्त्वशास्त्रीय पुरावा आढळतो. इ. स. पूर्व चार वर्षांपासून पूर्वेकडील प्रदेशात अंजीर हे फळ अस्तित्वात होते. त्यानंतर सुमारे पाचशे वर्षांनंतर ऑलिव्ह आणि द्राक्षे या फळांबरोबर अंजिरांचा समावेश होऊ लागला. अंजिरातील बिया आणि सुकलेल्या अंजिरांचे अवशेष सापडल्यामुळे ब्राँझयुगातील मानव अंजिराचा खाण्यासाठी उपयोग करीत होता असे खात्रीलायक विधान करता येते. इ. स. पूर्व अडीच हजार ते दोन हजारच्या दरम्यान प्रगत संस्कृती (उदा. सुमेरियन) असलेल्या लोकांनी लेखनाची कला शोधली होती. मऊ मातीवर हाडाच्या अथवा लाकडाच्या टोकदार वस्तूने अक्षरे कोरीत असत. अशा क्युनिएफॉर्म लिखाणाचे त्या काळातील नमुने मेसापोटेमियात मिळाले होते. त्या लिखाणात अंजिराचा उल्लेख आढळतो. इजिप्शियन ममींच्या भिंतींवर अंजिराने लगडलेल्या झाडाची चित्रे रंगवलेली आढळतात.

हजारो वर्षांपूर्वीपासून भूमध्यसामुद्रिक प्रदेशांतील लोकांच्या आहारांत अंजिराला महत्त्वाचे स्थान असे. प्राचीन काळापासून आजतागायत भूमध्यसामुद्रिक प्रदेशातील लोकांच्या आहाराबरोबर तेथील अर्थकारणातही अंजिराने महत्त्वाची कामगिरी बजावली. ज्यावेळी उसापासून साखर बनवण्याची कला माणसाला अवगत नव्हती तेव्हा इतर शिजवलेली फळे टिकवण्यासाठी अंजिरांचा उपयोग करीत असत. अंजिरातील साखरेचे प्रमाण इतके आहे की प्रॉव्हान्स या फ्रान्समधील परगण्यातील फळे टिकवण्यासाठी अजूनसुद्धा अंजिरांचा उपयोग करतात. मूठभर ताजे किंवा सुके अंजीर व अंजिराच्या झाडाचा चीक मिसळलेले दूध किंवा ब्रेडचे दोन स्लाइस यापासून मिळणारी पोषणमूल्ये जेवणाइतकी म्हणजे सुमारे ३००० कॅलरी असतात. Attica ॲटिका हे सॅरॉनिक सामुद्रधुनीतील ग्रीकांच्या मालकीचे बेट होते आणि अथेन्स ही ॲटिकाची राजधानी होती. अंजीर हे ॲटिकाचे प्रमुख उत्पादन होते. अंजीर हे मौल्यवान फळ आहे याची ग्रीकांना जाणीव होती कारण अंजीर हे त्यांच्या उपजीविकेचे साधन होते. सोन्याहूनही मौल्यवान समजल्या जाणाऱ्या अंजिराच्या निर्यातीवर ग्रीकांनी निर्बंध घातले होते. ग्रीक धर्मगुरूंचे जनमानसावर प्रभुत्व होते. "आता अंजीर पिकले आहेत आणि ते झाडावरून गोळा करण्यास हरकत नाही" असे ग्रीक धर्मगुरूंनी सांगितल्यावरच बागाईतदार झाडावरून अंजीर उतरत असत. या धर्मगुरूंना Sycophants" सिकोफॅन्टस् म्हणत असत. 'अंजिरांचा चोरटा व्यापार करू नये' अशी उघड उघड मागणी करणाऱ्यांनाच पुढे सिकोफॅन्ट्स असे म्हणू लागले. इतके निर्बंध ग्रीक सरकारने घातले तरी अंजिरांचा चोरटा व्यापार काही ठिकाणी होतच असे ! ग्रीक भाषेमध्ये sukon सुकॉन म्हणजे अंजीर आणि phaino फेनो म्हणजे दाखवणे. यावरून अंजिराचा चोरटा व्यापार कोठे होत आहे याची माहिती देणाऱ्या व्यक्तीला 'सिकोफॅन्टस्' हे नाव पडले. इंग्रजीमध्ये हा शब्द 'खुषमस्कऱ्या' या अर्थाने वापरतात. तालीम करणाऱ्या पहिलवानांचे अंजीर हे अन्न

आहे असे प्लेटो हा ग्रीक तत्त्वज्ञ (इ.स.पूर्व ४२९ ते ३४७) म्हणत असे. प्राचीन काळापासून ग्रीकांना अंजिराच्या भरपूर पोषणमूल्यांची जाणीव होती याचा प्लेटोचे वरील विधान हा आणखी एक पुरावा !

बायबलमध्ये उल्लेख असलेले 'अंजीर' हे पहिले झाड. पुन्हा एकदा आपल्याला ॲडॅम आणि इव्हच्या कथेकडे वळावे लागते. ॲडॅम आणि इव्ह या दोघांनी परमेश्वरी आज्ञेचे उल्लंघन करून फळ खाल्ले आणि आपण विवस्त्रावस्थेत आहोत याची त्यांना जाणीव झाली. लज्जारक्षणाकरता त्यांनी अंजिराच्या पानांचा उपयोग केला. ॲडॅम आणि इव्हच्या कथेतील अंजिराच्या पानांच्या या उल्लेखावरून ईडनच्या त्या बगिच्यात भरपूर अंजिराची झाडे असावीत असा अंदाज वर्तवता येतो. त्या उभयतांनी खाल्लेले फळ सफरचंद होते की संत्रे हा वाद विद्वान मंडळी घालतात. तरी सामान्य माणसाला 'ज्या झाडाची पाने लज्जारक्षणाकरता वापरली त्याच झाडाची फळे (अंजीर) त्या उभयतांनी खाल्ली असावीत' असे साधे, सोपे व तर्कशुद्ध अनुमान काढून या वादावर कायमचा पडदा पाडता येईल. अनेक पाश्चिमात्य धर्मांमध्ये अंजीर व अंजिराचे झाड पवित्र मानतात. अंजीर ह्या फळाला 'ज्ञानाचे प्रतीक' ठरवतात.

वास्तविक पाहता अंजीर हे फळ ज्ञानाचे प्रतीक होत नाही कारण मुळात वनस्पतीशास्त्रीय दृष्ट्या अंजिराचा नेहमीच्या फळांत समावेश करता येत नाही. कोणत्याही फुलाच्या देठाजवळच्या भागाला 'पुष्पासन' 'Receptale' म्हणतात. अंजिराच्या बाबतीत हे पुष्पासन खोलगट वाडग्यासारखा आकार धारण करते. या वाडग्याच्या देठाच्या विरुद्ध बाजूस एक छोटेसे भोक असते. या पुष्पासनाच्या आतील अस्तरावर अनेक पुंपुष्पे व स्त्रीपुष्पे दाटीवाटीने बसवलेली असतात. पुष्पासनाच्या तळाशी स्त्रीपुष्पे तर कडेला पुंपुष्पे असतात. स्त्रीपुष्पे व पुंपुष्पे एकाच वेळी फुलत नाहीत. त्यामुळे प्रत्येक पुष्पगुच्छांत कीटकांच्या मदतीने परपरागीभवन होते. कित्येक जातीच्या अंजिरात 'ब्लॉस्टोफॅगा' नावाच्या विशिष्ट जातीच्या गांधीलमाशीशिवाय परपरागीभवन घडत नाही. ब्लॉस्टोफॅगा किंवा अन्य कीटक पुष्पासनावरील रंध्रातून फुलांत प्रवेश करतात. यावेळी अन्य फुलांतील त्यांच्या अंगाला चिकटलेले परागकण स्त्रीपुष्पांवर पडतात व त्यांत फलन घडून येते. प्रत्येक स्त्रीपुष्पांत एक याप्रमाणे असंख्य स्त्रीपुष्पांच्या फलनानंतर असंख्य बिया तयार होतात. पुष्पासन मांसल बनते. अशा पुष्पासनाला 'हायपॅंथोडियम' असे म्हणतात. मांसल पुष्पासन स्त्रीपुष्पापासून बनलेल्या अनेक फळांना आपल्यात सामावून घेते. अशा फळाला syconus सिकॉनस असे म्हणतात.

अंजिराचे शास्त्रीय नाव 'फायकस कॅरिका'. ग्रीकांना हे झाड कॅरिका या बेटावर मिळाले म्हणून त्याचे शास्त्रीय नाव 'फायकस कॅरिका' पडले असावे. फायकस हा जीनस 'सर्वसमावेशक'! शेकडो वर्षे जगणारे आणि पारंब्यांच्या 'हातापायांनी' आपला विस्तार पेलून धरणारे वडाचे झाड 'फायकस बेंगॅलेन्सिस' याच जीनसमध्ये येते. मोठ्या वृक्षांच्या आधाराने चढणारा रानटी अंजिरांचा वेल तसेच चिवट पानांचे रबराचे झाड ह्यांचासुद्धा समावेश 'फायकस' या जीनसमध्ये

होतो. अश्वत्थ पिंपळाचे झाड (फायकस रिलिजिओसा), औदुंबर (फायकस ग्लॉमेराटा) यासारखी सुमारे सहाशे वेगवेगळ्या प्रकारची झाडे 'फायकस' जीनसमध्ये येतात. काही अंजिराच्या जातीची एक मीटर उंचीची झुडपे असतात तर काही जातीची अंजिराची झाडे दहा मीटर इतकी उंच वाढतात. रुंद, अनेक मोठे भाग एकत्रित येऊन बनलेली मोठी पाने हे अंजिराच्या झाडाचे वैशिष्ट्यच म्हणावे लागेल. या झाडाच्या फांद्या लावून नवीन झाडे तयार करतात. काही जातीची अंजिराची झाडे एकदा पीक देतात तर काही झाडे दुबारा पीक देतात. तुर्कस्तान, इराण, इराक, अफगाणिस्तान, पाकिस्तान, भारत या सर्व देशात अंजिराचे भरपूर पीक येत असले तरी मुळात अंजिराचे जन्मस्थान भूमध्यसामुद्रिक प्रदेशच आहे याबद्दल शास्त्रज्ञांत दुमत नाही.

भारतीयांच्या आहारात पोळीभाजीला जे स्थान तेच स्थान भूमध्यसामुद्रिक प्रदेशातील लोकांच्या आहारात अंजिराला असे ! हे अंजीर ताजे, वाळवलेले किंवा भाजलेले असत. ग्रीक लोक तर उंदरांसारखे काही प्राणी आणि बदके यांना अंजिरांचा आहार देऊन गुबगुबीत करीत. अशा तऱ्हेने पोसलेल्या प्राण्यांचे यकृत मोठे व मांसल होत असे. त्या यकृताला 'फिकॅटस' म्हणत. ग्रीकांना या चविष्ट फिकॅटसची विशेष आवड होती. ग्रीक लोक अंजिरापासून एक प्रकारचे मद्य बनवीत व आवडीने प्राशन करीत. रोमन व दक्षिण गॉलमधील लोक (गॉल = फ्रान्स, बेल्जियम, दक्षिण नेदरलँडस्, जर्मनी, उत्तर इटली) ग्रीकांचे अनुकरण करीत असत.

प्लीनीने (इ.स. २३ ते ७९) ज्ञानकोश लिहिण्याचा उल्लेख पूर्वी आला आहे. या ज्ञानकोशाचे ३७ भाग असून त्यातील सहाव्या भागात भारतातील फळांची माहिती होती. त्यात अंजिराचा आवर्जून उल्लेख केलेला होता.

गॉल या प्रदेशात नेमणूक झालेल्या रोमन अधिकाऱ्यांच्या आहारात अंजिराला विशेष स्थान असे. तसेच गॉल या प्रदेशातील मूळ रानटी लोकांनाही 'आपल्या राज्यकर्त्यांचे अनुकरण करावे, आपल्यालासुद्धा अंजीर ही मौल्यवान फळे खायला मिळावीत' असे वाटत असे. म्हणून फ्रेंच लोकांनी पॅरिस व त्याच्या आजूबाजूच्या प्रदेशात अंजिराची झाडे लावली होती. परंतु अंजिराच्या झाडांना स्वच्छ सूर्यप्रकाशाची नितांत आवश्यकता असते. पॅरिसमधील हवामान अंजिराच्या झाडाला प्रतिकूल ठरले. यावेळी रोमन साम्राज्याचा अस्त होत होता. त्यांनी या अंजिराच्या झाडाचा नाद सोडून दिला आणि तेथील हवामानात होणाऱ्या इतर फळझाडांवर आपले लक्ष केंद्रित केले. तरीसुद्धा फ्रान्समधील 'प्रॉव्हान्स' या प्रदेशात अंजिराचे चांगले पीक येते व तेथून संपूर्ण फ्रान्सला अंजिराचा पुरवठा होतो. मध्ययुगात व प्रबोधनकाळात फ्रेंच लोक अंजीर खात असत. इ. स. १३७९ साली फ्रान्समध्ये पार्लमेंटची सभा चालू असताना सोळा पाहुणे आले होते. दोघात मिळून एक प्लेट याप्रमाणे निवडक खाद्यपदार्थांच्या आठ प्लेटस् पाहुण्यांना दिल्या होत्या. त्या पदार्थात तमालपत्राचे आच्छादन घालून भाजलेले अंजीर होते असे मॅनेजिअर-दि-पॅरिस या लेखकाने नमूद करून ठेवले आहे.

Taillevent तेल्लव्हाँ viandier व्हिॲंदिॲर या ग्रंथात सुक्या मेव्यापासून तयार केलेल्या

पुडिंगचा उल्लेख केला आहे. वाळलेले अंजीर, खजूर, बेदाणे अगदी बारीक चिरून त्यांत थोड्या प्रमाणात साखर मिसळून हे पुडिंग केले होते. या पुडिंगची घटकद्रव्ये (इनग्रेडिअंट) इतकी गोड आहेत की चालू युगातील कॅलरीची जाण ठेवणाऱ्या कोणत्याही व्यक्तीला त्यात साखर घालण्याची जरूरच भासली नसती.

चौदावा लुई-सन किंग याला अंजिरासारखे मौल्यवान फळ न आवडले तरच नवल ! त्याच्याकरता ला क्विंटिनीने राजाच्या बागेत आणि परसदारीसुद्धा अंजिराची रोपे लावली आणि पीच या फळझाडाप्रमाणे ॲस्पॅलिअर पद्धतीने ती झाडे वाढवली होती. ला क्विंटिनीने काही झाडे संत्र्याच्या झाडाप्रमाणे कुंडीत लावली. प्रतिकूल पर्यावरणात या कुंडीतील झाडांची वेगळ्या पद्धतीने काळजी घेता यावी व ती जगवता यावीत म्हणून ला क्विंटिनीने हा प्रयोग केला होता. व्हर्सायचे पांढरे अंजीर आणि अर्जेंट्युलचे लांबट अंजीर या दोन जातींची रोपे काळजीपूर्वक वाढवली तर उत्तम फळे देतात असे ला क्विंटिनीने नमूद केले आहे.

आपल्या भारतात वैदिक काळाच्या उत्तरार्धात अंजिराचा उल्लेख आढळतो. इ. सनाच्या तिसऱ्या शतकात दक्षिण भारतात अंजीर असल्याचा पुरावा आढळतो. प्राचीन भारतात जैन धर्माचा उदय झाला. जैन लोक चुस्त शाकाहारी होते. धार्मिक दृष्ट्या अनेक खाद्यपदार्थ खाण्यास जैनांना बंदी होती. जमिनीखाली उगवणाऱ्या सर्व कंदांप्रमाणेच अंजीर हे फळसुद्धा निषिद्ध होते.

मुसलमान धर्मात जैन धर्माच्या विरुद्ध मत प्रतिपादले होते. उत्तर भारतावर अरब लढवय्या गझनीचा मुहम्मद याने इ. स. ९९८ ते १०३० या काळात स्वाऱ्या केल्या. इ. स. ११८२ मध्ये मोहम्मद घोरीने सिंध आणि पंजाबवर कब्जा मिळवला. इ. स. १२०६ पासून कुतुबद्दीन ऐबक याने दिल्लीचे तख्त बळकावले. इ. स. १५२६ मध्ये अफगाणिस्तानच्या बाबराने दिल्लीत मोगल साम्राज्याची स्थापना केली. मोंगलांचा अम्मल तीन शतके उत्तर भारतावर राहिला. उत्तर भारतातील चालीरिती, खाण्यापिण्याच्या पद्धतींवर मोंगलांची छाप पडली. मोगलांच्या चांद्रवर्षातील ९ व्या महिन्यात रमझानचा उपवास करतात. सूर्योदयापूर्वी आणि सूर्यास्तानंतर जेवणाखाण्यास परवानगी असते. परंतु दिवसभरात पाणीसुद्धा पिता येत नाही. हा उपवास सोडताना प्रथम 'खजूर' खाण्याची पद्धत आहे. तसेच कुराणाच्या आज्ञेप्रमाणे या उपवासात मध, अंजीर, ऑलिव्ह, दूध ह्या पदार्थांचे जाणीवपूर्वक सेवन करतात. इ. स. १३०० च्या सुमारास अमीर खुश्रूने द्राक्षे, फणस याबरोबर अंजिरांचा उल्लेख केला होता. शहाजहानने वनस्पतींवर कलम करण्याचे निर्बंध काढून टाकले हा उल्लेख पूर्वी आलाच आहे. तदनंतर बागाईतदारांनी तुतीच्या झाडावर अंजिराचे कलम केल्याचा उल्लेख इतिहासात आढळतो. इ. स. १८२५ साली माउंटस्टुअर्ट एलफिन्स्टन हे भारताचे गव्हर्नर जनरल होते. दुपारी भोजनाच्या वेळी ते ब्रेडची सँडविचेस व सुके अंजीर एवढाच आहार घेत असत. सुक्या अंजिरातील भरपूर पोषणमूल्ये त्यांना पुरेशा कॅलरीज देत असावीत !

अंजिराच्या बहुतेक फळांचा आकार घंटेसारखा असून रंग फिकट जांभळा व आतील गर

गुलाबी असतो. देठ लांब असून झाडाला खूप फळे येतात. या अंजिरांपेक्षा पांढऱ्या गराचे अंजीर अधिक रसदार असतात. पण दोन्ही प्रकारचे अंजीर समोर दिसले तर 'काय भुललासि वरलिया रंगा' अशी माणसाची अवस्था होते. बहुतेक व्यक्तींना पांढऱ्या रंगापेक्षा फिकट जांभळ्या रंगाचाच अधिक मोह पडतो.

दक्षिण फ्रान्समधील अंजिरांना इटालियन अंजिरांपेक्षा उत्तम स्वाद असतो. पुणे जिल्ह्यांतील पुरंदर, सासवड, तालुक्यात अंजिराचे अमाप पीक येते. तेथील जात पुणे अंजीर या नावाने ओळखली जाते. तसेच औरंगाबाद जिल्ह्यात दौलताबादच्या परिसरात 'दौलताबाद' जातीचे अंजीर भरपूर प्रमाणात होतात. कर्नाटकात वेल्लारी आणि गंजय या जातीच्या अंजिराची लागवड करतात. भारतात म्हैसूर, बंगलोर, श्रीरंगपट्टम, अनंतपूर, वेल्लारी येथे अंजिराची लागवड करतात. दक्षिण भारतात होणाऱ्या मार्सेलिस या जातीचे अंजीर पांढऱ्या गराचे व मधुर असतात. बहुतेक वेळा अंजीर झाडावरच अर्धवट सुकतात व खाली पडतात. असे अंजीर वेचतात व ट्रेमध्ये घालून उन्हात वाळवतात. वाळवताना ते अंजीर सर्व बाजूंनी सुकावेत म्हणून उलटे पालटे करतात. असे वाळलेले अंजीर खोक्यात भरतात किंवा केळीच्या सोपटात ओवतात. हा व्यवसाय अनेक पुरुष, स्त्रिया व मुले यांच्या उपजीविकेचे साधन झाले आहे.

तॅलिव्हॉंच्या सुक्या मेव्यापासून तयार केलेल्या खुमासदार पुडिंगमुळे पॅरिसमधील अमीर उमरावांच्या जिभा चाळवल्या गेल्या होत्या. पंधराव्या शतकांतील फ्रान्समधील शेतकऱ्यांनासुद्धा प्रॉव्हान्समधील अंजीर आवडत असत. वास्तविक प्रॉव्हान्स हा फ्रान्समधील प्रदेश आर्थिक दृष्ट्या मागास होता. प्रॉव्हान्समधील बागाईतदार येथे तयार होणारे अंजीर उन्हात वाळवत किंवा बरेचदा उत्तरेकडून दक्षिण फ्रान्समध्ये येणारे व तेथून भूमध्यसामुद्रिक प्रदेशाकडे वळणारे 'मिस्ट्रॉल' वारे अंजीर सुकवण्याचे काम करीत. या वाऱ्यांमुळे अंजिरातील पाण्याच्या अंशाचे बाष्पीभवन होत असे. अशा अंजिरांची निर्यात करून प्रॉव्हान्समधील बागाईतदार पैसे मिळवीत. नाताळच्या दिवशी पारंपारिक पद्धतीप्रमाणे जे तेरा गोड पदार्थ भोजनोत्तर खाण्यासाठी देतात. त्यात अक्रोड, बेदाणे, बदाम या सुक्या मेव्याबरोबर अंजिराचा समावेश करतात. सुक्या अंजिराला छेद देऊन त्यात हिरवे अक्रोड भरले की फ्रान्समध्ये त्याला कॅप्युचिन नुगात 'Capuchin nougat' म्हणतात. लहानथोर साऱ्यांच्याच पसंतीचा हा पदार्थ भरपूर पोषणमूल्ये देणारा आहे.

सद्यस्थितीत फ्रान्समध्ये प्रॉव्हान्समधील अंजीर फक्त खाण्यासाठी वापरतात. जरदाळूप्रमाणेच सुके अंजीरसुद्धा तुर्कस्तानमधून आयात करतात. तुर्कस्तानमध्ये पांढरे अंजीर उन्हात वाळवतात मग समुद्राच्या पाण्याने धुतात. त्यावर जंतुनाशकांची प्रक्रिया करतात आणि पुन्हा गरम हवेच्या झोताने ते अंजीर कोरडे करतात. असे सुके अंजीर मार्सेलिस या बंदरातून फ्रान्समध्ये प्रवेश करतात. तसेच अन्य युरोपीय देशातही तुर्कस्तानमधून सुक्या अंजिरांची निर्यात होते.

युरोपमध्ये नाताळनंतर कडक हिवाळ्यात अंजिरातील साखरेचे स्फटिकीकरण होते. असे अंजीर बाह्यत: वेड्यावाकड्या रेषांची नक्षी असलेल्या संगमरवराप्रमाणे दिसतात. असे सुके

अंजीर बाजारात विकता येत नाहीत. म्हणून सुक्या अंजिरांचा व्यापार करणारे धूर्त व्यापारी हे अंजीर वाफवतात व पिठात घोळवतात. वाफवल्यामुळे स्फटिकरूपातील साखर विरघळते व पिठात घोळवल्यामुळे त्या अंजिराला आलेला चिकट दमटपणा कमी होतो. हे व्यापारी अशा अंजिराच्या पॅकेटवर त्या अंजिरात पिठाचा अंश असल्याची नोंद करतात. पण ही बनवाबनवी सामान्य ग्राहकाच्या लक्षात येत नाही. हे अंजीर निकृष्ट दर्जाचे असल्यामुळे घेण्याचे टाळावे असा सल्ला अंजीर तज्ज्ञांनी दिला आहे.

तुर्कस्तानामधील सुके अंजीर 'रफिया' नावाच्या मादागास्कर येथील पाम वृक्षाच्या तांबट पानापासून काढलेल्या दोरात ओवतात. कधी कधी ते पॅकेटस्‌मध्ये बांधतात तर कधी 'पनिट' नावाच्या होडीच्या आकाराच्या टोपलीत भरून सुके अंजीर विक्रीस पाठवतात. तुर्कस्तानामधून आयात केलेल्या अंजिरांवर तसे लेबल लावलेले असते. तसे लेबल नसलेले सुके अंजीर ग्रीक किंवा इटलीतील असून ते जाड सालीचे व कडक असतात. या अंजिरांची प्रत 'क्राऊन' मध्ये ठरवतात. मात्र ही पद्धत ग्राहकाच्या दृष्टीने काहीशी घोटाळ्यात टाकणारी आहे. ९ किंवा ७ क्राऊन असलेले अंजीर सर्वात ताजे तर ५ किंवा ७ क्राऊन असलेले अंजीर उत्तम स्वादाचे असतात. यापेक्षा कमी क्राऊन असलेले अंजीर कमी प्रतीचे असतात. अंजिराचे जाणकार तुर्कस्तानचे लेबल असलेले सुके अंजीर विकत घेतात. आंतरराष्ट्रीय व्यापारातील हे बारकावे वाचकांना सादर करण्याचे प्रमुख कारण म्हणजे योगायोगाने परदेशगमन केले व या देशात जाण्याची वेळ आली तर अनोळखी देश आणि भाषा यामुळे ग्राहक म्हणून फसगत होऊ नये!

**प्रतिकात्मक अंजीर व अंजीर वृक्ष**

अंजिराच्या झाडाच्या आधी अंजिराच्या प्रतिकाचा अर्थ पाहावा लागेल. अंजीर हे फळ 'आदिम आणि समृद्धि' यांचे प्रतीक मानले जात असे. प्राचीन इजिप्शियन धर्मगुरू त्यांच्या पवित्र कार्याच्या वेळी शुभ म्हणून अंजीर खात असत. अंजिरात खूप पोषणमूल्ये आहेत. त्यामुळे प्राचीन काळी वाळवंटातील तपस्वी अंजिरावरच आपला उदरनिर्वाह करीत. अंजिरातील अनंत बिया एकता, उत्तम समजुतीची वैश्विकता, ज्ञान आणि श्रद्धा या गोष्टी सुचवतात. हीच संकल्पना शेकडो बिया असलेल्या डाळिंबाच्या बाबतीतही वापरलेली आपल्याला आढळते.

अंजीर झाडावरून तोडला की खोडातून पांढरा रस बाहेर पडतो. इजिप्शियन लोक त्या रसाला दूध आणि वीर्य यांचे प्रतीक मानतात. अंजीर या फळात पंपुष्पे व स्त्रीपुष्पे सामावलेली असतात हे आपण पाहिले. त्यामुळे नर व नारी यांच्या समागमातून निर्माण होणाऱ्या वैश्विक शक्तीची संकल्पना अंजिरातून ध्वनित होते. आफ्रिकन स्त्रिया वंध्यत्वावर उपाय म्हणून लावण्याच्या मलमामध्ये या चिकाचा उपयोग करीत. तसेच अर्भकाला जन्म दिल्यावर अधिक दूध निर्माण होण्यासाठी अंजिराचा चीक वापरीत. हिंदु लोक ब्रह्मा, विष्णु, महेश या त्रैमूर्तीपैकी विष्णूच्या चरणी अंजिराचे झाड अर्पण करीत असत. तर प्राचीन काळात ग्रीक लोक 'डायोजिनस' या पुर्ननिर्मितीच्या देवतेला अंजिराचे झाड अर्पण करीत. रोम्युलस Romulus आणि Romus

रोमस या उभयतांच्या जन्माच्या वेळी त्यांना अंजिराच्या झाडाने आश्रय दिला होता.

आपण 'सिकोफॅन्टस्' या शब्दाचा अर्थ पाहिला आहे. 'आता अंजीर पिकले आहेत' असे ग्रीक धर्मगुरूनी सांगितल्यावरच बागाईतदार व जनता अंजिराची तोडणी करीत असत. ही आनंददायी बातमी संयोगाचा धार्मिक उत्सव म्हणून पाळली जात असे. निसर्गात पुनरुत्पादन घडत असते याचा प्रत्यक्ष पुरावा म्हणजे झाडावरचे पिकलेले अंजीर ! पूर्व आशिया खंडातील परंपरेप्रमाणे अंजिराचे झाड पवित्र मानतात. बोधीवृक्षाखाली गौतम बुद्धाला दिव्य ज्ञान प्राप्त झाले. त्या बोधीवृक्षाचा समावेश सुद्धा 'फायकस' या अंजिराच्या जीनसमध्येच होतो.

असा हा अंजिराच्या विविध सांस्कृतिक संकेतांचा इतिहास !

## खजूर

पामे (Palmae) किंवा ॲरिकॅशिअे (Arecaceae) या कुटुंबातील नारळ, सुपारी, ताड खजुरी इत्यादी वृक्ष आपल्या परिचयाचे आहेत. त्याच वनस्पतीशास्त्रीय कुटुंबात खजुराच्या झाडांची गणना होते. खजुराचे शास्त्रीय नाव 'फोनिकस डॅक्टिलिफेरा.' चिकरी आणि एंडिव्ह या भाज्यांची माहिती मिळवताना द्विपद नामकरण पद्धतीचा जनक 'कार्ल लिनिअस' (इ.स. १७३५) याची आपली ओळख झाली आहे. त्याने खजुराच्या झाडाचा गौरव 'सर्व वृक्षांचा राजपुत्र' असा केला होता. युरोपमधील लोकांनी युरोपबाहेरून आलेल्या अनेक फळांची ओळख करून घेतली, त्या फळांत 'खजुराची' ओळख युरोपियनांना सर्वप्रथम झाली. इजिप्त आणि भमूध्यसामुद्रिक प्रदेश ही जन्मभूमी असलेले खजुराचे झाड त्या प्रदेशातील लोकांना सात हजार वर्षांपूर्वीपासून माहीत होते. उत्तर आफ्रिकेतील पदार्थ थोडे अंतर पार केल्यावर अगदी चटकन इटली, ग्रीस या युरोपीय देशात पोचत असत. त्याची कॅटोने, अंजिराच्या संदर्भात सभागृहात केलेल्या भाषणावरून आपल्याला कल्पना येते. बहुतेक वेळा परदेशी माल बंदरात आल्यावर त्या देशाच्या राजधानीतील ग्राहकांना तो माल प्रथम उपलब्ध होतो. तसेच खजुराच्या बाबतीत झाले. इजिप्तमधून आलेल्या या पाहुण्याची अथेन्स आणि रोम या राजधान्यांतील लोकांना सर्वप्रथम ओळख झाली. 'पोषणमूल्यांचा खजिना' असलेल्या या फळाचे युरोपियनांनी स्वागत केले.

या झाडाची उंची ३० ते ४० मीटर असते. खोड जाड, शाखाहीन, टणक व खडबडीत असते. खोडावर जुन्या गळून गेलेल्या पानांचे ठसे असतात. पाने सुंदर, तुकतुकीत, दोन्ही बाजूला टोकदार पर्णिका असलेली व सुमारे ५ मीटर लांब असतात. नर व मादी झाडे भिन्न असतात. अतिउष्ण, कोरडी हवा या झाडांना मानवते. या झाडाला पाऊस अगदी कमी लागतो. रेताड वाळवंटी जमिनीत ही झाडे चांगली फोफावतात. मादी झाडाला येणाऱ्या फुटव्यापासून नवीन झाडांची लागवड करतात. परागण (पॉलिनेशन) व फलन (फर्टिलायझेशन) यासाठी नर झाडांची आवश्यकता असली तरी मादी झाडांच्या तुलनेत त्यांची संख्या कमी असली तरी चालते. चौथ्या किंवा पाचव्या वर्षी खजुराचे झाड वयात येते. १० ते १५ वर्षे वयात झाडापासून

जास्तीत जास्त फळे मिळतात. ही फळे 'बेरी' या फळांच्या प्रकारात येतात पण यात फक्त एकच बी असते. टॉमेटोसारख्या इतर बेरी वर्गातील फळांत अनेक बिया असतात. म्हणून खजुराला 'अपवादात्मक बेरी' म्हणतात. एका घडाला १ हजारापेक्षा जास्त फळे लागतात व एका घडाचे वजन सुमारे ८ किलो भरते. वाळलेल्या फळांचे अर्धेअधिक वजन साखरेचे असते. यांत २% नत्रयुक्त, २% स्निग्ध व २% खनिज पदार्थ असतात. एका झाडापासून ४० ते ८० किलो खजूर मिळतो. झाडाची आयुर्मर्यादा दीडशे वर्षे असली तरी सुमारे शंभर वर्षांपर्यंत हे झाड फळे देते.

"खजुराच्या झाडाचे पाय वाहत्या पाण्यात असावे लागतात तर शेंडा तप्त आकाशात भाजून निघावा लागतो" असे खजुराच्या झाडाच्या बाबतीत अरब गमतीने म्हणतात. प्राचीन काळी मेसापोटेमियाच्या दक्षिण भागात कालव्यांचे जाळे तयार केले होते. या पाण्याच्या काठावर खजुराच्या झाडांची लागवड करीत असत. परागणापासून (पॉलिनेशन) खजुराचे पीक येईपर्यंत या झाडाला ३५० ते ४०० अंश सें. तापमानाची आवश्यकता असते. ५०० अंश से. पर्यंतचे तापमान खजुराच्या झाडाला धोका पोहोचवत नाही. खजूर हे एकदलीय झाड असल्यामुळे त्याला जमिनीजवळ समांतर वाढणारी व दूरवर पसरणारी तंतूमुळे असतात. ही मुळे दोन मीटरहून अधिक खोलवर असलेले पाणी मिळवण्यास असमर्थ असतात. अशी मुळे हे उत्क्रांतीमुळे प्राप्त झालेले खजुराचे गुणवैशिष्ट्य आहे ! वालुकामय प्रदेशात वाढत असले तरी वाळवंटी नव्हे. पाण्याजवळ असले तरी पाणवनस्पती नव्हे, खारटण जमिनीत वाढण्याची क्षमता असली तरी लवणवनस्पती (हॅलोफाइट) नव्हे, याची पाने उष्ण व कोरड्या हवामानाची मिळती जुळती असली तरी मरुवनस्पती (झेरोफाइट) नव्हे. असे वर्गीकरण करताना शास्त्रज्ञांना पेचात टाकणारे खजुराचे झाड !

इ. स. पूर्व सहा हजार या काळात खजूर आणि बोरे ही दोन फळे भारतात होती. सिंधू नदीकाठच्या प्रगत संस्कृतीतील (इ. स. पूर्व २६०० ते १७६०) हडाप्पा हे प्रमुख शहर. तेथील उत्खन्नात दोन सुंदर नक्षीकाम केलेली शोभेची मातीची भांडी सापडली. त्या भांड्याची झाकणे खजुराच्या बीच्या आकाराची होती. खजूर हे फळ त्या काळातील लोकांना माहीत असावे असे वाटते. चार वेदांपैकी यजुर्वेदात खजूर, तीन प्रकारची बोरे आणि बिल्वफळे यांचा उल्लेख होता. जैन आणि बौद्ध भिक्षू रात्रीच्या जेवणाऐवजी खजूर, डाळिंब यासारखी फळे खात असत किंवा काही फळांचा रस घेत असत अशा नोंदी आढळतात. इ. स. १८५० नंतर अरब प्रवासी भारतात वरचेवर येत असत. उदा. खर्दादबा हा व्यापारी इ. स. ८५० ते ८८० या काळात अनेकदा भारतात येऊन गेला. हे व्यापारी येताना भारतीयांसाठी 'खजूर' आणत असत. तर येथून कापूस, जायफळे, नारळ या गोष्टी मायदेशी घेऊन जात. इ. स. ९१५–१६ मध्ये बगदादमधून आलेल्या अल मासुदी या व्यापाऱ्याने प्रामुख्याने खजूर सिंधमध्ये आणला. खजुरापासून खजुरासव नावाचे मद्य भारतात तयार करीत असत, असा उल्लेख संस्कृत वाङ्मयात आढळतो. अरक म्हणजे

भातापासून तयार केलेले मद्य. यात बेदाणे घालून ते मिश्रण ३ ते ४ दिवस ठेवत असत. त्यानंतर ते मद्य गाळून रिकाम्या पिंपात ६ ते ८ महिने ठेवीत. या मद्याला गोडी आणण्याकरता व त्याला विशिष्ट स्वाद यावा म्हणून त्यात खजुराचा दाट रस मिसळीत असत. मोगल बादशहा अशा मद्याचे चाहते होते.

ॲरिस्टॉटल हा ग्रीक तत्त्ववेत्ता व शास्त्रज्ञ प्लेटोचा शिष्य होता. (इ. स. ३८४ ते ३२२) सर्व ज्ञानशाखांत त्याने उल्लेखनीय कामगिरी केलेली आहे. खजुराचा घड माणसाच्या मिटलेल्या मुठीसारखा दिसत असला तरी प्रत्येक खजुराच्या फळाला लांब देठ असतो. यामुळे ती फळे ॲरिस्टॉटलला लांबसडक बोटासारखी भासली. ग्रीक भाषेमध्ये डॅक्टिलॉस म्हणजे 'बोटे'. म्हणून खजुराचे नाव 'डॅक्टिलिफेरा' असे झाले असावे. ग्रीक आणि रोमनांना खजुराच्या अनेक जाती माहीत होत्या. तेथे कोणत्याही सार्वजनिक कार्यक्रमाच्या वेळी फेरीवाले सोनेरी कागदात गुंडाळलेले खजूर विकत असत.

खजुरात अंजिरासारखी भरपूर साखर असते. म्हणून गोड पदार्थ तयार करताना साखरेऐवजी खजूर घालतात. युरोपमध्ये काही भाज्या, मांस आणि मासे यांच्या पाककृती करताना चवीला थोडासा खजूर वाटून घालतात. खजुरापासून बनवलेले मद्य अप्रतिम असते आणि खजुराचा उपयोग 'केक्स आणि पेस्ट्रीज' बनवताना करतात असा उल्लेख ॲपिशिअस या फ्रेंच पदार्थ तज्ज्ञाच्या लिखाणात आढळतो. मध्ययुगीन काळातील लोक खजुराचा तऱ्हेतऱ्हेने उपयोग करीत असत. इ. सनाच्या सतराव्या शतकात बदकापासून बनवलेल्या 'पाते-अ-ला-पोर्तुगीज' हा पदार्थ तयार करताना त्यात खजूर घातला होता अशी नोंद Pierre-de-lure पिअेर-दि-ल्युन याच्या पाककृतीच्या पुस्तकात होती.

खजुरातील भरपूर साखर ही उत्तर आफ्रिका आणि पूर्वेकडील देशातील लोकांना मिळालेली ईश्वरी देणगीच होती. त्या देशातील आदिम काळातील भटका माणूस पोट भरण्यासाठी खजूर खात असे. वाळवलेला खजूर वाटून त्यापासून इराण, इराकमधील लोक एक प्रकारचा केक करीत असत. पर्शियन लोकांच्या दृष्टीने झरतुष्ट्राची पुण्यतिथी किंवा त्याच्या पुनरुत्थानाचा दिवस हे अतिशय पवित्र दिवस ! या दिवशी धार्मिक व भाविक पर्शियन माणसे आवर्जून असा खजुराचा केक करीत असत. हिब्रू लोक खजुराची ताजी फळे वाटून चाळणीतून काढीत व खजुराचा रस काढीत. परमेश्वर प्रसन्न व्हावा म्हणून खजुराचा हा दाट रस परमेश्वरचरणी अर्पण करीत असत. या रसाला 'डेबास' असे म्हणत. इराण, इराक, भूमध्यसामुद्रिक प्रदेशांतील लोक खजुराच्या बिया जळण म्हणून वापरत असत किंवा या कठीण बिया उकळत्या पाण्यात घालून मग त्या उंट, बकऱ्या यांच्या खाद्यात मिसळत असत. आपणही कापसातील सरकी पशुखाद्यात मिसळतो. तसाच काहीसा हा प्रकार आहे.

सुमेरियन आणि बॅबिलोनियन संस्कृती ही खजुरावर पोसलेली संस्कृती होती. खजूर हे त्या लोकांचे पूर्णान्न होते. त्याची जाण ठेवून या दोन्ही संस्कृतीतील लोकांनी खजुराच्या झाडाला



अनुक्रमणिका

'पवित्र झाड' म्हणून स्थान दिले. हिब्रू लोकांनी परमेश्वरी कृपा झालेल्या खजुराच्या झाडाला न्यायाचे प्रतीक म्हणून मान्यता दिली. ''जो नैतिकतेला धरून वागतो त्याची खजुराच्या झाडाप्रमाणे भरभराट होईल'' असे Psalmist सामिस्ट (साम या ग्रीक धार्मिक गीतांचे रचनाकार)यानी म्हटले आहे. इजिप्शियन लोकांनी त्यांच्या बांधकामातील स्तंभ खजुराच्या बुंध्याबरहुकूम बनवले होते. हे झाड म्हणजे जीवनाचे, जगण्याचे आणि साऱ्या जगाच्या उत्कर्षाचे प्रतीक आहे असे इजिप्शियन मानत असत. ''हे लाल खजुरा, तुझ्याशी अंजिराची किंवा द्राक्षाची तुलना करता येणार नाही. तुझा कृपायुक्त गर कोकराच्या मांसासारखा चविष्ट लागतो'' हे आहे खजुराचे स्तुतीपर गीत ! कैरोमधील खजुराची विक्री करणारे फेरीवाले अशा अर्थाचे गीत गात असत. प्राचीन काळापासून खजूर हा इजिप्शियनांच्या संस्कृतीचा एक भाग बनला होता हे समजण्यास ही उदाहरणे पुरेशी आहेत.

खजुराचे औषधी उपयोगी प्राचीन काळापासून लोकांना माहीत होते. आपल्याकडे रामायणकालातील लोकांना खजूर माहीत होता असे उल्लेख आढळतात. प्राचीन काळी 'साखर' औषध म्हणून वापरत असत. खजुरात साखरेचे प्रमाण भरपूर ! म्हणून साखरेऐवजी खजुराचा उपयोग औषधात करीत. खजुरामुळे त्वचा मऊ व तुकतुकीत होते अशीही भूमध्यसामुद्रिक प्रदेश आणि मध्ययुगीन युरोपातील लोकांची श्रद्धा होती. सर्दी आणि खोकल्यावरील रामबाण उपाय म्हणजे 'खजुराची पेस्ट' असा त्यांचा समज होता. सिंधमधून या फळाने भारतात प्रवेश केला. तोसुद्धा प्राचीन काळी ! भारतीयांनासुद्धा खजुराचे कफोत्सारक, पौष्टिक, सारक, कामोत्तेजक असे विविध गुणधर्म ज्ञात होते. म्हणून खजूर दमा, धातुविकार, ज्वर, बद्धकोष्ठता, स्मरणदोष इत्यादींवर गुणकारी मानला जाई. या झाडांपासून मिळणारा एक प्रकारचा गोंद पंजाबात औषधाकरता वापरला जाई. खजुराचे झाड हे 'कल्पवृक्षा'प्रमाणे असते. या झाडाच्या प्रत्येक भागाचा उपयोग होतो. खोडापासून मिळणाऱ्या लाकडाचा फर्निचरसाठी उपयोग होतो. झाडापासून मिळणाऱ्या काथ्याचा दोऱ्यांकरता व फळे काढून घेतल्यावर उरलेल्या लांब देठांचा केरसुणी, ब्रश करण्याकरता उपयोग करतात. खजुराच्या कोंबाची भाजी किंवा कोशिंबीर करतात. खजुरापासून उत्तम मद्य, लिक्युअर (भोजनोत्तर कमी प्रमाणात घ्यावयाचे मद्य), व्हिनेगार (ग्लेशियला ॲसेटिक ॲसिड) काढतात. 'फोनिकस सिल्व्हेट्रिस' यापासून भारतात 'साखर' तयार करतात. अरबांनी खजुराच्या ३६५ पाककृती आणि औषधी उपयोगांची यादीच तयार केली होती. संपूर्ण वर्षाचे जसे ३६५ दिवस तसे खजुराचे ३६५ उपयोग ! म्हणून अरबांना 'खजूर' हे वर्षाचे प्रतीक वाटत असे ! त्यातील तीनशे पासष्टाव्या क्रमांकावर होते खजुरापासून तयार केलेले मद्य ! याला Shekar शेकर असे म्हणत. हिब्रु लोक व त्यांचे धर्मगुरु यांनी मात्र हे मद्य त्याज्य ठरवल होते !

कॅनरी आयलंड्स, उत्तर आफ्रिका, दक्षिण पश्चिम आशिया, पाकिस्तान या ठिकाणी खजुराचे उत्पादन होते. भारतात ही झाडे क्वचितच दिसतात. उत्तर गुजरातच्या काही भागात खजुराच्या



अनुक्रमणिका

झाडांच्या लागवडीचे प्रयत्न केले आहेत. आपण ही फळे इराण, इराक, मस्कत व सौदी अरेबिया येथून आयात करतो. मोरोक्को, स्पेन, अमेरिका, ऑस्ट्रेलिया, त्रिनिनाद इ. प्रदेशात हल्ली खजुराची लागवड करतात. आंतरराष्ट्रीय बाजारपेठेत खजुराच्या एकूण जागतिक उत्पादनापैकी फक्त वीस टक्के खजूर विक्रीसाठी येतो. तरी तो पाच लक्ष टन असतो. खजूर जेथे पिकतो तेथील लोकांचे खजूर हेच प्रमुख अन्न असते. त्यामुळे खजुराच्या उत्पादनापैकी बऱ्याच भागाची बाजारात विक्री होते. खजुराच्या अनेक जातींपैकी 'मेसोपोटेमियातील halawi हलावी आणि पर्शियन सामुद्रधुनीतील kalesh कालेश' या जाती सर्वोत्तम मानल्या जातात. खजुराच्या खऱ्या जाणकारांना वाळलेल्या खजुरापेक्षा घडाला लगडलेली ताजी, नैसर्गिक फळेच अधिक पसंत पडतात !

## अननस

खजूर या सात हजार वर्षांपूर्वीच्या प्राचीन फळाचा सांस्कृतिक इतिहास पाहिल्यावर आता अगदी अलीकडे विकसित झालेल्या अननसाची माहिती करून घेऊया. दक्षिण अमेरिका ही अननसाची जन्मभूमी. इ. स. १४९३ साली कोलंबस जेव्हा मेक्सिकोतील Guadeloupe 'ग्वाडेलोप' येथे पोहोचला तेव्हा तेथे त्याला अननस हे फळ दिसले. बहुतेक ब्राझिलमधून ते तेथे पोचले असावे. ब्राझिलियन भाषेत nana नन म्हणजे सुगंधित. मराठीमधील अननस या नावात ही दोन्ही ब्राझिलियन अक्षरे गुंफली गेली आहेत. फ्रेंच आणि जर्मन भाषेतही हे नाव जसेच्या तसे राहिले. या दोन्ही युरोपीय भाषात या फळाला 'अननस' असेच म्हणतात. पोर्तुगीजांनी सेंट हेलेना बेटावर इ. स. १५०२ साली अननसाची लागवड केली व त्यांनतर आफ्रिकेतील अनेक भागात अननसाच्या बागा तयार केल्या. पोर्तुगीजानीच इ.स. १५५० मध्ये हे फळ भारतात आणले. भारताबरोबर इंडोनेशिया, मॅडॅगॅस्कर, जावा इत्यादि देशांत त्यांनी अननसाची यशस्वी लागवड केली. म्हणजे जगातील अनेक देशात अननसाचा प्रचार व प्रसार करण्याचे बरेचसे श्रेय पोर्तुगीजांचे आहे. इ. स. १५८९ साली म्हणजे कोलंबसानंतर जवळजवळ शतकाचा कालावधी लोटल्यावर फादर डी ॲकॉस्टा या स्पॅनिश धर्मगुरूने हे फळ पाहिले. त्याच्या दृष्टीला ते पाइन वृक्षाच्या फळाप्रमाणे भासले. त्यावरून या फळाचे स्पॅनिश नाव पाइना (Pina) असे पडले. ब्रिटनमध्ये जेव्हा हे फळ प्रथम आणले तेव्हा त्याला 'पाइन' असेच म्हणत असत पण मग ब्रिटिशांनी त्याचे 'पाइन ॲपल' केले.

प्राचीन काळापासून ब्राझील आणि व्हेनेझुअेला या ठिकाणी अननसाचे उत्पादन होत असले तरी पारना आणि पॅरॅग्वे या दक्षिण अमेरिकेतील नद्यांकाठच्या प्रदेशात अननसाचे पीक घेत असत. तेथे राहणाऱ्या टुपी (Tupi) आणि (Guarani) ग्वारानी या लोकांनी अननस माणसाळवला आणि उत्तर अमेरिकेत त्याचे पीक घेण्यास सुरुवात केली. अमेरिकन भूमिपुत्रांना (नेटिव्हज) अननसाचे उपयोग आणि महत्त्व ठाऊक होते. अननसाचे रोप टिकाऊ, दुष्काळी

परिस्थितीवर मात करणारे असल्यामुळे दूरदेशी जाताना प्रवासी आपल्याबरोबर अननसाची रोपे बाळगीत असत. त्यामुळे थोड्याच कालावधीत उत्तर व मध्य अमेरिका, ॲंटिलीस, दक्षिण मेक्झिको या सर्व ठिकाणी अननसाचा प्रचार व प्रसार झाला. कोलंबसाने अमेरिकेतील भूमीवर आपले पाऊल टाकण्याआधीपासून तेथील रेड इंडियनांना अननस हे फळ चांगलेच परिचित झाले होते !

इ. स. १५२६ च्या सुमारास अफगाणिस्तानच्या बाबराने दिल्लीवर स्वारी केली आणि दिल्लीच्या तख्तावर मोगलांचे अधिराज्य स्थापले. आपल्या मायदेशांतील कलिंगडे, टरबूज यासारखी आवडती फळे आपल्या राज्यात नाहीत याची खंत वाटल्यामुळे त्याने फळांच्या लागवडीला प्रोत्साहन दिले. साहजिकच त्याचा मुलगा अकबर बादशहाच्या काळात इ. स. १५७९ च्या सुमारास दिल्लीच्या बाजारात अनेक फळे उपलब्ध होती. त्यात संत्री, मोसंबी, कलिंगडे, टरबुजे, डाळिंबे या फळांचा समावेश होता. त्याचबरोबर अमेरिकेत जन्मलेली आणि मोगल साम्राज्यातील फळबागात तयार झालेले अननस आणि सीताफळेसुद्धा होती ! त्या सर्व फळांच्या विक्रीचे तत्कालीन दरसुद्धा अकबराच्या नोंदीत होते. आग्रा येथील शाहीबागांमध्ये अननसाची लागवड केली होती. त्याचबरोबर गरीब शेतकरी, बागाईतदारसुद्धा अननसाची मोठ्या प्रमाणावर लागवड करीत व भरपूर पीक घेत. अननस व अन्य फळांच्या विक्रीतून व्यापारी भरपूर नफा कमवीत असे अकबराच्या नोंदीवरून स्पष्ट होते.

सोळाव्या शतकात पोर्तुगीजानी भारतात प्रवेश केला. पोर्तुगीज व्यापाऱ्यांबरोबर काही शास्त्रज्ञ आणि डॉक्टर्ससुद्धा भारतात आले. गर्शिया दि ऑर्सा हा डॉक्टर इ. स. १५३४ पासून एकूण ३५ वर्षे गोव्यात राहिला. जॉन ह्युजेन फॉन लिनशेक्टन हा शास्त्रज्ञ १५८० च्या सुमारास गोव्यात राहिला. त्या दोघांनी तत्कालिन भारतातील संदर्भ फळे, फुले, भाज्या इत्यादी पदार्थांबद्दलच्या बारीकसारीक नोंदी केल्या होत्या. या नोंदी इतक्या अचूक होत्या की सर्व इतिहासकार तत्कालिन भारतातील संदर्भ शोधताना ती माहिती प्रमाणभूत मानतात. विशेषत: काजू, अननस, पपया यासारख्या ज्या फळांची पोर्तुगीज स्पॅनिश लोकांनी भारतीयांना प्रथम ओळख करून दिली त्या फळांची विस्तृत माहिती या दोन वैज्ञानिकांच्या लेखात आढळते.

दिल्लीच्या तख्तावर जेव्हा औरंगजेबाचे राज्य होते तेव्हा फ्रेंचांनी व्यापाराच्या उद्देशाने भारतात प्रवेश केला होता. फ्रेंच डॉक्टर फ्रँकॉय बर्निअर हा खास बादशहाच्या प्रकृतीची काळजी घेण्याकरता व त्याच्या दुखण्यावर इलाज करण्याकरता इ. स. १६५९ ते ६६ अशी एकूण सात वर्षे भारतात राहिला. या सात वर्षात त्याने उत्तर भारतात विशेषत: काश्मिर, बंगाल या प्रांतात प्रवास केला. काश्मीरच्या सौंदर्याने त्याला मोहिनी घातली. तर बंगालच्या सुबत्तेने तो भारावून गेला. बंगालमधील धनधान्याची लयलूट, तुतीची झाडे आणि त्यावर होणारी रेशमाच्या किड्यांची पैदास. अनेक फळांच्या मोठमोठ्या बागा यांची सविस्तर वर्णने त्याच्या लेखनात होती. बंगालमधील सुपीक जमिनीतील रसदार, पिवळ्याजर्द मधुर, स्वादिष्ट आणि मुबलक अननसांची

प्रशंसा त्याने आपल्या लेखनात केली होती. भारतातील बंगाल या प्रांताने पाश्चात्य व्यापाऱ्यांना आकर्षित का केले असावे याचा या नोंदी म्हणजे अप्रत्यक्ष पुरावाच होता !

बऱ्याचशा फळांची ओळख युरोपियनांनी अमेरिकनांना करून दिली होती. परंतु अननस याला अपवाद होता. स्पेनचा राजा पाचवा चार्लस् (१५०० ते १५५८) याने अमेरिकेतून आलेला अननस प्रथम खाऊन बघितला. पण इतक्या प्रदीर्घ प्रवासामुळे हे नाजूक फळ खराब झाले होते. मग ते राजाला कसे आवडणार? त्याने या फळाविषयी नापसंती दर्शविली. सुमारे भंभर वर्षानंतर ह्युनॉत Huguenot या फ्रेंच तंत्रज्ञाने हॉलंडमध्ये एका नवीन पद्धतीचा शोध लावला. कृत्रिम पद्धतीने एखाद्या बंदिस्त जागेचे तापमान वाढविल्यामुळे तेथे झाडांची वाढ करता येते. अशा जागांना इंग्रजीमध्ये 'ग्रीनहाऊस' असे म्हणतात. मराठीत त्याला 'हरितगृह' किंवा 'वनस्पतीगृह' असे म्हणता येईल. इ. स. १६४२ च्या सुमारास क्लीव्हलँडच्या सरदारपत्नीच्या हरितगृहात युरोपमधील पहिला अननस वाढविण्यात आला. या पहिल्या वहिल्या अनोख्या भेटीचा नजराणा राजाला अर्पण करण्यात आला. राजाच्या दरबारातील चित्रकाराने या भेटीचे सुंदर चित्रीकरण (पेंटिंग) करून ठेवले असल्यामुळे या गोष्टीचा पुरावा उपलब्ध होतो. चौदावा लुई-सन किंग याने ला क्विंटिनीला हे परदेशी फळ आपल्या व्हर्सायच्या भाजीमळ्यात वाढविण्याची आज्ञा केली. ला क्विंटिनीच्या दृष्टीने हे एक आव्हानच होते. उष्ण कटिबंधातील हे फळ फ्रान्समधील थंडीत जोपासणे फार अवघड होते. पण ग्रीन हाऊस – हरितगृहाच्या मदतीने त्याने अभ्यासपूर्वक अननसाची लागवड व जोपासना केली. परंतु याचा फायदा मात्र पंधराव्या लुईला मिळाला.

अठराव्या शतकाच्या उत्तरार्धात अननस हे एक फॅशनेबल फळ म्हणून युरोपात मान्यता पावले. युरोपीय देशात अननस वाढवणे फार खर्चिक होते. तसेच त्या काळात दळणवळणाची साधने गतिमान नव्हती. त्यामुळे वेस्ट इंडीज व अन्य ठिकाणाहून अननस आयात करणे कठीण होई. साहजिकच युरोपमध्ये अननस फार महाग असत. हरितगृहात वाढविलेले अननस अतिशय आंबट असत. अलेक्झांडर ड्युमास (थ्री मस्केटिअर्सचा लेखक) याने या अननसांचा आंबटपणा कमी करण्याचा उपाय सुचवला होता. ह्या फळांचे तुकडे पाण्यात बुडवून ठेवावेत व मग ते वाईन आणि साखर घालून लोकांना खायला द्यावेत असे अननसाचे तुकडे लोकांना खायला आवडतील असे त्याचे मत होते.

जेम्स वॅटने वाफेच्या इंजिनाचा शोध लावला आणि या तत्त्वावर चालणाऱ्या बोटींमुळे दर्याप्रवास सुखकर व जलद होऊ लागला. त्यामुळे अननस युरोपात आणणे सोईचे झाले. तरीसुद्धा दुसऱ्या महायुद्धापर्यंत युरोपमध्ये अननस महाग असत. फक्त अमेरिकेतून युरोपमध्ये आयात होणारे अननसाच्या रसाचे कॅन्स घेणे लोकांना त्यातल्या त्यात परवडत असे. एकोणिसाव्या शतकात विमानाचा शोध लागला. अननसासारखे नाजूक, रसाळ, पिकलेले फळ उत्तम अवस्थेत जगाच्या कानाकोपऱ्यात पोचले. गेल्या शतकात 'ताजा अननस युरोपीय बाजारात

जाऊन खरेदी करणे' हे अप्रूप होते. पण आता युरोपीय माणूस बाजारात जाऊन सहज ताजा अननस खरेदी करू शकतो याला कारण हवाई वाहतूक !

सर्व जगात ३,९००,००० टन अननसाचे पीक येते. त्यातील २८% अननस हवाई बेटावर होतात. कॅनिंग करण्यासाठी 'क्यू' जातीचे अननस वापरतात. हवाई बेटातील बरेचसे अननस कॅनिंग करण्यासाठी उपयोगात आणतात. त्यामुळे जागतिक कॅनिंग केलेल्या अननसांपैकी ६०% भाग हवाई बेटाचा असतो ! ऑस्ट्रेलिया, मलेशिया, आफ्रिका या ठिकाणी कॅनिंग केलेले अननसाचे डबे प्रामुख्याने इंग्लंड व अन्य युरोपीय देशांना निर्यात करतात. आयव्हरी कोस्टमधून प्रमुख निर्यात फक्त अननसाचीच होते. भारतात आसाम, बिहार, केरळ तसेच कोकणासारख्या समुद्रकिनारपट्टीच्या इतर भागात अननसाचे भरपूर पीक येते. अननसापासून सरबते, मुरांबे, जॅम इत्यादी पदार्थ करतात. अननसाचा गोड भात व शिरा अननसप्रेमींना विशेष आवडतो. आईसक्रीम्स व पेस्ट्रीज करताना अननसाचा वापर करतात. भारतीय, चिनी आणि श्रीलंकेतील अनेक पाककृतीत अननस वापरतात.

अननसाचे शास्त्रीय नाव आहे Ananas comosus अननस कॉमोसस Bromeliaceae ब्रॉमेलिअेशिअे या वनस्पती कुटुंबातील हे झाड १ ते १.५ मीटर उंच वाढते. उष्ण कटिबंधातील हवामान याला मानवते. अननसाची पाने ताठ, लांबट व अरुंद, चिवट, जाड, काटेरी टोक व किनारीची असतात. सुमारे ३० ते ४० पाने मूळ खोडाभोवती दाटीवाटीने चहूबाजूने गोलाकार बसवल्यासारखी येतात. हे गाजराप्रमाणे द्विवार्षिक झाड आहे. पहिल्या वर्षी झाडाची उत्तम वाढ होते. परंतु झाडाला फुलोरा येत नाही. दुसऱ्या वर्षी म्हणजे झाड लावल्यापासून सुमारे १५ ते २० महिन्यानंतर पानांच्या वरच्या बाजूस मूळ खोडाभोवती फिक्कट जांभळ्या रंगाच्या फुलांचा फुलोरा येतो व फुलोऱ्याच्या शेंड्यावर पुन्हा लहान काटेरी पानांचा झुपका येतो. अननसाच्या पुष्पगुच्छाला 'स्पाइक' असे म्हणतात. या फुलांना देठ नसतात. ही फुले सुरुवातीला सुटी असतात. पण 'फलन' झाल्यावर त्याची निदले (sepals) आणि फुलोरा धारण करणारा खोडाचा भाग (axis) ही दोन्ही रसदार व पुष्ट होतात. ही सर्व फुले एकत्रित होऊन अननस तयार होतो. अननस हे पुष्पगुच्छापासून तयार झालेले बहुविध (Multiple) फळ असून त्या प्रकाराला वनस्पतीशास्त्रीय 'सोरॅसिस' म्हणतात.

अननसाला उत्तम स्वाद असतो. या आंबटगोड रसदार फळात भरपूर व्हिटॅमिन्स आणि खनिज क्षार असतात. अननसाच्या 'पाचक' गुणधर्मामुळे हे फळ सर्व फळात वेगळेपणाने उठून दिसते. अननस खाल्ल्यामुळे वजन घटते असे अनेक आहारतज्ज्ञांचे म्हणणे आहे. अननसात ब्रॉमेलिन Bromeline नावाचे विकर (enzyme) असते. या विकरामुळे नत्रयुक्त पदार्थांचे पचन होते. वजन कमी करण्यासाठी आहाराची आखणी करणाऱ्या आहारतज्ज्ञांच्यादृष्टीने अननस हे फळ फार महत्त्वाचे आहे. हे आहारतज्ज्ञ स्थूल व्यक्तींना काही दिवस फक्त अननसाचा आहार घेण्याचा सल्ला देतात. फक्त अननस खाल्ला तर त्या व्यक्तीच्या जठरात ब्रॉमेलिन हे विकर

केळ्याचा उल्लेख अनेकदा येतो. रामायणकालीन लोकांचे केळे हे आवडते फळ होते. आशिया खंडाच्या उष्ण कटिबंधातील सर्वच प्रदेशात केळ्याची लागवड प्राचीन काळापासून होत होती. पण याच काळात पृथ्वीच्या दुसऱ्या टोकाला मध्य अमेरिका, कॅरिबिअन बेटे या ठिकाणी सुद्धा केळ्याच्या उत्तम संकरित जातीचे भरपूर उत्पादन होत असे. तेथील प्रत्येक प्रादेशिक भाषेत केळ्याला स्वतंत्र नाव होते. अतिप्राचीन काळी पृथ्वीवरील या अतिदूर व एकमेकांशी दळणवळण असण्याची सुतराम् शक्यता नसलेल्या दोन भिन्न प्रदेशात हे केळं हे एकच कौतुक कसे जन्माला आले असावे? हा विचार मानवाला चक्रावून टाकतो आणि केळ्याविषयीचे गहिरे रंग अधिकच गडद होतात.

स्पॅनिश धर्मगुरू फादर डी ॲकॉस्टा याने केळ्याचे वर्णन लिहून ठेवले आहे. दक्षिण अमेरिकेतील इक्वॅडॉर व पेस या पॅसिफिक महासागराच्या किनारपट्टीवर इ. सनाच्या बाराव्या शतकापासून 'इन्का' ही प्रगत संस्कृती नांदत होती. सोळाव्या शतकाच्या सुरुवातीला ही संस्कृती लयाला जाण्यापूर्वी या संस्कृतीचा अखेरचा वारस 'गॅर्सिलॅसो' हा होऊन गेला. "केळे हे फळ पेरूमधील नाही तर ते अटलांटिकच्या किनाऱ्यावरील प्रदेशांतील फळ आहे." असे गॅर्सिलॅसोने ठामपणे प्रतिपादन केले आहे. स्थलांतर करणारे पक्षी बीजप्रसार करतात. पण केळ्याच्या बाबतीत ते अशक्य कारण बिया लावून केळ्याचे झाड येत नाही ! यावरून १५ व्या व १६ व्या शतकात या विस्तीर्ण प्रदेशातील लोकांचे सामाजिक संबंध होते असा निष्कर्ष सहज काढता येतो. परंतु हे फळ नेमके, कोणी, केव्हा व कसे नेले याची नोंद इतिहासाच्या पानात आढळत नाही.

सौदी अरेबियातून लाल समुद्र पार करून केळे आफ्रिकेच्या 'इथिओपिया' या भागात इसवीसनाच्या सहाव्या शतकात पोचले. तेव्हापासून चौदाव्या शतकापर्यंतच्या आठ शतकात संपूर्ण आफ्रिका खंडात केळ्याचा प्रचार व प्रसार झाला होता. एका अरबी प्रवाशाने उत्तर पश्चिम आफ्रिकेतील 'मोरोक्को' देशात केळे खाल्ल्याची नोंद केली होती. पंधराव्या शतकात पोर्तुगीज केळ्याला त्याच्या al vaneyra अल् व्हॅनेरा या अरबी नावाने ओळखत असत. Sao Tome साओ टोम या बेटावरील लोक केळ्याला 'ॲबाना' म्हणत असत. कांगो नदीच्या खोऱ्यांतील लोकांना पूर्वीपासून केळे माहीत होते. इ. सनाच्या १५ व्या व १६ व्या शतकात तेथे केळ्याचे भरपूर उत्पादन होत असल्याच्या नोंदी आढळतात.

स्पॅनिश धर्मगुरू नव्या जगतात येऊन पोचले तेव्हा तेथील लोकांना केळे हे फळ ठाऊक होते. ते केळ्याला प्लॅटॅनो किंवा प्लँटॅनो असे म्हणत असत. स्पॅनिश धर्मगुरू केळ्याचे हे नाव ऐकून बुचकळ्यात पडले कारण प्लॅटॅनो किंवा प्लँटॅनो म्हणजे प्लेनचे झाड. (प्लेन हे प्लॅटॅनस या जीनसमधील उंच झाड असून त्याची पाने मेपलच्या पानांसारखी दिसतात) प्लेन वृक्ष आणि केळीचे झाड यात कसलेही साम्य नसतानासुद्धा या नवीन जगतातील रहिवाशांनी केळ्याला हे नाव का दिले असावे हे स्पॅनिश धर्मगुरूंना समजेना. "कॅस्टिलमध्ये (स्पेन) जशी प्लेनची

झाडे विपुल तशी या भागात केळ्याची झाडे मुबलक या दृष्टीने विचार करून नव्या जगातील रहिवाशानी केळ्याचे प्लॅन्टॅनो हे नाव निश्चित केले असावे.'' अशी शक्यता तर्काधिष्ठित वाटते! म्हणूनच 'बनाना' बरोबर प्लँटेन हे केळ्याचे दुसरे नाव पडले आहे.

इ. स. १८१५ ते २१ या काळात सेंट हेलेना या ब्रिटिशांच्या मालकीच्या अटलांटिक महासागरांतील बेटावर नेपोलियन हद्दपारीची शिक्षा भोगत होता. तेव्हा मधात घोळवून तळलेले केळ्याचे काप त्या बंदिवासातही त्याला आनंद देत असत. १६ व्या शतकापासून एकोणिसाव्या शतकापर्यंतच्या काळात पाकशास्त्रावरील पुस्तके लिहिणाऱ्या तमाम युरोपीय लेखिकांनी केळ्याकडे संपूर्ण दुर्लक्ष केले होते. त्याला कारणही तसेच होते. युरोपमध्ये हे फळ होत नसे आणि दळणवळणाची प्रगत साधने अस्तित्वात नसल्यामुळे केळ्याची आयात करणे युरोपियनांना जमत नसे. १२० सें. च्या वरील तापमानात केळी झटकन पिकतात. म्हणून शीतगृहे असलेल्या खास बोटी बनवण्याचे तंत्रज्ञान विकसित झाले तेव्हापासून युरोपमध्ये केळ्याची आयात होऊ लागली. अमेरिका, आफ्रिका येथील उत्तम प्रतीची केळी चांगल्या अवस्थेत युरोपियनांना उपलब्ध झाली. इ. स. १९२० नंतर जोसेफाइन बेकर या कवयित्रीने केळ्यावर सुंदर कविता केली. त्या कवितेत कवयित्री म्हणते, "मला केळे खूप आवडले कारण त्यात हाडे नाहीत !'' केळं हे फळ युरेपियनांना पसंत पडले.

केळ्याच्या तीस ते चाळीस जाती आहेत. पण निरनिराळ्या ठिकाणी त्यांची निरनिराळी नावे. त्यामुळे केळ्याच्या पुष्कळ जाती असल्याचा समज होतो. बसराई जातीची लागवड महाराष्ट्रात जास्त होते. महाराष्ट्रातील कोकणच्या किनारपट्टीत व वसई येथे होणारी हरिसाल ही जात म्हणजेच आपणास बारा महिने मिळणारी हिरव्या सालीची केळी. ह्या केळ्यांचा गर रुचकर, मऊ व गोड असतो. तामिळनाडू, पं. बंगाल आणि आसाम या राज्यात लाल वेलची या जातीची केळी मुबलक ! याच जातीला वेस्ट इंडीजमध्ये "फिलबास्केट'' तर तामिळनाडूमध्ये "पूवन'' आणि प. बंगाल, आसाममध्ये "चंपा'' ही नावे आहेत. सफेद वेलची या सर्वोत्तम जातीची केळी भारतात उन्हाळ्यात मिळतात. आंब्याशी याची दोस्ती. कैऱ्यांबरोबर फेब्रुवारी-मार्चमध्ये ही केळी बाजारात दिसू लागतात ती जून-जुलैमध्ये आंबे बाजारातून जाईपर्यंत ! या केळ्याची साल अतिशय पातळ, गर पांढरा व मधुर असतो. ही केळी जितकी जास्त पिकतील तितकी त्याची गोडी वाढते. नाजूक, छोटी, तुकतुकीत पिवळ्या सालीची ही केळी त्याच्या बाह्यसालावरून जाणकारांनाच ओळखता येतात. राजेळी ही केळ्याची आणखी एक सुप्रसिद्ध जात. ही केळी खूप मोठ्या आकाराची, घट्ट गराची असतात. सफेत वेलचीप्रमाणे ही केळी जितकी जास्त पिकतील तितकी गोड लागतात. बाहेरची साल संपूर्ण काळी पडली तरी आतील केळे उत्तम स्थितीत असते. ही केळी 'सुकेळी' करण्याकरता वापरतात. मधाची पुटे देऊन उन्हात वाळवलेली ही केळी केळीच्याच सुक्या सोपटात बांधून बाजारात विकतात व अनेक दिवस टिकतात. नारळ, साखर व तूप घालून यांची खमंग केळी करतात. ही केळी सर्वात महाग असतात.

कच्च्या केळ्यांत वीस टक्के पिष्टमय पदार्थ असतात. जसजसे केळे पिकते तसतसे त्यातील पिष्ठमय पदार्थाचे शर्करेत रूपांतर होते. शंभर ग्रॅम केळ्यापासून ९० कॅलरी उष्णता मिळते. भारतासारख्या गरीब देशांतील लोकांचे केळे हे पूर्णान्न असते. केळ्यात पोटॅशियम हा क्षार भरपूर प्रमाणात असतो. उष्ण कटिबंधातील लोकांच्या घामावाटे बरेच क्षार शरीराबाहेर टाकले जातात. अशा व्यक्तीनी दिवसाला एक केळे खाल्ले तर ही क्षारांची झीज भरून निघण्यास मदत होईल. आपल्याकडे कच्च्या केळ्याचे पीठ करून त्याचे घावन, थालिपीठ, लापशी इत्यादी पदार्थ उपासाला खाण्याची पद्धत आहे. मिरपूड किंवा तिखट लावलेले पांढरट पिवळे केळ्याचे वेफर्स कच्च्या वेलची केळ्यांपासून करतात. तर पिवळे धमक केळ्याचे वेफर्स कच्च्या राजेळ्यांपासून करतात. कच्च्या राजेळ्यांचे काप तळणीत टाकले की बघता बघता 'पिवळे धमक' होतात. कच्च्या केळ्यांची भाजी अनेक प्रकारांनी करत असले तरी दक्षिण भारतातील केरळीयांची भाजी सर्वात चविष्ट ! पिकलेल्या केळ्यांपासून मुरांबे, शिकरण, वड्या, पुऱ्या, घावन, हलवा इत्यादी अनेक चविष्ट पदार्थ भारतीय आहारात करतात.

पश्चिम आफ्रिकेत केळ्याचे पीठ करून त्यापासून फाउफाऊ नावाचा ब्रेड तयार करतात व तो मसालेदार सामिष पदार्थाबरोबर खातात. केळ्याचा नैसर्गिक स्वाद उडून जाणारा असतो. म्हणून केळ्यापासून जर आइस्क्रीम, मिल्क शेक्स् किंवा लिक्युअर (भोजनोत्तर थोड्या प्रमाणात घ्यावयाचे मद्य) करायचे असेल तर त्या पदार्थांना केळ्याचा स्वाद आणण्याकरता 'ॲमिल ॲसिटेट' ' Amly acetate' या रसायनाचा वापर करतात.

असे हे लहानथोर, गरीब-श्रीमंत, उच्च-नीच, सुशिक्षित अशिक्षित अशा सर्व मानवनिर्मित सीमारेषांचे बंधन ओलांडून जगातील सर्व देशवासीयांना प्रिय झालेले फळ !

---

छायाचित्रकलेचा शोध लागण्यापूर्वी एका विशिष्ट प्रकारची प्रसिद्धी अस्तित्वात होती. या कलेचा शोध लागल्यानंतर प्रसिद्धीबाबत सारेच बदलले. चौदाव्या शतकात एक झेक राजा होऊन गेला. त्याचे नाव वेनकेस्लोस (Wenceslaus) या राजाला प्राग शहरातील खाणावळींना भेट देण्याचा शोक होता. या ठिकाणी आलेल्या तळागाळातील लोकांना आपण कोण आहोत याची जाणीव होणार नाही अशा पद्धतीने वेशांतर करून, त्यांच्याशी गप्पागोष्टी करणे त्याला आवडे. या राजाकडे सत्ता, प्रसिद्धी, स्वातंत्र्य सारे काही होते. या उलट विद्यमान ब्रिटनमधील प्रिन्स चार्लस्‌कडे सत्ता नाही, स्वातंत्र्य आहे. अफाट प्रसिद्धी आहे. पण या प्रसिद्धीने त्याच्या सर्व स्वातंत्र्याचे भक्षण केले आहे.

– मिलान कुंडेरा



अनुक्रमणिका

# जीवशास्त्र

## स्त्रीला काय हवे असते ?

**–प्रतिभा टिल्लू**

आम्ही पूर्वजांच्या ज्ञानाचे, शहाणपणाचे चालते बोलते संग्रह आहोत –

**–हेलेना क्रोनिन**
**(मुंगी आणि मोर)**

स्त्रीला सवंगडी नेमका कसा हवा असतो ह्याबाबतीत सगळेच पुरुष शास्त्रज्ञ आणि सगळेच पुरुषही शतकानुशतके कायमचेच कोड्यात पडलेले आहेत. इतर कोणत्याही प्रजातींपेक्षा स्त्रियांची सवंगड्याबाबतची आवड ही अतिशय गुंतागुंतीची, गूढ आणि अनाकलनीय आहे असे म्हटले तर ते पुरुषी पद्धतीचे विधान ठरू नये. स्त्रीच्या इच्छेचे मूळ विकासाच्या इतिहासात शोधायचे झाले तर खूपच मागे जावे लागेल– माणूस प्रजाती म्हणून अस्तित्वात येण्यापूर्वी, सस्तन प्राण्यांपासून प्राण्यांच्या श्रेष्ठ जातींचा उगम होण्यापूर्वी, अगदी लैंगिक पुनरुत्पादनाच्या सुरुवातीपासूनच !

पुनरुत्पादनाच्या जीवशास्त्रीय 'लिंग' ह्या गोष्टीच्या प्राथमिक स्वरूपाच्या व्याख्येमुळे स्त्रियांना जोडीदार निवडण्याचे स्वातंत्र्य मिळते. ही एक अशी वैशिष्ट्यपूर्ण परिस्थिती आहे की ह्या ठिकाणी फक्त लिंगाच्या पेशींच्या आकारावर जीवशास्त्रीय लिंग ठरविले जाते. पुरुषाची व्याख्या 'ज्याला लहान लिंगपेशी आहेत तो' अशी केली जाते तर स्त्रीची 'जिला मोठ्या लिंगपेशी आहेत ती' अशी केली जाते. स्त्रीचे मोठे शुक्राणू तुलनेने स्थिर असतात आणि पोषक द्रव्यांनी भरलेले असतात. पुरुषांच्या शुक्राणूला हालचालींची आणि पोहोण्याच्या वेगाची देणगी असते. आकाराप्रमाणेच दोघांच्या संख्येतही भरपूर फरक असतो. पुरष लक्षलक्ष शुक्राणू तयार करतो. जवळजवळ दरताशी बारा दशलक्ष शुक्राणू परत पुरविले जाऊ शकतात. मात्र स्त्रिया सगळ्या आयुष्यात मिळून जवळजवळ चारशे स्त्रीबीजे इतकीच ठराविक बीजांडे निर्माण करू शकतात.

गर्भसंभवास फक्त बीजांडाबरोबर स्त्रियांची महत्त्वाची गुंतवणूक थांबत नाही. मानवी पालकत्वाच्या मूलभूत कल्पना म्हणजे गर्भसंभव आणि गर्भधारणा ह्या स्त्रीमध्ये उपजतच असतात. पुरुषाचा एकदा केलेला समागम स्त्रीसाठी नऊ महिन्यांचा शक्ती शोषून घेणारा काळ ठरतो. याखेरीज तेवढा काळपर्यंत दुसरा सहचर मिळवण्याच्या संधी तिला नाकारल्या जातात. त्यांनतर स्त्री स्तनपानाच्या जबाबदारीत ३/४ वर्षे तरी गुंतून पडते.

प्राणीजगतात मात्र पुनरुत्पादनाच्या क्रियेत मादीला नरापेक्षा अधिक जबाबदारी उचलावी



अनुक्रमणिका

लागत नाही. मॉरमान क्रिकेट, पाइपफिश सीहॉर्स, आणि पनामिअन पॉयझन ॲरो फ्रॉग ह्या प्राण्यांच्या बाबतीत मात्र हे नरच अधिक जबाबदारी उचलतात. मॉर्मन क्रिकेट फार प्रयत्नाने, अतिशय कष्टाने पोषक द्रव्याने अगदी भरपूर भरलेले शुक्राणू तयार करतो. माद्यांची अशा प्रकारच्या नरासाठी चुरस लागते. ह्या नरमादीच्या भूमिका इतरांपेक्षा अगदीच वेगळ्या असतात. इथे नर मादीची निवड करतो. मात्र हे एकच उदाहरण सोडल्यास चार हजार सस्तन प्राण्यांच्यामध्ये – दोनशे उच्च कोटीचे प्राणीप्रकार धरून – माद्याच गर्भसंभव, गर्भधारणा आणि स्तनपानाची जबाबदारी घेतात.

स्त्रियांवर पडलेल्या मातृत्वाच्या ह्या जबाबदारीमुळे त्या महत्त्वाच्या – मर्यादित महत्त्वाच्या– साधनाचे रूप घेतात. गर्भसंभव, गर्भधारणा, गर्भसंगोपन, सांभाळ करणे, पोषण करणे, आणि मुलांचे संरक्षण करणे ह्या गोष्टी पुनरुत्पादनामध्ये येतात, पण त्या वाट्टेल त्याच्यावर सोपवता येत नाहीत. त्याप्रमाणे त्या अनेक पुरुषांना वाटूनही देता येत नाहीत.

ज्यांच्याजवळ महत्त्वाची साधनसामुग्री असते ते सहजासहजी, मनात येईल तशी, विचार न करता ती वाटून टाकीत नाहीत. केवळ समागमाची परिणती म्हणून स्त्रियांना भूतकाळी बरेच काही गमवावे लागल्यामुळे, स्त्रिया नव्या काळात जोडीदाराच्या निवडीबद्दल अधिक चोखंदळ असतात. ज्या पूर्वज स्त्रिया निवडीबाबत जागरूक राहिल्या नाहीत त्यांना फार मोठी किंमत मोजावी लागली. ह्या अर्थी की त्यांना एकतर फारच थोडी मुले झाली आणि त्यांना झालेल्यांपैकी फारच थोडी मुले प्रजोत्पादनाच्या वयापर्यंत जगली. विकासाच्या इतिहासाच्या दृष्टीने जर समागमासाठी निवडलेल्या स्त्रीबाबत पुरुषाची निवड चुकली तर फक्त काही तास फुकट गेले एवढेच त्याचे नुकसान ! त्यामुळे त्याची पुनरुत्पादनाची क्षमता कमी होत नाही. स्त्रीला सुद्धा अशा प्रकारच्या जुजबीसंबंधातून बाहेर पडता येईल. पण समजा चुकून गर्भधारणा झाली तर पुढे कैक महिने, वर्षे, दशके तिला त्याची किंमत मोजीत राहावे लागते.

नव्या गर्भनिरोधक तंत्रज्ञानामुळे ह्या परिस्थितीमध्ये फरक पडला. सध्याच्या औद्योगिक जगतामध्ये स्त्रिया जुजबी संबंध ठेवू शकतात कारण आता त्यांना गर्भधारणेचे भय नसते. पण शतकानुशतकाचे संस्कार आपल्या मनावर असल्यामुळे भोवताल बदलले तरी अजूनही तेच लैंगिक मानसशास्त्र आपण बाळगून आहोत.

**इच्छेचे घटक**

आपण एखादी पूर्वजस्त्री विचारात घेऊ या. ती दोन पुरुषांमध्ये डावे उजवे ठरवणार आहे. त्यापैकी एक अतिशय दिलदार आहे, तिला सगळ्या सुखसोयी देऊ करतो आहे आणि दुसरा आहे अगदी कंजूष, चिक्कू. बाकीच्या गोष्टींमध्ये दोघेही तुल्यबळ असतील तर चिकू पुरुषापेक्षा दिलदार पुरुषाचे पारडे जड होईल. हा माणूस तिला त्याच्या शिकारीतला वाटा देईल आणि त्यामुळे तिच्या अस्तित्वाचा प्रश्न थोडा सोपा होईल. त्याचा वेळ, शक्ती आणि साधनसामुग्री

तो मुलांच्या संगोपनासाठी वापरील आणि स्त्रीला प्रजोत्पादनाच्या आणि भरणपोषणाच्या कामात मदत करील. साहजिकच चिकटोजीरावांपेक्षा ह्या दिलदार आदमीला स्त्रीचा जोडीदार म्हणून महत्त्व प्राप्त होईल. पुरुषाच्या दिलदारीमुळे स्त्रीला प्रजोत्पादनाच्या कामात मदत मिळते. हे जर विकासाच्या काळात सतत लक्षात येत गेले तर जोडीदाराची निवड करताना उदारपणा हा एक महत्त्वाचा निकष ठरेल.

आता एक अधिक गुंतागुंतीची पण वस्तुनिष्ठ घटना विचारात घेऊ या. याठिकाणी पुरुष फक्त उदारच नव्हते, सहचराच्या निवडीसाठी महत्त्वाचे वाटावेत असे आणि गोंधळात पडावे इतके गुण त्या पुरुषांच्यामध्ये होते. बलदंड शारीरिक क्षमता, क्रीडानैपुण्य, महत्त्वाकांक्षा, उद्योजकता, दयाळूपणा, समजूतदारपणा, भावनिक विवेकशीलता, बुद्धिमत्ता, सामाजिक नैपुण्य, विनोदबुद्धी, नातेवाईकांचा गोतावळा आणि समाजातील उच्च स्थान इतके वैविध्यपूर्ण प्रकार त्यांच्यामध्ये होते. ह्याबरोबरच पुरुषांमध्ये अशाही काही गोष्टी होत्या की त्याचा ताप स्त्री जोडीदाराला व्हावा. उदाहरणार्थ – काही जणांना मुले होती, काहींना कर्ज होते, काही संतापी, होते, स्वार्थी मतलबी होते, आणि काहींना धड जातकुळी नव्हती. त्याशिवाय पुरुषांमध्ये इतर अनेक प्रकारचे फरक होते. त्या फरकांशी स्त्रियांचा काहीही संबंध नव्हता. काहींच्या बेंबी आत वळलेल्या होत्या. काहींच्या बाहेर होत्या. जर पूर्वज स्त्रियांचा पुरुषांच्या बेंबीच्या विशिष्ट आकाराबद्दल काही खास आग्रह नसेल तर हा आग्रह नव्याने निर्माण होण्यासारखा नव्हता. अनेक प्रकारे स्त्रियांचा महत्त्वाच्या गुणधर्मांनी पुरुषांची निवड करण्याचा प्रकार हजारो वर्षे, हजारो पुरुषांसाठी चालू आहे.

लोकांच्या निवडीचे निकष कधीच कायमस्वरूपी नसतात. हे निकष बदलतात म्हणून जोडीदार शोधणारे लोक हे संभाव्य गुणधर्म असू शकणारा सहचर शोधण्याच्या प्रयत्नात असतात. तरुण शिकाऊ डॉक्टरजवळ आज जरी काही नसले तरी भविष्यात तो भरपूर कमावणार ह्याची खात्री असते. एखादा माणूस भरपूर महत्त्वाकांक्षी असतो पण त्याने आधीच यशाचे शिखर गाठून झालेले असते. एखाद्या माणसाला आधीच्या विवाहापासून मुले असतात पण ती घरट्यातून उडून जाण्याइतकी मोठी झालेली असल्यामुळे त्याच्या उत्पन्नावर हक्क सांगण्याची शक्यता नसते. थोडक्यात सहचराची पूर्वपीठिका, सद्यस्थिती आणि भविष्यातल्या ह्या सगळ्याच गोष्टींचा साकल्याने विचार करून त्याचे महत्त्व ठरवायला हवे. स्वत:चा फायदा होईल असे गुण असणाऱ्या पुरुषाची निवड करणे आणि ज्याचे गुण स्त्रीला महाग पडतील अशा पुरुषाला नाकारणे उत्क्रान्तीमुळे स्त्रियांना शक्य झाले आहे. पुरुषाचा प्रत्येक स्वतंत्र गुण जोडीदार म्हणून त्याच्या स्त्रीला वाटत असलेल्या महत्त्वात वाढ करतो.

मात्र एखाद्या विशिष्ट घटकाला महत्त्व देण्यामुळे सहचराची निवड करण्याचा प्रश्न सुलभ होत नाही. स्त्रियांसमोर ह्याखेरील अनेक अडथळे उभे असतात. स्वत:ची अगदी वेगळी परिस्थिती

आणि व्यक्तिगत गरजा ह्यांचा संपूर्ण आढावा घ्यावाच लागतो. एकच पुरुष वेगवेगळ्या स्त्रियांना वेगवेगळ्या कारणांसाठी महत्त्वाचा वाटू शकेल – उदाहरणादाखलच बोलायचे तर एखाद्या पुरुषाची मुलांचे संगोपन करण्याची ताकद, जिला कोणी नातेवाईकच नाहीत अशा स्त्रीला महत्त्वाची वाटेल; पण जिला आईबहिणी, आत्यामावश्या, काकामामा मनापासून मदत करायला तयार आहेत तिला ह्या पुरुषाचे महत्त्व वाटणार नाही. एखाद्या चंचल पुरुषाची निवड करणे हे जिला मदत करण्याजोगे चार भाऊ आहेत तिला परवडेल, पण एकुलत्या एका मुलीच्या दृष्टीने ते अधिक धोकादायक आहे. थोडक्यात जोडीदार म्हणून अपेक्षित असलेली गुणवत्ता ही जोडीदार शोधणाऱ्यांच्या संदर्भानुसार, व्यक्तिगत निराळेपणानुसार, आवडीनुसार, गरजेनुसार बदलत असते.

जोडीदार शोधताना स्त्रीला त्या माणसाजवळ खरोखरीच ही साधनसामुग्री आहे का ह्याचा अंदाज घेता आला पाहिजे. काही विषयात पुरुष स्त्रियांना सहज फसवू शकतात. आपण आहोत त्यापेक्षा उच्च पदावर आहोत असे भासविणे किंवा प्रत्यक्षातील शक्यतेपेक्षा अधिक सुविधा देण्याचे आश्वासन देणे असेही घडते. अशावेळी स्त्रियांना त्याचा योग्य अंदाज बांधणे अवघड होते.

ह्या अंदाज बांधण्याच्या स्त्रियांच्या ज्ञानाची अखेर परीक्षाच असते. समजा एखादा मनुष्य उदार आहे पण चंचल मनोवृत्तीचा आहे, दुसरा विवेकी आहे पण चिक्कू आहे. स्त्रीने निवडावा तरी कोणता जोडीदार? ह्या प्रकारच्या निवडीत स्त्रीची मानसशास्त्रीय रचनाच तिच्या उपयोगी पडते. त्यामुळे ती अचूक अंदाज घेऊ शकते. एखादा जोडीदार निवडायचा की नाही किंवा त्याच्या कोणत्या गुणांना अधिक महत्त्व द्यायचे हे ह्या रचनेमुळेच ठरविले जाते. ही दैवी देणगी हीच माणसाचे साधन बनले आहे.

**आर्थिक क्षमता**

जो साधनसंपत्ती पुरवू शकतो त्या पुरुषाची निवड करण्याची स्त्रीची प्रवृत्ती ही प्राणी–जगतामधील फार पुरातन आणि चमत्कारिक अशी गोष्ट आहे. इस्त्राएलच्या निगेव्ह वाळवंटात राहाणाऱ्या करड्या रंगाच्या श्राइक पक्ष्याचे उदाहरण घेऊ या. विणीचा काळ सुरू होण्याआधी नर श्राइक पक्षी साप इ. खाण्याचे भक्ष्य आणि सुमारे शंभरएक पिसे, चिंध्या इत्यादी वस्तू गोळा करतो. त्यांच्या अधिकारकक्षेत येणाऱ्या जागेत काट्यांवर किंवा टोकदार जागी तो ह्या वस्तूंचे प्रदर्शन मांडतो.

उपलब्ध असलेल्या नर पक्षांमध्ये ज्याच्याजवळ जास्तीत जास्त वस्तू आहेत त्याला माद्या जवळ करतात. जीवशास्त्रज्ञ रुइस युसफ याने काही नरांनी जमवलेल्या वस्तूंमधल्या थोड्या वस्तू काढून टाकल्या आणि दुसऱ्या काहींच्या वस्तूत खाण्याच्या वस्तूंची भर घातली. लगेच माद्यांनी पहिल्या नराकडे पाठ फिरवली आणि ज्याच्याजवळ जास्तीत जास्त वस्तू आहेत

त्याच्याकडे मोर्चा वळवला. ज्याच्याजवळ काहीच नाही त्याच्याकडे माद्यांनी दुर्लक्षच केले आणि त्याला मादीच मिळाली नाही. जेव्हा जेव्हा मादी नराची निवड करते. तेव्हा नराची साधनसंपत्ती हेच निवडीचे मुख्य सूत्र ठरते.

मानवी जगात कायम स्वरूपी जोडीदार निवडताना स्त्रियांच्या तीन प्राथमिक अटी असतात. एक म्हणजे त्याच्याजवळची साधनसामुग्री सतत उपलब्ध असणारी, आधार वाटू शकणारी आणि उत्क्रान्तीच्या काळात मनुष्य जिच्यावर ताबा ठेवू शकेल अशी असायला हवी.

दुसरे म्हणजे प्रत्येकाजवळ वेगळ्या प्रकारची संपत्ती आणि ती स्त्रीला देऊ करण्याची वेगवेगळी इच्छाशक्ती असली पाहिजे. अन्यथा सगळ्यांजवळ सारखीच संपत्ती आणि सारखीच इच्छा असेल तर तिलाही निवड करण्याची गरज उरणार नाही. सातत्याने अस्तित्वात असणारे गुण ह्या निवडीच्या निकषांमध्ये येत नाहीत.

तिसरे म्हणजे एकाच माणसाला धरून राहाण्यात, अनेक माणसांबरोबर राहाण्यापेक्षा, अधिक फायदाही असायला हवा.

मानवी समाजात ह्या अटी सहज पुरविल्या जातात. प्रादेशिक सीमा आणि शस्त्रसामुग्री जगभरच मिळवली जाते, सांभाळली जाते, त्यावर ताबा ठेवला जातो, अधिकार चालवला जातो. श्रीमंतीच्या दृष्टीने पुरुषांमध्ये प्रचंड तफावत असते.– रस्त्यावरचा भिकारी, ट्रम्प्स (Trumps) ते रॉकफेलर्स ह्या धनाढ्यांपर्यंत विभागणी होते. कायमस्वरूपी नातेसंबंधासाठी हे पुरुष किती पैसा आणि वेळ देऊ इच्छितात ह्या मुद्यांवर ही विभागणी होते. अनेक स्त्रियांशी एकाच वेळी संबंध ठेवून त्यांना कमीत कमी साधने पुरवणारे पुरुषही असतात आणि एकाच स्त्रीला आणि तिच्या मुलांना सगळ्या सोईसुविधा पुरवणारेही पुरुष असतात.

विकासाच्या इतिहासात असे दिसून येते की तात्पुरत्या अनेक संबंधांपेक्षा स्त्रीला एकाच पुरुषाकडून अधिक सोईसुविधा मिळाल्या तर हव्या असतात. काही पुरुष स्त्रीला व तिच्या मुलांना इतकी भरपूर साधनसामुग्री उपलब्ध करून देतात की कुठल्याही उच्चवर्णीय प्राण्यांमध्ये तेवढी अपेक्षाच करता येत नाही. काही जातींमध्ये माद्यांना फक्त स्वकष्टार्जित वस्तूंवरच अवलंबून राहावे लागते. कारण बरचेदा नर आपल्या अन्नात मादीला वाटेकरी करून घेत नाहीत. ह्याच्याउलट पुरुष अन्नपाणी पुरवतात, निवारा देतात आणि आपल्या हद्दीचे, सीमारेषांचे रक्षणही करतात. पुरुष मुलांचेही संरक्षण करतात, ते मुलांना शिकार करण्याची विद्या शिकवतात, युद्धकौशल्य शिकवतात, समाजात प्रभाव पाडण्यासाठी कोणते डावपेच लढवायला हवेत ते शिकवतात. ते स्वत:चा सामाजिक दर्जा मुलाला बहाल करतात. त्यांनी पुढल्या आयुष्यात आपल्याला असेच वागवावे ह्या इच्छेने आपल्या बालबच्च्यांना मदत करतात. तात्पुरत्या लैंगिक संबंधातून स्त्रीला अशा प्रकारच्या तरतुदी मिळवता येत नाहीत. अगदी सगळेच नवरे ह्या सगळ्याच सुविधा देऊ शकतात असे नाही. पण काहीजण ह्यातल्या काही सुविधा देऊ शकतात आणि स्त्रिया त्यांची

निवड करण्याचा फायदा उठवू शकतात.

अशी परिस्थिती निर्माण होते की स्त्रिया ज्याच्याजवळ सगळ्यांपेक्षा अधिक काहीतरी आहे अशा पुरुषाची निवड करू शकतात. पुरुषाकडे असणाऱ्या अशा साधनांचे सूचन करणारी कळ स्त्रीला हवी असते. पुरुष प्रगतीच्या दिशेने वाटचाल करील की नाही अशा प्रकारच्या सूचना अगदी आडवळणाच्या असल्या तरी चालतील, पण स्त्रीला त्या हव्या असतात. उदा. त्या पुरुषाचे आरोग्य, त्याचे क्रीडापटुत्व. ह्या गोष्टीही स्त्री विचारात घेते. मनुष्याचे त्याच्या परिसरातल्या लोकांकडे काय वजन आहे, ह्यावरही स्त्री त्याची किंमत करते. अर्थात सधनता हा महत्त्वाचा गुण ठरतोच.

सध्याच्या काळात आपल्याला वाटणारी सापाची भीती, एखाद्या गोष्टीच्या उंचीची भीती ह्यावरून. आपल्याला पूर्वजांना भेडसावणाऱ्या संकटांची कल्पना येते. त्याचप्रमाणे जोडीदाराची निवड करण्याच्या स्त्रियांच्या सध्याच्या आवडीनिवडी आपल्याला भूतकाळाचा वेध घ्यायला उपयोगी पडतात. अभ्यासकांच्या डझनावरी कागदपत्रांवरून स्पष्टच होते की सध्याची अमेरिकन स्त्री सधनता फार महत्त्वाची मानते. पुरुष मात्र तितके महत्त्व या गोष्टीला देत नाहीत. उदाहरणार्थ– १९३९ मध्ये आयोजित केलेल्या एका अभ्यासपाहाणीत अमेरिकन स्त्रीपुरुषांनी अठरा प्रकारचे घटक अभ्यासून त्याना दर्जा दिला होता. जोडीदार निवडीमागचे हे निकष असंबद्ध ते अत्यावश्यक इतक्या भागात विभागलेले होते. आर्थिक सुबत्तेला स्त्रियांनी 'अत्यावश्यक' या गटात न घालता 'महत्त्वाचा' या गटात घातले होते. पुरुषांनी ही गोष्ट 'असावी' असे मानले होते. पण ती 'महत्त्वाची' मानली नव्हती. १९३९ मध्ये पुरुषांपेक्षा दुप्पट स्त्रियांनी सधनतेला महत्त्व दिले होते. १९५६ मध्ये आणि १९६७ मध्ये हीच परिस्थिती आढळली.

१९६०च्या दशकात शेवटीशेवटी आणि १९७०च्या दशकात सुरुवाती सुरुवातीलाच झालेली लैंगिक उलथापालथ वरील विवेचनात फारसा फरक पाडू शकली नाही. १९८०च्या दशकाच्या मध्यावर १४९१ अमेरिकन लोकांना पूर्वीचीच प्रश्नमालिका देण्यात आली. मॅसच्युसेटस् , मिशिगन, टेक्सास आणि कॅलिफोर्निया ह्या विभागातल्या ह्या लोकांनी जोडीदार निवडण्यासंबंधी १८ घटकांना दर्जा दिला. पूर्वीच्याच दशकांप्रमाणे ह्यावेळीही स्त्रियांनी पुरुषाच्या दुप्पट संख्येने आर्थिक सुबत्ता महत्त्वाची मानली.

अनेक संदर्भात स्त्रियांनी आर्थिक क्षमतेला दिलेले महत्त्व उघड झाले आहे. डग्लस केनरिक ह्या मानसशास्त्रज्ञाने व त्याच्या सहकाऱ्यांनी विवाहाच्या संदर्भात लोक कोणत्या गोष्टी महत्त्वाच्या मानतात ह्याचा अभ्यास करण्यासाठी एक उपयुक्त पद्धत शोधून काढली आहे. जोडीदाराच्या निवडीच्या संदर्भात प्रत्येक वैशिष्ट्यपूर्ण घटकाला ते कमीतकमी कोणत्या स्थानावर (पर्सेंटा-इलवर) ठेऊ शकतात म्हणजेच इतरांच्या तुलनेत आपला जोडीदार कोणत्या स्थानावर कमीतकमी असला पाहिजे हे नमूद करायला ह्या स्त्री पुरुषांना सांगण्यात आले. ही पर्सेंटाइल पद्धत पुढील

उदाहरणाने स्पष्ट होईल. ५०व्या स्थानावर असलेला मनुष्य त्या गटातल्या इतर ५० टक्के लोकांच्या आर्थिकदृष्ट्या वर असेल आणि उरलेल्या ४९ टक्के लोकांच्या खाली असेल. अमेरिकेतल्या कॉलेजयुवती आपल्या नवऱ्याला ७०व्या पर्सेंटाइलवर ठेवतात. उलट स्त्रीच्या कमाईबाबत पुरुष ४०व्या पर्सेंटाइलवर तडजोडीला तयार आहेत. याचाच अर्थ स्त्रीला आपल्या नवऱ्याच्या तुलनेत आर्थिकदृष्ट्या फक्त ३० पुरुष वरचढ चालतील पण पुरुषांना मात्र स्त्रीच्या तुलनेत इतर ६०स्त्रिया वरचढ असल्या तरी चालतील.

लग्नाला उभ्या राहिलेल्या ह्या स्त्रियांना आर्थिक सधनता हवी आहे हे वृत्तपत्रातल्या आणि मासिकातल्या जाहिरातींवरून निश्चित होते. १९११ वैयक्तिक जाहिराती अभ्यासल्या तर पुरुषांपेक्षा अकरा पटीने अधिक स्त्रियांनी आर्थिक सुबत्तेची अपेक्षा धरलेली होती. थोडक्यात स्त्रीपुरुषांमधला हा फरक कॉलेज विद्यार्थ्यांपुरताच मर्यादित नाही आणि प्रश्नावली कितीही वेगळ्या प्रकारची असली तरी उत्तर एकच !

सुबत्तेला प्राधान्य देण्याची पद्धत फक्त अमेरिकेपुरतीच मर्यादित नाही. अमेरिका असो, पाश्चिमात्य समाज असो की भांडवलदार देश असोत सगळीकडे ती सारखीच आहे. डेव्हिड बूस व त्याच्या सहकाऱ्यांनी आयोजित केलेला 'आंतरराष्ट्रीय अभ्यास', जोडीदार शोधण्याच्या स्त्रियांच्या वैश्विक वृत्तीची नोंद घेतो. १९८४ ते १९८९ या पाच वर्षांहून अधिक मोठ्या कालखंडात, पाच बेटे आणि सहा उपखंडांमधील सदतीस संस्कृतींमधल्या सांस्कृतिक आणि जन्ममृत्यूसंबंधातल्या लोकसंख्येच्या वैशिष्ट्यांचा त्यांनी अभ्यास केला. ह्यात सहभागी होणारे लोक नायजेरिया आणि झांबिया या बहुपत्निकत्व पाळणाऱ्या देशातून, तसेच ज्या देशात एकपत्नीव्रत कसोशीने पाळले जाते अशा स्पेन आणि कॅनडा ह्यासारख्या देशातून निवडलेले होते. ज्या देशात विवाहाशिवाय एकत्र राहाणे हे विवाहाइतकेच सर्वसंमत आहे अशा स्वीडन आणि फिनलंडसारख्या देशातून ते घेतलेले होते आणि विवाहबाह्य संबंधांकडे जिथे भुवया वक्र करून पाहिले जाते अशा बल्गेरिया आणि ग्रीस अशा देशातूनही त्यांना निवडलेले होते. सगळे मिळून १००४७ नमुने ह्यावेळी अभ्यासले गेले.

ह्या अभ्यासात स्त्रीपुरुषांनी जोडीदार किंवा विवाहसोबती म्हणून निवड करताना आवश्यक वाटणाऱ्या अठरा गुणवैशिष्ट्यांची वर्गवारी केली. त्यांना दर्जा दिला. हा दर्जा बिनमहत्त्वाचा ते अतिमहत्त्वाचा एवढ्या टोकांमध्ये विभागलेला होता. सगळ्या प्रकारच्या गटातल्या स्त्रिया – सगळ्या खंडातल्या, सगळ्या राजकीय प्रणालींमधल्या (समाजवाद आणि साम्यवादासह) सगळ्या जातीवंशाच्या गटांमधल्या, सगळ्या धार्मिक गटांमधल्या आणि सगळ्याप्रकारचे जोडीदार असणाऱ्या (बहुपत्नीकत्व ते तथाकथित एकपत्नीव्रतवाले) – ह्या सगळ्यांनी एकमुखाने, पुरुषांपेक्षा स्त्रियांनी अधिक पटीने, सधनतेचा पाठपुरावा केला आहे. थोडक्यात स्त्रिया अगदी १०० टक्के अधिक किंवा पुरुषांपेक्षा दुप्पटीने ह्या गोष्टीची मागणी करतात. काही सांस्कृतिक

फरकही आहेत. नायजेरिया, झांबिया, भारत, इंडोनेशिया, इराण, जपान, तैवान, कोलंबिया आणि व्हेनेझुएला इथल्या स्त्रिया इतर देशातल्या स्त्रियांपेक्षा सुबत्तेला अधिक महत्त्व देतात. उदा. दक्षिण आफ्रिका (झुलू), निदरलँड्स, फिनलँड येथील स्त्रिया. जपानमधल्या स्त्रिया पुरुषांपेक्षा १५० टक्के अधिक महत्त्व सधनतेला देतात. तर निदरलँडमधल्या स्त्रिया आपल्या पुरुष सहकाऱ्यांपेक्षा फक्त ३६ टक्के अधिक महत्त्व देतात. हे प्रमाण इतर कोणत्याही देशातल्या स्त्रियांपेक्षा कमी आहे. तरीसुद्धा निवडीच्या बाबतीत स्त्रीपुरुष भेद निर्विवादपणे अचलच राहातो– जगभरच्या स्त्रिया आर्थिक ताकद ही पुरुषांपेक्षा अधिक महत्त्वाची मानतात.

सगळ्या संस्कृतींमधले मानवी सहजीवनाच्या मानसशास्त्रीय उत्क्रान्तीच्या पायाला पाठिंबा देणारे विस्तृत पुरावे ह्या अभ्यासपूर्ण निष्कर्षांमुळे प्रथमच आपल्याला मिळतात. पूर्वजस्त्रियांनी गर्भसंभव, गर्भधारणेचा नऊ महिन्यांचा काळ, स्तनपानांचा काळ ह्या गोष्टींचा भरपूर भार वाहिला. त्यामुळे ज्याच्याजवळ साधनसामुग्रीची रेलचेल आहे अशा पुरुषाची निवड करणे त्यांना सोईचे होते. ह्या निवडीमुळे त्या स्त्रियांना अस्तित्व टिकवून धरणे आणि पुनरुत्पादन हे प्रश्न सोडविणे सोपे होते.

**सामाजिक प्रतिष्ठा**

पूर्वी काय परिस्थिती होती ह्याचा अभ्यास करण्यासाठी आपल्याला ज्या अगदी जवळच्या वाटतात त्या पारंपारिक शिकारी टोळ्यांमुळे (Huntergatherer) असे लक्षात येते की पूर्वजांनी सामाजिक दर्जाची उतरंड स्पष्ट केलेली होती. वरच्या टोकाला असलेल्या – जवळ मुबलक साधनसंपत्ती आणि तळागाळातल्यापाशी अगदीच दुर्भिक्ष्य अशी ही विभागणी होती. ज्या पारंपारिक जुन्या टोळ्या आहेत त्यांच्यामध्ये अजूनही 'मुख्य माणसे' किंवा 'मोठी माणसे' असे ज्यांना म्हणतात ते लोक सत्ता आणि संपत्तीचा फायदा उठवतात. ह्या टोळ्या अशा – दक्षिण ऑस्ट्रेलियाच्या किनाऱ्यापासून दूरवर असलेल्या दोन छोट्या बेटात राहाणारे तिवी नावाचे मूळचे लोक, व्हेनेझुएलाचे यानोमामो, परॉग्वेचे अेक (Ache) आणि बोटसवानाची कुंग जमात. ह्या जमातीतल्या पुरुषाच्या सामाजिक दर्जावरूनच त्याच्याजवळ किती साधनसंपत्ती असेल ह्याचा अंदाज बांधता येतो.

हेन्री किसिंजर एकदा म्हणाले होते की, सत्ता हे सगळ्यात मोठे आकर्षण असते. जो पुरुष महत्त्वाच्या सत्तास्थानी असतो त्याच्याकडे स्त्रिया आकर्षिल्या जातात. कारण शेवटी ज्याच्या हाती सत्ता असते त्याच्याच हाती साधनसंपत्ती असते हा खरा त्यामागचा कळीचा मुद्दा आहे. सामाजिक दर्जा पाठोपाठ उत्तम अन्न, भरपूर निवाऱ्याची जागा आणि आरोग्यरक्षणाची उत्कृष्ट साधने मिळतात. सत्तास्थानावरील पुरुषांच्या मुलांना समाजात महत्त्व मिळते. खालच्या दर्जाच्या पुरुषामुळे हे महत्त्व मुलांना मिळू शकत नाही. जगभरच असे दिसून येते की थोरांच्या मुलांना जोडीदार शोधण्याची अधिक संधी मिळते. उच्च दर्जाचे सहचर नेहमीच उच्च दर्जाच्या

कुटुंबामधूनच मिळत असतात. आफ्रिकेतल्या मुब्ती पिग्मीच (Mbuti) पासून अल्यूट एस्किमोज (Aleut) पर्यंत केलेल्या १८६ समाजांच्या एका अभ्यासपाहाणीत असे लक्षात आले आहे की उच्च दर्जाच्या पुरुषांजवळ अधिक संपत्ती असते, मुलांकरिता पोषक अन्न असते आणि त्यांना अधिक बायकाही असतात.

आर्थिक सुबत्तेपेक्षा किंचित खालच्या पातळीवर मानल्या गेलेल्या उच्च सामिजक दर्जाच्या बावतीत असे आढळून आले आहे की अमेरिकन स्त्रिया उच्च सामाजिक दर्जाला किंवा उच्च दर्जाच्या व्यवसायिकांना प्राधान्य देतात. एवढेच नव्हे तर ते उघडउघड सांगायला कचरत नाहीत. मॅसॅच्युसेट्स, मिशिगन, टेक्सास आणि कॅलिफोर्निया इतक्या विविध भागातल्या स्त्रिया असंबद्ध किंवा बिनमहत्त्वाचा ते अत्यावश्यक इतक्या श्रेणीमालिकांपैकी सामाजिक दर्जाला 'महत्त्वाचा ते अत्यावश्यक' एवढ्या श्रेणींमध्ये स्थान देतात. याउलट पुरुष सामाजिक दर्जा हवा असे म्हणतात पण फार महत्त्वाचा मानीत नाहीत. ५००० कॉलेज विद्यार्थ्यांच्या एका अभ्यासपाहाणीत विद्यार्थिनींनी सामाजिक दर्जा, मोठेपणा, स्थान, परिस्थिती, सत्ता, नावलौकिक, जागा आणि उच्च स्थान ह्यांना विद्यार्थ्यांपेक्षा अधिकवेळा अधिक महत्त्वाचे स्थान दिले आहे.

डेव्हिड बूस आणि डेव्हिड श्मिट ह्या दोघांनी मिळून तात्पुरत्या आणि कायमस्वरूपी लैंगिक संबंधांसंबंधी अभ्यासपाहाणी केली होती. त्यांना हे जाणून घ्यायचे होते की लोक तात्पुरत्या संबंधात आणि कायमच्या जोडीदारात कोणता गुणात्मक फरक करतात, कशाला विशेष प्राधान्य देतात. मिशिगन विद्यापीठीतील विद्यार्थी – विद्यार्थिनी या अभ्यासात सहभागी झाले होते. ह्या विद्यापीठात तात्पुरते संबंध आणि वैवाहिक संबंध अगदी भरपूर प्रमाणात प्रचलित होते. शेकडो व्यक्तींनी दोन्ही प्रकारच्या संबंधांसाठी आवश्यक वाटणाऱ्या सदुसष्ट गुणांची / घटकांची श्रेणी नोंदवली होती. व्यवसायातल्या यशाची शक्यता आणि उत्तम दर्जाचा होतकरू उमेदवार ह्या गोष्टी नवऱ्यासाठी म्हणून विद्यार्थिनींना महत्त्वाच्या वाटतात. त्यामुळे तात्पुरत्या संबंधांपेक्षा विद्यार्थिनी नवरा शोधताना वरील गोष्टींना महत्त्व देतात.

अमेरिकन स्त्रिया शिक्षण आणि औद्योगिक पदवीला अधिक महत्त्व देतात – हे गुण म्हणजेच एक प्रकारे सामाजिक दर्जाशी निगडित असलेले गुण ! ह्याच अभ्यासात असे निदर्शनास आले आहे की स्त्रियांनी अशिक्षित पुरुषाला नवरा म्हणून नाकारले आहे. स्त्रिया डॉक्टर्स, वकील, प्राध्यापक आणि इतर व्यावसायिक ह्यांच्याशी विवाह करणे पसंत करतात ही जुनीच गोष्ट सत्याशी जवळची आहे. ज्या पुरुषावर इतर पुरुष दादागिरी करू शकतात किंवा ज्याला आपल्या गटामध्ये आदराचे स्थान मिळवता येत नाही अशा पुरुषालाही स्त्रिया सरळसरळ टाळतात.

दैनंदिन घडामोडींमध्ये सुद्धा स्त्रियांचा दर्जासंबंधीचा आग्रह दिसून येतो. डेव्हिड बूसच्या एका सहकाऱ्याच्या कानावर एका उपाहारगृहात चाललेले चौघींचे बोलणे पडले. त्या म्हणत होत्या की त्यांच्या आजूबाजूला योग्य पुरुषांची वानवा आहे. त्या स्त्रियांच्याभोवती सगळेच

पुरुषवेटर्स होते आणि त्यापैकी एकाच्याही बोटात विवाहसूचक अंगठी नव्हती. (थोडक्यात ते अविवाहित होते. ) ज्याचा व्यवसाय उच्च दर्जाचा नाही अशा वेटर्सचा या संदर्भात विचार करण्याचेही त्या स्त्रियांना कारण नव्हते. त्यांच्या म्हणण्याचा रोख असा होता की इथे योग्य पुरुषाची वानवा आहे असे नव्हे पण त्यांना स्वीकारावेसे वाटतील अशा सामाजिक दर्जाचे ते पुरुष नव्हते.

उपवर स्त्रिया हा सुयोग्य वर शोधित असतात. योग्य वर ह्या शब्दाचा अर्थ ह्या ठिकाणी 'जो दुसरीकडे आधीच बांधला गेला नाही असा.' स्त्रियांना 'योग्य अविवाहित' पुरुष हवा आहे यातच त्यांच्या मागणीचे स्वरूप लक्षात येते. जेव्हा स्त्रिया ह्या शब्दांमागे एक विशेषण जोडतात तेव्हा तो 'सगळ्यात योग्य अविवाहित' बनतो. आणि हा संदर्भ पुरुषाच्या 'उपवधू'पणाविषयी नसतो, तर त्याच्या सामाजिक दर्जाविषयी असतो, त्याच्याजवळ किती साधनसामुग्री आहे ह्याविषयी असतो. हे गोड गोड बोलणे आहे पण हेतू तोच आहे – उच्च सामाजिक स्थान, भरपूर साधनसंपत्ती आणि अजूनही एकटा असलेला वर हाच त्या 'योग्य' शब्दामागे अर्थ असतो.

सामाजिक स्थानाला स्त्रिया देत असलेले महत्त्व ही गोष्ट फक्त अमेरिकेपुरती मर्यादित नाही, भांडवलशाही राष्ट्रांपुरतीही नाही. सदतीस संस्कृतींचा जो विस्तृत असा आंतरराष्ट्रीय अभ्यास त्यांनी केला त्या बहुतांश स्त्रिया ह्या जोडीदाराच्या सामाजिक दर्जाला पुरुषांपेक्षा अधिक महत्त्व देतात. साम्यवादी देशात आणि समाजवादी देशात, आफ्रिकन आणि पौर्वात्यांमध्ये, कॅथालिकांमध्ये आणि ज्यूंमध्ये, ऊष्णकटिबंधातील प्रदेशांत आणि उत्तरेकडच्या हवामानात, सगळीकडे हेच दिसून आले. उदा. तैवानमध्ये पुरुषांपेक्षा ६३ टक्के अधिक स्त्रियांनी 'सामाजिक स्थानाला' महत्त्व दिले, तर झांबियामध्ये ३० टक्के स्त्रियांनी ! पश्चिम जर्मनीत ३८ टक्के स्त्रियांनी अधिक आणि ब्राझीलमध्ये ४० टक्के अधिक स्त्रियांनी सामाजिक स्थानाला महत्त्व दिले.

मानवी समूहांमध्ये सगळ्या जगभर अधिकारांची उतरंड आढळते. जो सर्वश्रेष्ठ तो अधिक धनसंपत्तीचा मालक होतो. उच्च श्रेणीतल्या पुरुषांशी लग्न केल्यामुळे स्त्रियांचा साधनसंपत्ती मिळवण्याचा मार्ग सुलभ होतो. ज्याच्याजवळ भरपूर सुविधा आहेत तो तिच्यासाठी आणि तिच्या मुलाबाळांसाठी भरपूर खर्च करील असा अंदाज स्त्रियांना बांधता येतो. साधनसंपत्तीचा ताबा मिळवण्यासाठी स्त्रियांना हा कळीचा मुद्दा वाटतो असा पुरावा सगळ्या समकालीन संस्कृती देत असतात.

सगळ्या जगभरच्या स्त्रिया लग्न करताना स्वत:पेक्षा उच्च प्रतीचा नवरा शोधतात. विकासाच्या काळात ज्या स्त्रिया वरीलप्रमाणे विवाह करू शकल्या नाहीत त्या स्वत:साठी आणि मुलांसाठी पुरेसे मिळवायला असमर्थ ठरल्या.

**वय**

माणसाच्या वयावरून त्याच्याजवळ असणाऱ्या साधनसंपत्तीचा अंदाज बांधता येतो. बबून वानराच्या पिलाला वरच्या सामाजिक स्तरावर पोचण्यासाठी एका विशिष्ट समज यावी लागते. मानवी जगतातही अनुभवसमृद्ध वयस्कर माणसापेक्षा कुमार वयातील मुलाला आणि तरुणाला आदर, दर्जा किंवा उच्च स्तर यांचा लाभ क्वचितच होतो.

तिवी जमातीत ही वृत्ती टोकाला पोचलेली आहे. इथे वृद्धमंडळी स्वत:च्या संघटित एकोप्याच्या साहाय्याने सत्ता आणि महत्त्व राबवतात आणि सहचर निवडण्याच्या क्रियेवर तावा ठेवतात. अमेरिकतही वाढत्या वयाबरोबर उच्च स्तर मिळतो आणि संपत्ती जमा होऊ लागते.

आंतरराष्ट्रीय पाहाणीतल्या सगळ्या सदतीस संस्कृतींमधल्या स्त्रिया स्वत:पेक्षा वयाने मोठा असलेला पुरुष प्राधान्याने निवडतात. सगळ्या संस्कृतींची सरासरी काढली तर साधारणपणे साडेतीन वर्षांनी मोठा असलेला पुरुष त्यांना मान्य असतो. सगळ्यात वयाचा कमी फरक सापडतो तो फ्रेंच कॅनेडिअन स्त्रियांमध्ये ! त्या जेमतेम दोन महिन्यांनी मोठा असलेला नवरा पत्करतात. तर सगळ्यात जास्त फरक इराणी स्त्रियांमध्ये. त्या पाच वर्षांहून अधिक मोठा असलेला नवरा पत्करतात. वधूवरांचा विवाहाच्या वेळचा वयातला सरासरी जागतिक फरक तीन वर्षांचा आहे. स्त्रियांच्या निवडीच्या प्राधान्य घटकाशी त्यांचा प्रत्यक्ष विवाहनिर्णय तंतोतंत जुळतो हे ह्यावरून सिद्ध होते.

स्त्रिया वयाने मोठा नवरा का निवडतात ह्यामागे वयाबरोबर पडणारे फरक हे कारण आहे. एक सुसंगत वाटणारे कारण म्हणजे वाढत्या वयाबरोबर पुरुषाला साधनसंपत्तीच्या दिशा सापडतात. सध्याच्या सगळ्या पाश्चिमात्य समाजात सामान्यत: उत्पन्न हे वयाबरोबर वाढत असते. वीस वर्षाच्या अमेरिकन तरुणापेक्षा तीस वर्षाच्या पुरुषाला चौदा हजार डॉलर्स जास्त मिळतात, तीस वर्षाच्या पुरुषापेक्षा चाळीस वर्षाच्या पुरुषाला सात हजार डॉलर्स जास्त मिळतात. हा कल फक्त पाश्चिमात्य जगापुरता मर्यादित नाही. परंपरावादी सनातनी समाजातसुद्धा वाढत्या वयाबरोबर माणसांना अधिक मान मिळत जातो. तिवी जमातींमध्ये पहिली बायको मिळवण्याकरता लागणारा सामाजिक दर्जा मिळवीपर्यंत पुरुष कमीतकमी तीस वर्षाचा होतो. एकापेक्षा अधिक बायका करण्यासाठी लागणारा सामाजिक दर्जा ४०व्या वर्षापूर्वी मिळवणे अगदी क्वचितच एखाद्याला जमू शकते. सगळ्याच संस्कृतींमध्ये वाढते वय, साधनसंपत्ती आणि दर्जा ही एकत्रच असतात.

पारंपारिक समाजात वरील घटकांशी कदाचित आणखी दोन घटक जुळू शकतील. शरीरबळ आणि शिकारकौशल्य. वाढत्या वयाबरोबर पुरुषाची ताकद वाढत जाते आणि साधारण विशी ते तिशीच्या दरम्यान माणसाचे शारीरिक बळ सर्वात अधिक असते. वयाचा आणि शिकार-कौशल्याचा नातेसंबंध हा पद्धतशीरपणे अभ्यासला गेलेला नाही पण तरीही मानवशास्त्राचे

(anthropologist) अभ्यासक मानतात की तिसाव्या वर्षी माणसाची शारीरिक क्षमता कमी व्हायला लागली तरी ज्ञान, धीर, कौशल्य आणि शहाणपणा ह्यांच्यामुळे शिकार – कौशल्य तिसाव्या वर्षी सर्वाधिक असते. स्वाभाविकच आमच्या भटक्या पूर्वजांपासून आलेल्या गुणांमुळे स्त्रिया वयाने अधिक असलेला पुरुष निवडतात, कारण त्याकाळी शिकार हेच महत्त्वाचे जगण्याचे साधन होते.

स्त्रिया मोठ्या वयाचा पुरुष निवडतात ह्यामागे डोळ्यांना दिसणाऱ्या साधनसामुग्रीपेक्षा वेगळे कारण असते. ही माणसे साधनांचा पुरवठा करण्याच्या बाबतीत अधिक समज असणारी, अधिक स्थिर वृत्तीची आणि अधिक विश्वसनीय असतात. वय वाढेल तसतसे, तिशीच्या आसपास, अमेरिकेतील पुरुष भावनिक दृष्ट्या अधिक स्थिर, अधिक सावध आणि अधिक विश्वसनीय बनतात. एका स्त्रीने ह्या पाहाणीत असे नोंदवले आहे की वयाने मोठे पुरुष चांगले वाटतात कारण त्यांच्याशी तुम्ही गांभिर्याने बोलू शकता, उलट तरुण पुरुष अगदीच मूर्ख असतात आणि आयुष्य गांभिर्याने घ्यायला तयार नसतात. पुरुषांमध्ये वयाबरोबर 'स्तर' हे वैशिष्ट्य स्पष्ट होत जाते. ज्या स्त्रिया वयाने मोठ्या पुरुषाबरोबर लग्न करतात त्याना तो किती वरच्या दर्जाला जाऊ शकेल याचा अंदाज येऊ शकतो.

आंतरराष्ट्रीय अभ्यासपाहाणीत सगळ्याच सदतीस संस्कृतींमधल्या वीस वर्षाच्या तरुणी त्यांच्यापेक्षा थोड्याच मोठ्या पुरुषांशी लग्न करणे पसंत करतात. पुरेसे वय वाढत्याखेरीज म्हणजे ४०/६०च्या वयापर्यंत पुरुष उत्पन्नाची कमाल मर्यादा गाठू शकत नाही हे ठाऊक असूनही त्यांना इतक्या मोठ्या माणसांशी लग्न करणे आवडले नाही. ह्याचे आणखी एक कारण म्हणजे मोठ्या वयाच्या माणसाच्या बाबतीत मृत्यूचा धोका अधिक असतो. त्याचा अर्थ असा की मुलांच्या संगोपनासाठी मदत द्यायला तो कदाचित अस्तित्वातच असणार नाही. वाढत्या वयाबरोबर एकत्र राहाण्याची क्षमता कमी अधिक होऊन भांडणतंटा होऊ शकेल आणि त्याचे पर्यवसान घटस्फोटामध्ये होऊ शकेल. ह्या सगळ्या कारणांनी स्त्रिया कमी वयाच्या पण त्याचमुळे ज्यांना भविष्यकाळ आहे. अशा पुरुषांबरोबर लग्न करतात आणि उत्तम परिस्थिती असूनही भविष्याची शाश्वती नसलेल्या पुरुषांना नाकारतात.

अर्थात सगळ्याच स्त्रिया म्हाताऱ्यांची निवड करीत नाहीत. काहीजणी तरुणांचीही निवड करतात. चीनच्या एका खेड्याच्या पाहाणीत असे आढळून आले आहे की सतरा अठरा वर्षाच्या स्त्रियांनी फक्त चौदा पंधरा वर्षाच्या पुरुषांशी विवाह केलेला आहे. इथे महत्त्वाची गोष्ट ही की हे सगळे पुरुष धनवान कुटुंबातील आहेत. ती कुटुंबे सामाजिक प्रतिष्ठा असलेली आहेत आणि त्यांच्यामागे परंपरा असल्यामुळे ते आयुष्यात यशस्वी होतीलच याची खात्रीही मिळते. सामाजिक स्थान आणि साधनसंपत्ती मिळवण्याचे दुसरे मार्ग उपलब्ध असतील आणि उपजीविकेची साधने मिळवण्याची अगदी खात्री असेल तर मोठ्या पुरुषाशीच लग्न करण्याचा नियम डावलला जातो.

स्त्रियांची जेव्हा त्यांच्यापेक्षा बऱ्याच लहान वयाच्या पुरुषांशी गाठ पडते तेव्हा वय सोडून इतर गोष्टी विचारात घेतल्या जातात. बऱ्याचदा हे घडण्याची कारणे वेगळीच असतात. स्त्रियांना त्यांच्यापेक्षा वयाने मोठे आणि योग्य पुरुष मिळवता येत नाहीत आणि तरुण पुरुषांना त्यांच्यापेक्षा लहान स्त्रिया मिळवता येत नाहीत असे घडते. उच्च सामाजिक स्तरांमधले पुरुष वय वाढलेल्या स्त्रियांकडे ओढले जात नाहीत. स्वाभाविकच ज्यांच्याजवळ साधनसामुग्रीची कमतरता आहे आणि त्यामुळे ज्याची उपवधू म्हणून किंमत वाढलेली नाही अशा तरुण मुलांशी ह्या स्त्रिया विवाह करतात. तिवी समाजात तरुण पुरुषाची पहिली पत्नी नेहमीच त्याच्यापेक्षा बरीच मोठी असते. याचे कारण असे असते की त्याच्या त्यावेळच्या सामाजिक स्तरानुसार फक्त वयस्कर स्त्रीच त्याला उपलब्ध होऊ शकते.

आणखी एकदा अपवाद घडतो. काही तरुण स्त्रियांजवळ स्वत:ची मालमत्ता भरपूर असते, त्यांना सामाजिक स्थानही असते आणि तरीही त्या आपल्यापेक्षा तरुण माणसाला पसंत करतात. चेर (Cher) आणि जोन कॉलीन्स ही दोन प्रसिद्ध उदाहरणे. त्या त्यांच्यापेक्षा जवळजवळ दोन दशके मोठ्या असलेल्या पुरुषांमध्ये गुंतल्या. अर्थात ह्या घटना दुर्मिळच आहेत. स्वत:जवळ भरपूर साधनसामुग्री आणि उच्च सामाजिक स्तर असलेल्या ह्या स्त्रिया विवाह करताना कमीतकमी तेवढ्या दर्जाचा पुरुष शोधतातच, शक्य असेल तर स्वत:पेक्षा उजवा ! तरुण पुरुषांशी तात्पुरता संबंध स्त्रिया ठेवीतही असतील पण विवाहाची वेळ येते तेव्हा आपल्यापेक्षा मोठाच पुरुष पसंत करतात. चेर किंवा जोन कॉलिन्सचे तरुण माणसांशी असलेले संबंध फारसे टिकले नाहीत असेच आढळून आलेले आहे.

हे सगळे कळीचे मुद्दे – आर्थिक सुबत्ता, सामाजिक दर्जा आणि मोठे वय – एकाच गोष्टीकडे नेतात – स्त्रीला त्या दोघांसाठी आणि त्यांच्या मुलाबाळांसाठी साधनसंपत्ती उपलब्ध करून द्यायला पुरुष कितपत समर्थ आहे. विकासाचा इतिहास सांगतो की स्त्रियांनी निवड करताना पुरुषांकडे फक्त यशस्वी होण्यासाठी लागणारे साधन म्हणून पाहाण्याची पद्धत पडली आहे. पण फक्त साधनसामुग्री असणे पुरेसे नाही, भविष्यकाळात ही साधने मिळवण्याची शक्यता असण्याची चिन्हेही स्त्रियांना आवश्यक वाटतात.

ज्या समाजात लोक लवकर लग्ने करतात त्या समाजात पुरुषाचे आर्थिक बळ हे त्याच्या व्यक्तिगत कमाईवर मोजले जात नाही. ते अप्रत्यक्ष उत्पन्न असते. जिथे पैसा हे विनिमयाचे साधन नव्हते अशा भटक्या जमातींमध्ये ह्या निवडीचे माध्यम दरडोई उत्पन्न असे असू शकत नव्हते. उदाहरणार्थ – तिवी जमातींमध्ये स्त्रिया आणि वृद्ध पुरुष तरुणांची परीक्षा करतात. ह्यातला होतकरू कोण, कोणाला सामाजिक दर्जा आणि संपत्ती मिळवता येईल आणि कोण मागे पडेल हे त्यांच्या व्यक्तिमत्वावरून ठरवले जाते. त्यांची पुढे येण्याची ताकद, शिकारकौशल्य, युद्धकौशल्य आणि जमातीची सत्ता आणि प्रभाव सांभाळण्याची हिंमत ह्यावरून त्यांची किंमत

केली जाते. सगळ्या संस्कृतींमधल्या स्त्रिया भूतकालीन आणि सद्यस्थितीतल्या पुरुषाच्या सध्याच्या कुवतीवरून तो पुढे काय करील ह्याचा अंदाज घेऊन पुरुषाची निवड करीत होत्या, आत्ता करीत आहेत. ज्या स्त्रिया हे मुद्दे लक्षात घेऊन निवड करतात, त्या स्त्रिया ह्या गोष्टींकडे दुर्लक्ष करणाऱ्या स्त्रियांपेक्षा अधिक सुस्थितीत राहातात.

**महत्त्वाकांक्षा आणि उद्योजकता**

लिझा काइल-हेनर आणि डेव्हिड बूस ह्यांनी मिळून दैनंदिन जीवनातील घडामोडींविषयी एक पाहाणी आयोजित केली होती. अस्तित्वात असलेल्या श्रेणीपद्धतीत आहे त्या स्थानापासून वर जाण्यासाठी – कामाच्या जागी आणि समाजातही – कोणत्या वेगवेगळ्या युक्त्या – प्रयुक्त्या लोक वापरतात ह्याचा शोध घेणे हे त्यांचे उद्दिष्ट होते. कॅलिफोर्निया आणि मिशिगन मधल्या ८४ व्यक्तींना ती दोघे भेटली आणि ज्या व्यक्तींना ते चांगले ओळखतात अशा व्यक्तींबद्दल विचार करा असे त्यांनी त्यांना सांगितले. नंतर ह्या लोकांनी समाजातील स्थान आणि सत्ता ह्यांच्या श्रेणींमध्ये वरवर चढण्यासाठी ज्या गोष्टी केल्या असे तुम्हाला वाटते त्या तुम्ही लिहून काढा असेही त्यांना सांगितले. वेगवेगळ्या सांख्यिकी पद्धती वापरून त्यांनी सव्वीस वेगवेगळ्या युक्त्या शोधून काढल्या – फसवणूक, सामाजिक संबंध, लैंगिक फायदा, शिक्षण, उद्योजकता ह्या त्यापैकी काही. उद्योजकता म्हणजे कामासाठी अधिक वेळ देणे व अधिक प्रयत्न करणे, वेळ कौशल्याने वापरणे, ध्येयपूर्तीला प्राधान्य देणे आणि दुसऱ्यांवर छाप पाडण्यासाठी खूप काम करणे. नंतर त्यांनी १५ ते २० वयोगटाच्या २१२ व्यक्तींना असा प्रश्न विचारला की ते ह्याप्रकारे पुढे जाण्यासाठी कोणत्या युक्त्या वापरतात. त्याचवेळी त्यांच्या सहचरांनाही त्यांनी विचारले की त्यांचे सहचर पुढे जाण्यासाठी कोणत्या युक्त्या वापरतात. ही माहिती गोळा केल्यावर त्यांनी त्या गटाच्या पूर्वीच्या उत्पन्नाशी आणि बढत्यांशी त्यांच्या अपेक्षित उत्पन्नाची आणि बढत्यांची सांगड घातली. त्यांना हे पाहायचे होते की पुढे जाण्यासाठी वापरलेल्या कोणत्या युक्त्या खरोखरीच यशस्वी झालेल्या आढळल्या.

भूतकाळी आणि भविष्यातही उत्पन्न आणि वाढ ह्या दृष्टीने 'अथक परिश्रम' हाच सगळ्यात उत्तम पर्याय ठरला. ज्यांनी म्हटले की आम्ही खूप परिश्रम केले, ज्यांच्या जोडीदारानेही ते मान्य केले, अशा लोकांना उच्च शिक्षण मिळाले, अधिक वार्षिक तनखा मिळाला, आणि अपेक्षित मोठे पगार आणि बढत्या मिळत गेल्या. मात्र ज्यांनी हे कष्ट केले नाहीत त्यांना याबाबतीत अपयश आले. आळशी, निरुत्साही लोकांपेक्षा उद्योगी आणि महत्त्वाकांक्षी माणसांना उद्योगधंद्यात वरच्या जागा मिळाल्या.

अमेरिकन स्त्रियांना ह्या गोष्टीची जाणीव असावी असे वाटते, कारण त्या इतर गुणांबरोबर ज्याला प्रगती करण्याची इच्छा आहे त्याला अधिक प्राधान्य देतात. उदा. १९५० मध्ये आपल्या जोडीदारामध्ये कोणते गुण असावेत ह्याची यादी करायला ५००० पदवीपूर्व विद्यार्थ्यांना



अनुक्रमणिका

सांगण्यात आले होते. ज्यांना स्वत:च्या उद्योगात गोडी आहे, आपली प्रगती व्हावी, बढती मिळावी असे वाटते, जे उद्योजकता प्रदर्शित करतात आणि महत्त्वाकांक्षा उघड करतात अशा पुरुषांना स्त्रियांनी, पुरुषांपेक्षा कितीतरी अधिक पटींनी महत्त्व दिले आहे. अमेरिकेतील ८५२ अविवाहित स्त्रिया आणि १०० विवाहित स्त्रियांनी जोडीदार निवडीसंबंधीच्या एका आंतरराष्ट्रीय पाहाणीत एकमताने महत्त्वाकांक्षा आणि उद्योजकता ह्यांना महत्त्वाचा किंवा अत्यावश्यक असा दर्जा दिला होता. तात्पुरत्या आणि कायमच्या जोडीदाराच्या संदर्भात केलेल्या पाहाणीत स्त्रियांनी 'महत्त्वाकांक्षा नसणे' ह्याला 'असे चालणारच नाही' असा दर्जा दिला. मात्र पुरुषांनी बायकोबद्दल बोलताना 'महत्त्वाकांक्षा नसणे' ह्याला हवी किंवा नको असे काही महत्त्वच दिले नाही. जर पुरुषाची नोकरी सुटली, त्याच्यापुढे काही ध्येयच उरले नाही किंवा तो आळशीपणा दाखवायला लागला तर कैक वर्षांचे संबंध सोडून जायला स्त्रिया तयार होतील अशी शक्यता आहे.

महत्त्वाकांक्षी आणि उद्योगी पुरुषांना प्राधान्य देणे ही गोष्ट फक्त अमेरिकेपुरतीच किंवा पाश्चात्य समाजापुरतीच मर्यादित नाही. अनेक संस्कृतींमधल्या स्त्रियांनी पुरुषांपेक्षा प्रचंड संख्येने महत्त्वाकांक्षा आणि उद्योजकता ह्यांना 'महत्त्वाचा ते अत्यावश्यक' ह्या सदरात घातले आहे. उद्योजकता आणि महत्त्वाकांक्षा ह्या गोष्टी तैवानमध्ये २६ टक्के, बल्गेरियामध्ये २९ टक्के आणि ब्राझीलमध्ये ३० टक्के पुरुषांपेक्षा अधिक स्त्रियांनी महत्त्वाच्या मानल्या आहेत.

कालप्रवाहात आणि अनेक संस्कृतींमध्ये उपलब्ध असलेला पुरावा, विकासाच्या काळात स्त्रियांना अपेक्षित असलेल्या गोष्टी त्याच आहेत असे सांगतो. ज्याच्याजवळ साधनसामुग्री मिळवण्याची ताकद असल्याची चिन्हे दिसतात त्याला स्त्रिया प्राधान्य देतात आणि महत्त्वाकांक्षा नसलेल्या पुरुषाचा तिटकारा करतात. खात्रीपूर्वक साधनसामुग्री मिळवण्याचा मार्ग ह्या प्राधान्य देण्याने पूर्वज स्त्रियांना उपलब्ध झाला. ह्यामुळे एखादा पुरुष पुढे साधनसामुग्री मिळवू शकेल की नाही ह्याचा अंदाज घेणे त्यांना शक्य झाले. महत्त्वाकांक्षा आणि उद्योजकता ह्या गुणांमुळे आज असलेली सधनता उद्याही टिकून राहील ह्याची खात्री मिळवणे शक्य झाले. अर्थात अनुस्यूत असलेल्या साधनसामुग्रीसाठी अथक परिश्रम आणि महत्त्वाकांक्षा हेच दोन गुण काही महत्त्वाचे ठरत नाहीत. विश्वसनीयता आणि स्थैर्य हे दोन गुण ही साधने स्थिर अस्थिर कशी आहेत ह्याबद्दल अधिक माहिती सांगतील.

**विश्वसनीयता आणि स्थिरता**

जोडीदार शोधण्यासंबंधीच्या जागतिक पाहाण्यांमध्ये अठरा वैशिष्ट्यांपैकी 'प्रेम' ह्या घटकानंतर स्वभावाची विश्वसनीयता आणि भावनिक स्थैर्य / स्थिरता / परिपक्वता ह्यांचा दुसरा, तिसरा नंबर लागतो. सदतीसपैकी एकवीस संस्कृतींमध्ये स्त्रीपुरुष दोघांनीही जोडीदाराच्या विश्वसनीयतेला महत्त्व दिले आहे. उरलेल्या सोळा संस्कृतींमध्ये जिथे स्त्रीपुरुषांच्या मतामध्ये फरक आहे, तिथेही – सोळापैकी पंधरा संस्कृतींमधल्या – स्त्रियांनी विश्वसनीयता अधिक



अनुक्रमणिका

महत्त्वाची मानली आहे. सदतीस संस्कृतींमधल्या स्त्रियांनी विश्वसनीयतेला २.६९ इतके महत्त्व दिले आहे. याठिकाणी ३ टक्के महत्त्व अत्यावश्यक गटात धरले जाते. पुरुषांनाही ही विश्वसनीयता २.५० इतकी महत्त्वाची वाटते. याचाच अर्थ स्त्रिया व पुरुष दोघेही ह्या गुणाला जवळजवळ सारखेच महत्त्व देतात. भावनिक स्थिरता किंवा परिपक्वता ह्या गोष्टीवद्दल दोन्ही गटात फार फरक पडतो. तेवीस संस्कृतींमधल्या स्त्रियांनी पुरुषांपेक्षा परिपक्वतेला अधिक महत्त्व दिले आहे. मात्र उरलेल्या चौदा संस्कृतींमध्ये स्त्रीपुरुषांनी भावनिक परिपक्वतेला सारखेच महत्त्व दिले आहे. सगळ्या संस्कृतींमध्ये असे आढळते की स्त्रिया २.६८ आणि पुरुष २.४७ इतके महत्त्व ह्या गोष्टीला देतात. सगळ्या संस्कृतींमध्ये असे आढळून येते की स्त्रियांना ह्या गुणाचे प्रचंड महत्त्व वाटते. त्यामुळे त्या भावनिक परिपक्वतेची महत्त्वाचे ते अत्याश्यक अशा गटात जोडीदारासंबंधी विभागणी करतात.

जगभर ह्या गुणाला फार महत्त्व प्राप्त झाले आहे कारण साधनसामुग्रीचा पुरवठा सतत आणि पुढेही केला जाईल हे ह्या गुणावरून लक्षात येते. ज्यांच्यावर विसंबता येत नाही अशा जोडीदारामुळे जोडीतल्या दुसऱ्या व्यक्तीला अधिक त्रास सोसावा लागतो. डेव्हिड बूस व त्यांचे सहकारी मिशिगनमधल्या सहा महिन्यांच्या काळात विवाहनोंदणी कार्यालयात नोंदविलेल्या विवाहितांपैही पूर्वग्रह न बाळगता (at random) निवडलेल्या १०४ जोडप्यांना भेटले. ह्या जोडप्यांनी सहा तासांची व्यक्तिगत चाचण्यांची एक मालिका पूर्ण केली होती आणि त्यांच्या वैवाहिक नात्यासंदर्भात स्वत:चे मूल्यमापन केले होते, स्वत:च्या जोडीदाराच्या स्वभावाचेही मूल्यमापन केले होते. शिवाय त्या प्रत्येकाची मुलाखत एक स्त्री व एक पुरुष अशा जोडीने घेतलेली होती. ह्या सगळ्या चाचण्यांपैकी एका चाचणीत, स्वत: पूर्ण करणे अपेक्षित असलेल्या १४७ जबाबदाऱ्यांपैकी किती त्यांच्या जोडीदाराने त्यांच्यावर गेल्या वर्षात टाकल्या? त्यांनी, त्यांच्या जोडीदाराने आणि त्यांच्या मुलाखतकाराने म्हटल्याप्रमाणे भावनिकदृष्ट्या अपरिपक्व पुरुष त्यांच्या पत्नीलाच तापदायक ठरतात. एकतर ते स्वार्थी असतात आणि सगळी मालमत्ता आपल्याच ताब्यात ठेवतात. आपआपल्या पत्नीवर ताबा ठेवायचा प्रयत्न करतात आणि पत्नीचा पूर्ण वेळ स्वत:साठी वापरतात. लैंगिक संबंधांबाबत कोणत्याही सामान्य पुरुषापेक्षा अधिक मत्सरी असतात आणि पत्नी नुसती कोणाशी बोलली तरी थयथयाट करतात. ते परावलंबित्व दर्शवतात आणि जोडीदाराने त्यांच्याच सगळ्या गरजा पुरवीत राहावे ह्याबद्दल आग्रही राहातात. शाब्दिक आणि शारीरिक अशा दोन्ही प्रकारे ते गैरच वागतात. वेळेवर हजर न राहून आपल्याला पत्नीची गरज नाही असे भासवतात. स्थिर जोडीदारापेक्षा हे अस्थिर स्वरूपाचे जोडीदार अधिक लहरी असतात आणि अकारण रडूनही दाखवतात. सामान्यांपेक्षा अधिक भानगडी करतात. म्हणजेच आपला वेळ आणि पैसा दुसऱ्या मार्गाला लावण्यासाठी त्यांना आणखी एक निमित्त मिळते. ह्या जोडीदारांमुळे त्यांच्या पत्नीवर बोजा पडतो. ते पत्नीचा वेळ खातात, स्वत:चा वेळ

आणि पैसा दुसरीकडे वापरतात आणि पत्नी मुलांना सतत पैसा पुरवत राहाण्याची गोष्ट विसरूनच जातात. विश्वसनीयता आणि स्थिरता ह्या दोन्ही गोष्टी असल्या तर स्त्रीची स्वत:ची साधनसामुग्री पुरुषाकडून वापरली जात नाही.

जुळवून घेण्याच्या क्रियेत अस्थिर माणसाच्या खात्री न देता येण्याच्या स्वभावामुळे स्त्रीवर फार मोठा बोजा पडतो. टिकून राहाण्यासाठी आणि प्रजोत्पादनासाठी लागणारी साधनसामुग्री वेळच्या वेळी आणि प्रमाणशीर पुरविली गेली नाही तर फारच गोंधळ होतो. जोडीदाराला शिकारीला जाण्याऐवजी डुलकी काढावीशी वाटली म्हणून वेळच्यावेळी मिळणारच असलेले मांसमटण मिळाले नाही. चंचल अविश्वसनीय स्वभावाच्या जोडीदारमुळे हे घडले. पोषक अन्न मिळाले नाही तर मुलाबाळांच्या अस्तित्वालाच धोका निर्माण होतो. साधने खात्रीपूर्वक मिळाली तरच उपयोगी ठरू शकतात. अचानक मिळालेले मांसमटण कदाचित फुकटही जाऊ शकते कारण ह्या मांसाऐवजी त्यापेक्षा महाग अन्न वापरून गरज भागवली गेलेली असते. रोजच्यारोज तोंड द्यावे लागते अशा स्वरूपाच्या अडथळ्यांपासून थोडीतरी सुटका वेळच्यावेळी पुरवल्या गेलेल्या गोष्टींमुळे मिळते.

भावनिक स्थिरता आणि अविश्वसनीयता ह्यांचा पसारा फार मोठा आहे. मायकेल बोटकिन आणि डेव्हिड बूस १४० लोकांना भेटले. भावनिक स्थिर व अस्थिर वागण्याचे नमुने त्यांना द्यायला सांगितले. त्यांना ह्या विशेष प्रकारच्या जागतिक लक्षणांचे अधिक स्पष्टीकरण हवे होते काही वेळा भावनिक स्थिरता जाणवते पण तेव्हा कदाचित त्या माणसाचा स्वभावच आनंदी असतो, कुरकूर करणारा नसतो, आणि दुसऱ्याला त्याच्या अवघड काळात समजून घेण्याचा असतो. दुसऱ्या प्रकारची भावनिक स्थिरता ही कामाशी संबंधीत असते. सगळे बाहेर गेले की घरी राहून काम पुरे करणे किंवा एखाद्या कामासंबंधी नुसतीच चिंता व्यक्त करण्याऐवजी खूप कष्ट घेऊन ते काम पुरे करणे हे ह्या प्रकारचे स्वरूप असते. ह्या प्रकारांमध्ये माणसाची शांतपणे काम करण्याची कुवत, सगळ्या ताणतणावांना स्वत:च्या हिंमतीवर तोंड देणे आणि आणीबाणीच्या वेळी स्वत:ची साधनसंपत्ती दुसऱ्यांना देऊ करणे ह्या गोष्टी अंतर्भूत असतात.

भावनिकदृष्ट्या अस्थिर असलेल्या पुरुषांमध्ये फक्त ह्याच गोष्टी आढळत नाहीत. ते नेमके ह्याविरुद्ध वागतात. काळजी करून फायदा नाही त्या गोष्टींची काळजी करतात, प्रसंग आला की कोलमडतात, आणि जे काम करायला हवे आहे ते न करता नुसतेच बेचैन होतात. ते लोक साधनसंपत्ती मिळवू शकत नाहीत. कामातील अकुशलता, अवघड गोष्टी टाळण्याची असमर्थता, दुसऱ्यावर बोजा टाकण्याची प्रवृत्ती आणि दुसऱ्याच्या उपयोगी पडतील अशा गोष्टींचा स्वत:जवळच्या तुटवडा ह्या गोष्टी ह्या वर्तणुकीतून स्पष्ट होतात.

विश्वसनीयता आणि भावनिक स्थिरता ह्या गोष्टींना स्त्रिया अधिक महत्त्व देतात. कारण त्यांना त्यांच्या संसाराची आणि इतर कौटुंबिक जबाबदारी टाळायची असते, शिवाय भविष्य–

काळात जोडीदाराकडून मिळू शकणारे फायदेही त्यांना हवे असतात. स्थिर, विश्वसनीय पुरुष ज्या स्त्रियांना इतिहासकाळी मिळाला त्यांना स्वत:साठी व आपल्या मुलांसाठी हा पुरुष अधिक संपत्ती मिळवील ह्याची खात्री वाटली असेल. ज्या स्त्रियांनी हा शहाणपणाचा मार्ग स्वीकारला त्यांना अविश्वासू आणि अस्थिर नवऱ्यामुळे उचलावे लागणारे स्वत:च्या संसाराचे ताण आणि कौटुंबिक जबाबदारी ह्यापासून सुटका मिळाली.

**बुद्धिमत्ता**

विश्वसनीयता, भावनिक स्थिरता, उद्योजकता आणि महत्त्वाकांक्षा हेच काही फक्त गुण असे नव्हेत की जे आर्थिक, सांसारिक, कौटुंबिक उपयोगाच्या साधनांची स्थिरता आणि उपलब्धता ह्यांची खात्री देऊ शकतात. बुद्धिमत्तेचे अल्पजीवित्व दुसरा महत्त्वाचा मुद्दा देते. बुद्धिमत्ता चाचण्या काय मोजतात ह्याबद्दल कोणाचीच खात्री नाही पण उच्च बुद्ध्यांक खूप काही करू शकतात ह्याला स्वच्छ पुरावा मिळतो. अमेरिकेमध्ये बुद्धिमत्ता हे आर्थिक स्थितीचे मोजमाप आहे. जे कसोट्यांमध्ये वरच्या दर्जाचे ठरतात ते उत्तम शाळेत जातात, त्यांना अधिक वर्षे शिक्षण मिळते आणि परिणामत: उच्च दर्जाच्या नोकऱ्या त्यांना मिळतात. एखाद्या विशिष्ट धंद्याचा विचार करायचा असेल तर अगदी सुतारकाम आणि बांधकाम ह्याचा विचार केला तरी कोण भराभर वर जाईल, सत्तासंपादन करील आणि भरपूर पैसा मिळवील ह्याचा अंदाज त्याच्या बुद्धिमत्तेमुळे येऊ शकतो. छोट्या जमातींमध्ये टोळीचे मुख्य किंवा पुढारी हे नेहमी बुद्धिमंत गटाचे असतात.

समजा मनुष्यविकासाच्या इतिहासात बुद्धिमत्ता हा गुण आर्थिक सुस्थितीचा निर्देशांक असला तर विवाहासाठी निवडावयाच्या जोडीदारामध्ये स्त्रियांनी ह्या गुणाला महत्त्व दिले असते. जागतिक पाहाण्या असे सांगतात की जगभरच्या स्त्रियांनी आवश्यक असलेल्या १८ गुणांपैकी ५वे स्थान बुद्धीमत्तेला खरोखरीच दिलेले आहे. आवश्यकता असलेल्या १३ गुणांच्या थोड्या अधिक लहान यादीत मात्र 'बुद्धिमत्ता' जगभर दुसऱ्या क्रमाकांवर आलेली आहे. सदतीस संस्कृतींमधल्या १० संस्कृतींमध्ये स्त्रियांनी पुरुषांपेक्षा बुद्धिमत्तेला अधिक महत्त्व दिले आहे. इस्टोनिअन स्त्रियांनी बुद्धिमत्तेला १३ आवश्यक घटकांपैकी तिसरे स्थान दिले आहे, तर पुरुषांनी पाचवे स्थान. नार्वेजिअन स्त्रियांना ते दुसरे वाटते तर पुरुषांना चौथे ! उरलेल्या २७ संस्कृतींमध्ये मात्र स्त्रीपुरुष दोघांनीही बुद्धिमत्तेला सारखेच उच्च दर्जाचे महत्त्व दिले आहे.

बुद्धिमत्तेच्या दर्जात बऱ्याच गोष्टी अनुस्यूत असतात. उत्तम पालकत्वाच्या खुणाही त्यात सापडतात. संस्कृतीची जाण उत्तम असते आणि पालकत्वाशी जुळवून घेण्याची क्षमता असते. ह्याशिवाय उत्कृष्ट वक्तृत्व, गटातल्या इतर लोकांना आकृष्ट करून घेण्याची क्षमता, भविष्यातले धोके ओळखण्याची क्षमता, आरोग्यासाठी औषधोपचार करण्याची कुशलता ह्याच्याशीही बुद्धिमत्तेचा संबंध असतो. इतकेच नव्हे तर प्रश्नांची, समस्यांची सोडवणूक करण्यासाठी बुद्धिमत्ता

उपयोगी पडते. ज्या स्त्रिया अत्यंत बुद्धिमान पुरुषांची निवड करतात त्यांना ह्या सगळ्या अवघड समस्या स्वत:ला सोडवाव्याच लागत नाहीत.

बुद्धिमान माणसे कशी वागतात, काही गोष्टी कशा पार पाडतात हे पाहाण्यासाठी माईक बोटविन आणि डेव्हिडबूस मिळून १४० स्त्रीपुरुषांना भेटले. त्यांच्या स्मरणात असलेल्या अत्यंत बुद्धिमान लोकांबद्दल आठवून पाहा आणि त्यांच्या अशा पाच कृती सांगा की ज्यात त्यांच्या बुद्धिमत्तेचा प्रभाव पडलेला दिसतो. ह्या कृतींचा उपयोग जो भाग्यवंत बुद्धिमान जोडीदाराची निवड करील त्याला होईल. बुद्धिमंताला दूरदृष्टी असते आणि कोणत्याही विषयाकडे सर्वंकष, सम्यक दृष्टीने बघण्याचे ज्ञान त्याला असते; त्याबाबतीत त्याला अधिक चांगला अंदाज असतो आणि त्यामुळे त्याला अधिक चांगला निर्णय घेता येतो. हे लोक दुसऱ्याला अधिक चांगल्या प्रकारे समजावू शकतात, दुसऱ्याच्या भावनांची त्यांना जाण असते. अर्थातच त्यांच्याजवळ सार्वजनिक जीवनात वागण्याचे कौशल्य चांगले असते. प्रश्न सोडवायला कुठे जावे हे ते नीट अंदाज घेऊन ठरवतात. बुद्धिमान माणसे पैसा नीट वापरतात त्यामुळे त्यांचा पैसा वाया जात नाही, संपत नाही. एखादे काम नव्याने करायला घेतले तर ते फारच थोड्या चुका करतात. प्रश्न सोडवण्याची, त्याला योग्य वेळ देण्याची कुशलता त्यांचेजवळ असते. स्त्रिया जेव्हा बुद्धिमान पुरुष निवडतात तेव्हा त्याना हे सगळे फायदे आपोआप मिळतात.

बुद्धी कमी असलेल्या पुरुषांची निवड केल्यामुळे जी किंमत मोजावी लागते ती अगदी ह्याच्याविरुद्ध असते. ह्या प्रकारच्या पुरुषांना दुसऱ्याच्या वागण्यातले बारकावे समजून घेता येत नाहीत. सगळ्यांना समजणारे विनोदही त्याना पटकन समजत नाहीत, नको तेव्हा नको ते बोलतात. ह्याचाच अर्थ त्यांना सामाजिक जीवनात नीट वागता येत नाही. त्यांना अनुभवातून शहापणपण येत नसल्यामुळे हे लोक चुकांची पुनरावृत्ती करतात. त्यांना तोंडी सूचना समजत नाहीत, खुलासे कळत नाहीत आणि त्याचे साफ चुकलेले असतानाही ते वाद घालीत राहातात. ह्या त्यांच्या वागण्यामुळे सामान्य पुरुष समस्या सोडवू शकत नाहीत. काम करतीलच अशी खात्री देता येत नाही आणि उलट त्यांचीच जबाबदारी पडते. सामान्य पुरुष निवडणाऱ्यांना ह्या गोष्टी पत्कराव्याच लागतात.

इतिहासकाळी ज्या स्त्रियांनी बुद्धिमान नवरा निवडला त्यांना सामाजिक आणि भौतिक आणि आर्थिक बाबींमध्ये स्वत:साठी आणि मुलांसाठी बरेच काही मिळवता आले. सामान्यत: बुद्धिमत्ता ही वारशाने पुढे जात त्यामुळे त्यांच्या मुलामुलींना ही अधिक गुणवत्ता मिळू शकते. सगळ्या संस्कृतींमधल्या आधुनिक स्त्रिया उघडउघड ह्या गोष्टीला प्राधान्य देतात.

बुद्धिमत्तेमध्ये फारच फरक असलेल्या जोडीदारापेक्षा जवळपास सारख्या प्रमाणात बुद्धीची झेप असलेला जोडीदार निवडला जातो. सामान्य बुद्धीची व्यक्ती अत्यंत बुद्धिमान जोडीदार निवडीत नाही. योग्य संबंधांसाठी सारखेपणा अत्यावश्यक असतो.



अनुक्रमणिका

**अनुरूपता**

दीर्घकाळ जोडी यशस्वीपणे टिकून राहाण्यासाठी दोघांनाही फायदेशीर होतील अशा समान गोष्टी दोन्ही व्यक्तींजवळ असाव्या लागतात. दोघांमध्ये झगडे होत असतील तर हे ध्येय साधणे अवघड होते. दोन वेगवेगळ्या स्वभावाच्या माणसांमध्ये अनुरूपता असेल तर ती एकमेकात सहज मिसळून जातात. प्रत्येकाजवळ वेगळी गुणवैशिष्ट्ये असतील तर ती एकमेकाला पूरक ठरतात आणि जोडीदाराला ह्या वैशिष्ट्यांचा फायदाच होतो.

एकमेकांशी जुळणारी गुणवैशिष्ट्ये असणे आणि ती एकमेकात मिसळून जाणे हे सर्व–साधारण आहे. मूल्ये, आवडीनिवडी आणि व्यक्तिमत्त्वे ह्यात फारच फरक पडला तर जोडीमध्ये भांडणे आणि झगडे सुरू होतात. झिकरुबीन आणि त्याच्या सहकारी मानसशास्त्रज्ञांनी डेटिंग करणाऱ्या २०२ जोड्यांचा अभ्यास कैक वर्षे केला. त्यातली किती टिकतात आणि कितींचे फाटते हे त्यांना पाहायचे होते. अतिशय विसंगत जोडपी लवकर विभक्त झाली. उलट ज्यांच्यात सारखेपणा होता ती खूप दिवस टिकली असे त्यांना आढळून आले. जी १०३ जोडपी विभक्त झाली त्यांच्या लैंगिक भूमिका वेगवेगळ्या होत्या, इतरांशी हे संबंध ठेवण्याबद्दल मते वेगळी होती, कल्पनारम्यतेत फरक होता, धार्मिक समजुतीही वेगळ्या होत्या. उलट ज्या ९९ जोड्या टिकल्या त्यांच्यात खूप साधर्म्य होते.

अनुरूप जोडीदार शोधणे तसे महामुष्कील असते. अमेरिका असो की सगळ्या जगभरची गोष्ट असो स्त्रीपुरुष बऱ्याच गोष्टीत सारखेपणा पाहूनच विवाह करतात. वर्तणुकीचा प्रकार, बुद्धिमत्ता, समाजाचे स्वरूप ह्या गोष्टी जोडीदार पाहात असतात. राजकीय आणि सामाजिक मतेही विचारात घेतात. उदा. गर्भपातासंबंधीची मते किंवा फाशीच्या शिक्षेसंबंधीची मते ह्या जोड्यांची ५० टक्केहून अधिक वेळा जुळतात. विसंगत जोडप्यांची ह्या विषयावर भांडणे होऊ शकतात. धर्म, जात, वंश ह्या दृष्टीनेही समाज जोडीदार लोकांना हवा असतो. सारख्या बुद्धिमत्तेचे लोक विवाह करतात. याचा अर्थ शंभर टक्के समान बुद्धिमत्ता त्याना हवी असते असा नाही. काही विषयांवर जोडीदारांची मते +40 इतकीच जुळतात. ह्याखेरीज बहिर्मुखता, समजूतदारपणा आणि जाणिवा जागृत असणारे ह्या विषयात जोडीदार +25 जुळतात. बहिर्मुख जोडीदाराला पार्टीत रमणारा जोडीदार हवा असतो तर अंतर्मुख जोडीदाराला संध्याकाळी शांतपणे घरात बसणारा जोडीदार हवा असतो. ज्या जोडीदारांना जीवनाचा सतत नवानवा अनुभव घ्यायला आवडतो, त्यांना उत्तम मद्य, कला, साहित्य आणि परदेशी खाद्यान्न ह्यात सहभागी होऊ शकणारा जोडीदार आवडतो. सदैव सावध असणाऱ्यांना वेळेवर बिले देणारा आणि भविष्यासाठी तरतूद करून ठेवणारा जोडीदार आवडतो. बेफिकीर जोडीदाराला आला क्षण जगणाराच जोडीदार आवडतो. अगदी निकट सहवासातल्या किंवा अगदी आपल्याचसारखे वागण्याची शक्यता असलेल्या जोडीदारीचीच निवड केल्यामुळे ह्या जोड्या अनुरूप ठरतात. आधुनिक पद्धतीच्या

विवाहात सारख्याच बुद्धिमत्तेचे लोक एखाद्या विशिष्ट शिक्षणसंस्थेत शिकायला जातात आणि त्यामुळे त्यांचे विवाह होतात तेव्हा ते सारख्याच बुद्धिमत्तेच्या जोडीदाराशी होतात. मात्र सगळ्या जगभर जेव्हा लोक समानधर्मी जोडीदार शोधतात तेव्हा त्याला हे कारण लागू पडणार नाही. क्रेंबिज आणि मॅसॅच्यूसेंट्समधल्या डेटिंग करणाऱ्या १०८ व्यक्तींची एक अभ्यास पाहाणी डेव्हिड बूसने आखली होती. ह्या लोकांची बौद्धिक क्षमता आणि व्यक्तिमत्व ह्यांचे त्याने मोजमाप घेतले होते. सारख्याच घटकांसंबंधी त्यांची मते काय आहेत हे पाहाण्यासाठी त्याना स्वतंत्रपणे एकच प्रश्नावली सोडवायला दिली होती. ह्या पाहाणीत असे लक्षात आले की स्त्रियांनी त्यांच्या सारख्याच गुणांच्या जोडीदाराला प्राधान्य दिले, तेही अनेक प्रकारच्या घटकांमध्ये – उदा. धीटपणा, अधिकारशाही, चुणचुणीतपणा, प्रेमळपणा, समजूतदारपणा, दयाळू वृत्ती, जबाबदारी स्वीकारणारा, जाणीव असणारा, उद्योजकता. खास करून स्त्रियांना बुद्धिमत्ता, दूरदृष्टी आणि निर्मितीक्षमता ही समान हवी होती. ज्यांना स्वत:ला आपल्यातल्या घटकांची उणीव ठाऊक होती, त्यांनी आपल्याचसारख्या कमी गुणवत्तेच्या जोडीदाराची अपेक्षा केली होती. ध्येयसिद्धीसाठी एकमेकांच्या आवडीनिवडी जुळाव्यात म्हणून जोडप्यांना फार प्रयत्न करावे लागतात. ते टाळण्यासाठी मुदलातच अनुरूप जोडीदार मिळवणे हाच उत्तम पर्याय आहे. समजा एखाद्या स्त्रीला बहिर्मुख असल्यामुळे भव्य प्रमाणातल्या पार्ट्या आवडतात आणि तिचा विवाह अशा जोडीदाराशी झाला की ज्याला सांजवातीची वेळ शांत हवी असते. त्यांनी आपल्या मार्गांनी जायचे असे जरी ठरवले तरी दर संध्याकाळी हे घडायला लागल्यावर दोघांच्या स्वभावातील विसंगतीमुळे तणातणीचे प्रसंग येणारच. जोड्यांमध्ये दोघेही अंतर्मुख किंवा दोघेही बहिर्मुख आहेत तर ठरविलेल्या कार्यक्रमाबद्दल भांडणाचा प्रसंगच येणार नाही. एक अमेरिकेतील डेमोक्रॅट पक्षाचा आणि एक रिपब्लिकन पक्षाचा ह्यांचा आपसातला विवाह किंवा गर्भपातसमर्थक आणि विरोधक अशा जोडीचा विवाह झाला तर फार गमतीची आणि महत्त्वाची चर्चा होऊ शकेल. पण दोघांचीही शक्ती ह्या वादविवाहात फुकट तर जाईलच पण दोघांच्याही विचारांच्या दिशा वेगळ्या असल्यामुळे आपले ईप्सित साधण्याचे दोघांचेही प्रयत्न फुकट जातील.

मुलांना नीट वाढवणे, आजूबाजूच्या समाजात स्थान मिळवून संबंध जोडणे ह्या महत्त्वाच्या गोष्टीसाठी सामंजस्याने अनुरूप जोड्या प्रयत्न करू शकतील हे फार महत्त्वाचे आहे. मूल कसे वाढवावे ह्या विषयावरच विसंगत जोडप्यांमध्ये वाद जुंपेल आणि उलटसुलट आज्ञा केल्याने ते मूल गोंधळून जाईल. समानधर्मी जोडी शोधल्यामुळे ह्या विसंगतीमुळे होणारे नुकसान टळू शकेल.

एखाद्या व्यक्तीची लग्नाच्या बाजारात काय गुणवत्ता आहे हे ठरल्यानंतर समान गुणवत्तेच्या जोडीदार शोधण्यामुळे जुळवून घेण्याचे कष्ट वाचतात. व्यक्तिमत्वाचे जे पैलू – उदा. समजूतदारपणा, जाणीवा आणि बुद्धिमत्ता ह्यांना जोडीदार मिळवण्याच्या संदर्भात फार महत्त्व

आहे. त्यामुळे ज्याच्याजवळ ही वैशिष्ट्ये अधिक तो ही वैशिष्ट्ये आधिक्याने असलेल्या म्हणजे समानधर्मी जोडीदारीचीच अपेक्षा करतो. ज्यांच्याजवळ ह्या वैशिष्ट्यांची कमतरता असते त्याला जरा कमसर जोडीदारच मिळेल; म्हणून त्याने आपल्या इतकीच गुणवैशिष्ट्ये असणाऱ्यावरच लक्ष केंद्रित करावे. असे केल्याने आपल्या ताकदीबाहेरच्या जोडीदाराला वश करण्यासाठी लागणारा पैसा आणि श्रम वाचतील. स्वत:पेक्षा अधिक चांगला जोडीदार मिळाला तर तो कधीही सोडून जाण्याचा धोका असतो कारण त्या जोडीदाराला अधिक चांगला सहचर मिळण्याची शक्यता उरलेली असतेच. असमान विवाहविच्छेद होण्याचीच अधिक शक्यता असते कारण वरचढ जोडीदाराला अधिक उत्तम जोडीदार मिळण्याचीच शक्यता जास्त असते.

जुळवून घेण्याची समस्या समानता शोधली तर त्याचवेळी सुटून जाते. समानता हवी असे ठरवल्यामुळे लग्नाच्या बाजारात जोडीदाराची किंमत वाढते, प्रयत्नांमध्ये एकसूत्रता येते. जोड्यांमधील भांडणे कमी होतात, ज्यात वादच नाहीत अशा गोष्टी साधणे सोपे होते, यश मिळण्याची शक्यता वाढते, नंतर जोडीदार सोडून जाण्याची किंवा नातेसंबंध तुटण्याची शक्यता कमी होते.

आपल्या जोडीदारापासून आपल्याला कायकाय मिळू शकेल हे साधनसंपत्ती, व्यक्तिमत्त्व, बुद्धिमत्ता आणि समानता ह्या गुणवैशिष्ट्यांकडे पाहून ध्यानात येते. जोडीदाराची शारीरिक क्षमता ह्याच विषयी मूलभूत माहिती देते. स्त्रिया ज्या क्रमाने विशिष्ट गुणांना प्राधान्य देतात त्यात हे गुणही समाविष्ट होतात.

**आकारमान आणि बल**

जेव्हा मॅजिक जॉन्सन हा बास्केटबॉल खेळाडू उघडपणे सांगतो की माझा हजारो स्त्रियांबरोबर लैंगिक संबंध आला आहे. त्यावेळी तो अजाणतेपणी स्त्रियांच्या निवडीविषयी माहिती सांगून जातो. शारीरिक क्षमता आणि क्रीडानैपुण्य प्रदर्शित करणाऱ्या पुरुषाला ह्या स्त्रिया प्राधान्य देतात हेच ह्या गोष्टीतून सूचित होते. आकडा ऐकून छाती दडपली तरी निवडीच्या प्राधान्याने धक्का बसायला नको. शारीरिक वैशिष्ट्ये जोडीदार निवडीच्या क्रियेत स्त्री विचारात घेते.

सगळ्या प्राणीजगतात सुद्धा शारीरिक बळाचा विचार मादी सगळ्यात आधी करते. ग्लडिएटर फ्रॉग ह्या प्रजातीमध्ये घरटे बांधणे आणि अंड्याचे रक्षण करणे हे काम नरांचेच आहे. बऱ्याचदा प्रणयाराधनेच्या काळात एखाद्या मादीला नर मनात भरला तर ती त्याला मुद्दाम ठोसे देते. हे ठोसे ती इतक्या जोरात मारते की तो मागे भेलकांडत जावा किंवा घाबरून पळून जावा. जर हा नर घरट्यापासून दूर पळाला तर मादी लगेच त्याला नाकारते आणि दुसऱ्या नराच्या शोधात निघते. जो नर ठोसे खाऊनही घरट्यापासून जराही विचलीत होत नाही किंवा फारतर अगदी थोडासा दूर सरकतो अशाच नराची ह्या माद्या निवड करतात. ठोसे खाऊनही घट्ट जागीच राहिलेल्या नराला अगदी क्वचित प्रसंगीच मादी नाकारते. ठोसे मारल्यामुळे नर तिच्या तावडीतून

सुटतो का हे तिला कळते. ही परीक्षा केल्यामुळे हा नर संरक्षणाचे कार्य कसे करू शकेल हे त्या बेडूक मादीला समजते. मोठ्या, सुदृढ पुरुषांच्या शारीरिक ताकदीमुळे स्त्रियांना कधीकधी अत्याचाराला तोंड द्यावे लागते आणि ह्या लैंगिक अत्याचारामुळे स्त्रीचा निवडीचा हक्क डावलला जातो. पूर्वीच्या काळी अशी जबरदस्ती नेहमीच केली जात होती. प्राणीजगतातल्या मानवाच्या मानवेतर पूर्वजांचा (प्रायमेट्स) इतिहास पाहिला तर मादीवर नराची शारीरिक आणि लैंगिक जबरदस्ती हा भाग कायमचाच दिसतो. बार्बारा स्मट्स ही जीवशास्त्रज्ञ (Primotologist) आफ्रिकेच्या सवानाच्या मैदानी प्रदेशात बबूनच्याबरोबर त्यांच्या जुगण्याच्या पद्धतींचा अभ्यास करण्यासाठी राहिली. तिला असे आढळून आले की ह्या माद्या स्वत:ला आणि पिल्लांना शारीरिक संरक्षण देऊ शकणाऱ्या नराशी खास मैत्रीचे संबंध ठेवतात. बदल्यात ह्या माद्या ह्या खास मित्रांना माजाच्या काळात लैंगिक संबंधांसाठी जवळ करतात. सारांश, बबून माद्या संरक्षणाच्या बदल्यात लैंगिक संबंध ठेवतात.

कायमचा जोडीदार मिळाल्यामुळे स्त्रियांना जगात शारीरिक संरक्षण मिळवण्यासाठी ह्या पुरुषांचा उपयोग होतो. पुरुषाचे आकारमान, ताकद आणि शारीरिक कौशल्य ह्या गोष्टींमुळे संरक्षणाचा प्रश्न सोडवायला मदत होते. पुरावा असा मिळतो की स्त्रिया ह्या गोष्टींना प्राधान्य देतात. दीर्घ किंवा तात्पुरत्या संबंधांचा अभ्यास करीत असताना असे लक्षात येते की अमेरिकन स्त्रिया ह्या शारीरिक क्षमतेबद्दल आवश्यक / अनावश्यक अशी त्याची प्रतवारी करतात. बुटका माणूस कायमच्या संबंधांसाठी त्यांना नको असतो. त्याच्या अगदी उलट कायमचा संबंध येणार असेल तर त्यांना पुरुष उंच, सुदृढ, खेळाडू असावा असाच त्यांचा आग्रह असतो.

अमेरिकन स्त्रियांच्याच दुसऱ्या एका गटाने विवाहासाठी योग्य जोडीदार म्हणून किमान सरासरी किंवा त्याहून अधिक उंचीच्या पुरुषाला म्हणजेच अंदाजे ५ फूट ११ इंच उंचीच्या पुरुषाला प्राधान्य दर्शविले. असे वारंवार लक्षात येते की उंच माणसांना बुटक्या किंवा सर्वसामान्य उंचीच्या पुरुषापेक्षा हवा तो जोडीदार हव्या तितक्या वेळा उपलब्ध होतो. व्यक्तिगत जाहिरातींच्या पूर्वोल्लेखित दोन अभ्यास पाहाण्यांमध्ये असे स्पष्ट झाले आहे की उंचीचा उल्लेख करणाऱ्या ८० टक्के स्त्रियांना सहा फूट किंवा त्याहून अधिक उंचीचा पुरुष हवा आहे. ह्याहून अधिक स्पष्ट गोष्ट अशी की उंच पुरुषांनी दिलेल्या जाहिरातींना बुटक्या पुरुषांच्या जाहिरातींपेक्षा अधिक प्रतिसाद मिळाला. बुटक्यांपेक्षा उंच पुरुष अधिक वेळा 'डेट्स' मिळवतात आणि त्यांच्यासाठी 'उपवर' स्त्रियांची मोठीच यादी उपलब्ध असते. स्त्रिया बलदंड आणि शारीरिक चापल्य असलेल्या पुरुषांची निवड करून थोड्या प्रमाणात का होईला आक्रमक पुरुषांपासून संरक्षण मिळवण्याचा प्रयत्न करतात.

जवळजवळ सगळ्या संस्कृतींमध्ये उंच पुरुषांना महत्त्व देण्याकडे कल असतो. भटक्या जमातीतील 'बिगमेन' म्हणजे खरोखरच बलदंड पुरुष असतात. पाश्चिमात्य संस्कृतींमध्ये उंच

पुरुष अधिक पैसा मिळवतो, व्यवसायात जलद प्रगती करतो, आणि लवकरात लवकर भराभर बढत्या मिळवतो. अमेरिकेचे फारच थोडे अध्यक्ष सहा फुटांपेक्षा कमी उंचीचे आहेत. राजकारण्यांना मतदारांच्या आवडीची पूर्ण जाणीव असते. १९८८ मध्ये टीव्हीवर दाखवण्यात आलेली अध्यक्षीय वादसभा हेच दर्शविते. जॉर्ज बुशने मायकेल ड्यूकाकिस ह्या त्याच्यापेक्षा ठेंगण्या प्रतिस्पर्ध्याला केवळ उंचीमुळे हरवले. त्या दोघांच्या उंचीतला फरक प्रकाशझोतात ठेवण्याचा डावपेच तो खेळला आणि जिंकला. विकासाच्या मानसशास्त्रज्ञ ब्रूस एलिस म्हणतो –

"सामाजिक प्रतिक्रियांमध्ये उंची
हा महत्त्वाचा मुद्दा असतो.
उंच पोलिसापेक्षा बुटक्या पोलिसावर
हल्ला होण्याची भीती अधिक......
अर्थ असा की उंचीमुळे अधिक धाक
आणि अधिक आदर त्याला शत्रूकडून
मिळतो....... स्त्रियांच्या व्यक्तीगत
जाहिरातीत उंच पुरुषांना अधिक
मागणी असते, त्यांच्या जाहिरातींना
अधिक प्रतिसाद मिळतो, आणि त्यांना
बुटक्या पुरुषांपेक्षा देखण्या सख्या मिळतात."

उंच पुरुषांना मागणी असण्याचा प्रकार फक्त पाश्चिमात्य संस्कृतीपुरताच मर्यादित नाही. जीवशास्त्रज्ञ थॉमस ग्रेगच्या म्हणण्यानुसार ब्राझीलमधल्या ॲमेझान भागात राहाणाऱ्या मेहीनाकू टोळीमध्ये पुरुषाच्या आकारामानात ज्यावेळी फार फरक असतो त्यावेळी कुस्तीचे कौशल्य हा फार महत्त्वाचा मुद्दा ठरतो :

स्नायूंचे पट काढलेला, मजबूत बांध्याचा
पुरुष अधिक सख्या मिळवू शकतो
उलट बुटका (Peritsi) म्हणून
गणला गेलेला लहानखुरा माणूस
अपयशी ठरतो. उंची ही अगदी
साधी गोष्ट फारच फायद्याची ठरते.......
......ताकदवान कुस्तिगीराला त्या
खेडेगावातले लोक घाबरतात.......
त्याला आदरही दाखवतात आणि



अनुक्रमणिका

त्याला घाबरतातही. बायकांच्या
दृष्टीला तो देखणा (awitsiri)
दिसतो. प्रियकर म्हणून आणि नवरा
म्हणूनही त्याला अधिक मागणी.
राजकारणात आणि प्रेमात विजय
मिळवून, कुस्तीगीर मल्ल पुरुषत्वाचे
उत्तम गुण सिद्ध करतो. 'जेय' एवढा
नशिबवान नव्हे. अंगात काहीही
गुण असू देत सतत पराभूत
होणाऱ्याला मूर्खच समजले जाते.
तो कुस्ती खेळायला मैदानात
उतरला की लोक कुत्सित
उपदेश करायला लागतात.......
स्त्रिया घरातच बसून ह्या कुस्त्या
पाहात असतात त्यामुळे त्यांचे टोमणे
ऐकू येत नाहीत पण त्यासुद्धा
वक्रोक्तीपूर्ण विनोद करीतच असतात.
कोणालाही हरणारा माणूस नवरा
म्हणून किंवा प्रियकर म्हणूनही नको असतो.

बार्बारा स्मट्सला विश्वास वाटतो की विकासाच्या इतिहासात 'संरक्षण' ही एक फार महत्त्वाची गोष्ट पुरुष स्त्रीला देऊ करू शकतो. आक्रमक पुरुषाची शारीरिक जबरदस्ती आणि स्त्रियांच्या लैंगिक निवडीला बंधने घालणारी त्यांची आक्रमकता! ह्याच गोष्टी पूर्वी स्त्रियांच्या जोडीदार निवडीमागे प्राधान्याने होत्या. अनेक संस्कृतींमध्ये लैंगिक जबरदस्ती आणि अत्याचार ह्यांच्या लक्ष वेधून घेणाऱ्या घटना पाहिल्या तर जोडीदाराने संरक्षण करावे ह्या हिशेबाने केलेली जोडीदाराची निवड ही गोष्ट नव्या परिस्थितीतही सुसंगतच ठरेल. पुष्कळ स्त्रियांना रस्त्यावर अजिबात सुरक्षित वाटत नाही. सुदृढ, उंच, खेळाडू जोडीदार त्यांना लैंगिक दृष्ट्या आक्रमक पुरुषांना प्रतिबंध करणारा वाटतो.

आकारमान, बळ आणि क्रीडानैपुण्य ही वैशिष्ट्ये फक्त सक्षम शारीरिक वैशिष्ट्ये ठरत नाहीत तर ती जोडीदाराला अधिक महत्त्व प्राप्त करून देतात. टिकून राहाण्यासाठीही उत्तम तब्येतचा उपयोग होतो.



अनुक्रमणिका

**उत्तम आरोग्य**

जगभर स्त्रिया उत्तम आरोग्य असलेल्या पुरुषाची निवड करतात. आंतरराष्ट्रीय पाहाणीत समाविष्ट केलेल्या सदतीस संस्कृतींमध्ये विवाह करताना स्त्रिया पुरुषाचे उत्तम आरोग्य 'वर' म्हणून 'महत्त्वाचे ते अत्यावश्यक' ह्या गटात घालतात. दुसऱ्या एका अमेरिकन स्त्रियांच्या पाहाणीत अस्वच्छ राहाण्याच्या सवयींपासून ते गुप्तरोगापर्यंत सगळ्या शारीरिक अवस्था जोडीदारासाठी अयोग्य, अनिष्ट या गटात घातल्या जातात. क्लेलँड फोर्ड आणि फ्रँक बीच ह्या जीवशास्त्रज्ञांना असे आढळून आले की वहाणाऱ्या जखमा, दुखापत झालेले शरीर, निस्तेज चेहरा ह्या बिघडलेल्या आरोग्याच्या निदर्शक गोष्टी सगळ्या जगभरच अनाकर्षक मानल्या जातात.

माणसाची शारीरिक सुदृढता ही वागणुकीत आणि शरीराच्या हालचालीत व्यक्त होते. उदा. प्रसन्नता, सळसळता उत्साह आणि जोमदार चाल ह्या गोष्टी नक्कीच आकर्षक ठरतात. त्यासाठी अधिक ऊष्मांक लागतात. स्वाभाविकच उत्तम आरोग्याने मुसमुसणाऱ्या, उसळणाऱ्या लोकांकडून त्या व्यक्त होऊ शकतात.

आपल्या प्रजातींमध्येच फक्त आरोग्याला आपण अवास्तव महत्त्व देतो असे मानण्याचे मुळीच कारण नाही. काही प्राणी सहजसाध्य नसलेल्या (पण उत्तम आरोग्य आणि सामर्थ्य दर्शविणाऱ्या) गोष्टींचे प्रदर्शन करतात. उदा. प्रचंड, मोठमोठ्या आणि बटबटीत हालचली चकचकीत, भडक, दिमाखदार अशा मोराच्या पिसाऱ्याचेच उदाहरण घ्या ना. जणू काही मोर म्हणतो आहे, "माझ्याकडे पाहा. ह्या मोठ्यामोठ्या पिसांचे लटांबर मी सहज सांभाळतो आहे. आणि तरीही मी जोमात आहे." अस्तित्वाच्या आदर्शवादी कल्पनांपेक्षा अगदी वेगळे मोराच्या शेपटीचे गूढ आज सुटण्याच्या मार्गावर आहे. विल्यम डी. हॅमिल्टन आणि मार्लिना झूक असे सुचवितात की भरपूर पिसांचे हे बांडगूळ सहज सांभाळणारा हा मोर कमी पिसे असणाऱ्या नरापेक्षा अधिक आरोग्य आणि सामर्थ्य व्यक्त करतो. साहजिकच लांडोरी भरपूर पिसांच्या मोरोला अधिक महत्त्व देते.

दुर्बळ किंवा रोगी नवरा पत्करला तर पूर्वीच्या काळी स्त्रीला चार दुष्परिणामांना तोंड द्यावे लागते असे – एक – तिला आणि तिच्या कुटुंबियांना ह्या रोगाची लागण होण्याचा धोका असे. दोन – तिचा जोडीदार तिला आणि तिच्या कुटुंबासाठी अन्नवस्त्र, निवारा, संरक्षण, आरोग्याची निगा, बालसंगोपन इत्यादी आवश्यक कर्तव्येही पार पाडू शकत नसे. तिसरे – तिचा जोडीदार लवकर मरण्याची शक्यता असे. परिणामत: तिला आवश्यक ती साधनसामुग्री मिळवण्यासाठी दुसरा जोडीदार शोधण्याची गरज पडे. त्यासाठी परत प्रणयाराधना करावी लागे आणि चौथे – तिच्या जोडीदाराचे अनारोग्य हे आनुवंशिक असेल तर मुलांना ती तेच आनुवंशिकतेने देण्याचा धोकाही संभवतो. आरोग्यपूर्ण जोडीदाराची निवड ही त्याच्या जिवंत राहाण्याची आणि मुलांना साधनसामुग्री पुरवीत राहाण्याची शक्यता अधिक वाढवते.

**प्रेम आणि बांधिलकी**

माणसाजवळ आरोग्य, उच्च स्थान आणि साधनसामुग्री असेल तरी तो ती एखाद्या स्त्रीला आणि तिच्या मुलांना देईलच ह्याची खात्री नसते. काही पुरुष विवाह करायला अजिबात उत्सुक नसतात. तात्पुरत्या मैत्री संबंधांवर समाधान मानून ते अशा अनेक स्त्रियांशी संबंध ठेवीत राहातात. ह्या पळपुटेपणाची बायका टर उडवतात. बांधिलकीशी अप्रामाणिक, तिरस्कार करणारा, खोटा मोठेपणा बाळगणारा, अशा शब्दात त्याची हेटाळणी करतात. 'लग्न' ह्या शब्दाने घाबरगुंडी उडणारा असेही त्याला म्हणतात. स्त्रियांचा हा राग योग्यही आहे. लैंगिकसंबंध, गर्भधारणा, अपत्यजन्म ह्यासाठी जे कष्ट त्यांना मोजावे लागतात ते पाहिले की त्या बदल्यात त्यांना पुरुषाची बांधिलकी हवीशी वाटावी हे अगदी योग्यच आहे.

बांधिलकीला स्त्री जे महत्त्व देते ते पुढील सत्यकथेत स्पष्ट होते. (नावे बदललेली आहेत) गेली दोन वर्षे मार्क आणि सूझन एकमेकांना भेटत होती आणि गेले सहा महिने एकत्रही राहात होती. ४२ वर्षाचा सधन उद्योजक असा मार्क आणि ती २८ वर्षाची वैद्यकीची विद्यार्थिनी. सूझनला नजीकच्या काही वर्षात मुले हवी होती म्हणून ती लग्नाचा आग्रह धरीत होती. पण मार्कने तिची मागणी फेटाळून लावली. त्याने एकदा लग्न केले होते आणि आता जर लग्न करायचेच झाले तर ते शंभर टक्के सुखाचेचे होईल त्याला खात्री हवी होती. तिचा सतत जोरा चालूच राहिला म्हणून तो शेवटी विवाहपूर्व कराराला (Prenuptial agreement) तयार झाला. हा विवाहाच्या हेतूचाच विपर्यास होतो म्हणून तिने ह्या गोष्टीला विरोध केला. अजून चार महिन्यांनी आपण हो की नाही तो निर्णय घेऊ असे दोघांनीही ठरविले. ती तारीख आली आणि गेली पण मार्कचा निर्णय झाला नाही. सूझनने त्याला सांगितले की ती त्याला सोडून जाते आहे आणि तिने दुसऱ्या माणसाबरोबर 'डेट' घ्यायला सुरुवात केली. मार्क घाबरला. त्याने तिला परत बोलावले आणि सांगितले की त्याने आता विचार बदलला आहे आणि तिच्याशी तो लग्न करील. त्याने नवीन गाडीही कबूल केली. विवाहपूर्व करार असणार नाही हेही त्याने मान्य केले. पण उशीर फार झाला होता. बांधिलकी पत्करण्याचा मार्कचा नकार सूझनला ठाम नकारात्मक सूचना देणारा ठरला. त्यांच्या मैत्रीची शेवटचा धागा तुटला. ती दोघे कायमचीच दुरावली.

पूर्वीही आणि आजही ज्यांच्याजवळ आवश्यक ती साधनसंपत्ती आहे आणि ही संपत्ती तिच्यासाठी आणि तिच्या मुलांसाठी वापरण्याची बांधिलकी पत्करण्याची ज्याची मनापासून तयारी आहे अशा पुरुषाची निवड करणे अस्तित्वाच्या झगड्यात स्त्रिया महत्त्वाचे मानतात. सकृतदर्शनी दिसतो त्यापेक्षा हा प्रश्न कदाचित फार अवघड असेल कारण संपत्ती उघडपणे दिसू शकते, बांधिलकीची इच्छा कशी दिसणार? बांधिलकीचे मोजमाप करण्यासाठी काही असे कळीचे मुद्दे शोधावे लागतात की जेणेकरून स्वत:ची साधनसंपत्ती निष्ठापूर्वक आपल्या जोडीदाराला देईल अशी शक्यता दिसेल. प्रेम हा एक असा महत्त्वाचा मुद्दा बांधिलकी दर्शवितो.

पाश्चिमात्य दृष्टिकोनातून प्रेम आणि प्रेमाच्या कृती नव्याने निर्माण झाल्या असे मुळीच नाही. प्रेम ही गोष्ट जागतिक आहे. जगभरातल्या सगळ्या संस्कृतींमध्ये प्रेमाचे विचार, भावना आणि कृती ह्यांचा अनुभव लोक घेत आले आहेत – अगदी आफ्रिकेच्या दक्षिण टोकाच्या झुलू लोकांपासून ते अलास्काच्या उत्तर टोकाच्या एस्किमोपर्यंत, जगभरातल्या अगदी वेगवेगळ्या स्वरूपाच्या १६८ संस्कृतींमध्ये विल्यम जंकोविक ह्या मानवशास्त्राज्ञाला जवळजवळ ९० टक्के लोकांमध्ये प्रणयरम्य प्रेमाचे पुरावे मिळाले. उरलेल्या १० टक्के लोकांमध्ये मानवी इतिहासाचे पुरावे इतके अपुरे आणि अस्पष्ट होते की त्यामुळे प्रेमाच्या अस्तित्वाचे पुरावे तपासणे अवघड झाले. समाजशास्त्रज्ञ सू स्प्रेचर आणि तिच्या सहकाऱ्यांनी रशिया, जपान आणि अमेरिकेतील १६६७ स्त्री-पुरुषांच्या मुलाखती घेतल्या. त्यांना असे आढळले की ६१ टक्के रशियन पुरुष आणि ७३ टक्के रशियन स्त्रिया सध्या प्रेमात पडलेल्या आहेत. जपानबद्दलचे हेच तुलनात्मक आकडे पुरुष ४१ टक्के आणि स्त्रिया ६३ टक्के असे आहेत. अमेरिकनांपैकी ५३ टक्के पुरुषांनी आणि ६३ टक्के स्त्रियांनी ते प्रेमात पडलेले असल्याची कबुली दिली. प्रेम ही घटना फक्त पाश्चात्य संस्कृतींपुरती मर्यादित नाही हे यावरून स्पष्ट होते.

प्रेम म्हणजे काय आणि ते बांधिलकीशी कसे जोडले जाते हे शोधून काढण्यासाठी डेव्हिड बूसने प्रेमाच्या कृतींची एक पाहाणी केली. कॅलिफोर्निया आणि मिशिगन विद्यापीठातल्या ५०/५० स्त्रीपुरुषांना त्याने जरा विचार करायला सांगितले. त्यांच्या परिचयातले सध्या प्रेमात पडलेले स्त्रीपुरुष आठवून, त्यांच्या कोणत्या हालचाली, कृती ते प्रेमात पडले आहेत हे स्पष्ट करतात ह्याचे वर्णन करा असे त्यांना त्याने सांगितले होते. एका आणखी वेगळ्या चाळीसजणांच्या कॉलेजमधल्या स्त्रीपुरुषांच्या गटाने त्यांच्या दृष्टीने प्रेमाच्या अगदी ठराविक खुणा म्हणून ११५ कृती सांगितल्या. प्रेमाची मध्यवर्ती खूण म्हणजे बांधिलकी ही गोष्ट स्त्रीपुरुष दोघांनीही पहिल्या नंबरावर आणून ठेवली होती. प्रेमाच्या त्या कृतींमध्ये दुसऱ्यांबरोबरचे प्रेमाचे चाळे बंद करणे, लग्नाबद्दल बोलणे आणि ह्याच व्यक्तीपासून मुले हवी असण्याची इच्छा व्यक्त करणे ह्या गोष्टी अंतर्भूत होतात. ह्या कृतींतून पुरुष एकाच स्त्रीला व तिच्या मुलांना साधनसंपत्ती पुरवण्याची बांधिलकी पत्करील ही सूचना मिळते.

अर्थात बांधिलकीला अनेक पदर आहेत. महत्त्वाचा मुद्दा बांधिलकीमध्ये येतो तो निष्ठेचा. दोघेही दोन ठिकाणी असताना एकमेकांशी निष्ठेने प्रामाणिक राहाणे ही गोष्ट यात अंतर्भूत असते. निष्ठा म्हणजे एकाच जोडीदाराबरोबर लैंगिक संबंध ठेवण्याची बांधिलकी. निष्ठा म्हणजे आपली साधनसंपत्ती फक्त आपल्याच जोडीदारासाठी वापरणे उदा. उत्तम महाग भेटी देणे किंवा अंगठी देणे. ह्या गोष्टीतून दीर्घकालीन संबंधांमध्ये आपली संपत्ती जोडीदारालाच दिली जाईल ह्याची गंभीर सूचना मिळते. ह्या बांधिलकीमध्ये भावनिक आधार हाही महत्त्वाचा भाग अंतर्भूत असतो. वेळप्रसंगी हजर राहाणे आणि जोडीदाराच्या समस्या लक्षपूर्वक ऐकणं.

स्वत:चे साध्य मिळवण्याच्या हेतूने जोडीदारासाठी आपला वेळ आणि शक्ती खर्च करणे हेही बांधिलकीमध्ये येते. एखाद्या जोडीदाराच्या आनुवंशिक गुणांशी बांधिलकी पुनरुत्पादनातून व्यक्त होते. प्रेमाच्या मूलभूत कृती म्हणून मानल्या गेलेल्या ह्या सगळ्या गोष्टी माणसाला लैंगिक, आर्थिक, भावनिक आणि आनुवंशिक साधनांची बांधिलकी देतात.

प्रेम ही जागतिक घटना आहे. पुनरुत्पादनाशी संबंधित साधनसंपत्तीच्या बांधिलकीची सूचना ह्या प्रेमाच्या प्राथमिक कृतीतून मिळत असल्यामुळे स्वाभाविकच स्त्रिया जोडीदार शोधताना प्रेमाला प्राधान्य देतात. हे शोधून काढण्यासाठी सू स्प्रेचर आणि तिच्या सहकाऱ्यांनी अमेरिकन, रशिया आणि जपानी विद्यार्थ्यांना विचारले की त्यांना हवा तसा सर्वगुणसंपन्न जोडीदार समोर आहे; पण ते त्याच्या प्रेमात पडलेले नाहीत, तर ते अशा जोडीदाराशी लग्न करतील का? इतर सगळे गुण असले तरी लग्नासाठी प्रेम आवश्यकच आहे असे ८९ टक्के अमेरिकन स्त्रियांनी ८२ टक्के जपानी स्त्रियांनी प्रतिपादन केले. पण रशियनांपैकी फक्त ६९ टक्के स्त्रिया ज्याच्यावर त्यांचे प्रेम नाही अशा पुरुषाबरोबर विवाह करायला तयार नाहीत मग भले त्याच्याजवळ हव्याश्या वाटणाऱ्या कितीका गोष्टी असेनात. बहुसंख्य रशियन स्त्रियांना जरी प्रेमाची आवश्यकता वाटत असली तरी उरलेल्या स्त्रियांना जोडीदार मिळवणेच अवघड वाटते आहे कारण पुरुषांची संख्या कमी आहे, त्यातदेखील साधनसंपत्ती पुरवू शकतील असे पुरुष अगदीच नगण्य आहेत. संस्कृतींच्या संदर्भात ह्या दोन अंतरांचा परिणाम जोडीदार निवडण्याच्या प्रक्रियेवर होतो. असे असले तरीही ह्या तीनही संस्कृतींमधल्या स्त्रिया विवाहासाठी प्रेम हा अत्यावश्यक घटक मानतात.

जोडीदाराकडच्या आवश्यक घटकांच्या प्राधान्यांचा अभ्यास केला असता प्रेमाचे मध्यवर्ती स्थान निश्चित होते. टेक्सासच्या मुलींच्या कॉलेजमधल्या विद्यार्थिनींपैकी १६२ मुलींना जोडीदार निवडताना आवश्यक वाटणाऱ्या १०० वैशिष्ट्यांपैकी प्रेमळपणा हा अत्यंत महत्त्वाचा व आवश्यक गुण नवऱ्याजवळ असावा असे वाटते. आंतरराष्ट्रीय अभ्यास पाहाणीतही सगळ्या संस्कृतींमध्ये प्रेमाचे महत्त्व सिद्ध झाले आहे. १८ वैशिष्ट्यांपैकी परस्पराकर्षण किंवा प्रेम ह्या गोष्टीला उभयलिंगी व्यक्ती सारख्याच मोठ्या प्रमाणात महत्त्व देतात. स्त्रिया हे महत्त्व २.८७ वर नेऊन ठेवतात, तर पुरुष २.८१ वर. म्हणजेच दोघांनाही वरील गोष्ट सारख्याच महत्त्वाची वाटते. दक्षिण आफ्रिकेच्या– सभोवती परकीय राज्ये असलेल्या– आदिवासी टोळ्यांमधल्या असोत की ब्राझील शहरामधल्या ओसंडून वाहाणाऱ्या रस्त्यांवरच्या असोत सगळ्या स्त्रिया लग्नाच्या हिशेबात प्राधान्य देतात ते प्रेमाला आणि ते अत्यावश्यकच आहे असा दावा करतात. स्त्रिया प्रेमाला महत्त्व देतात ते त्यांना पुरुषांची आर्थिक, भावनिक आणि लैंगिक बांधिलकी खात्रीपूर्वक मिळावी याकरिता.

आणखी दोन व्यक्तिगत गुण दीर्घकालीन बांधिलकीसाठी आवश्यक ठरतात ते म्हणजे

दयाळूपणा आणि प्रामाणिकपणा. ८०० स्त्रियांच्या जाहिराती तपासल्या असता वारंवार प्रामाणिकपणा हे वैशिष्ट्य यादीत समाविष्ट केलेले आढळले. दुसऱ्या एका पाहाणीत ११११ व्यक्तिगत जाहिराती तपासल्या असता स्त्रियांनी परत एकदा प्रामाणिकपणा हाच गुण वारंवार उल्लेखिलेला आहे असे आढळले. पुरुषांपेक्षा चार पटीने अधिक स्त्री जाहिरातदारांनी प्रामाणिकपणा हवा असे म्हटले आहे. व्यक्तिगत जाहिरातींमध्ये प्रामाणिकपणा हा शब्द बांधिलकी ह्या शब्दासाठी सांकेतिक शब्द आहे. थोडक्यात ज्या ज्या पुरुषांना फक्त तात्पुरते संबध हवे आहेत आणि बांधिलकी नको आहे त्यांना दूर ठेवण्यासाठी हा शब्द स्त्रियांनी वापरलेला असतो.

जगभर लोक आपल्या जोडीदाराच्या कनवाळूपणावर अवलंबून राहातात. जोडीदार निवडी संबंधीच्या आंतरराष्ट्रीय पाहाणीमध्ये असे दिसले आहे की स्त्रिया दयाळू आणि समजूतदार जोडीदाराची निवड आवर्जून करतात. खरे पहाता ३७ पैकी ३२ संस्कृतींमध्ये जोडीदारामध्ये असण्याची शक्यता असलेल्या १३ वैशिष्ट्यांपैकी; अत्यावश्यक अशा ३ वैशिष्ट्यांमध्ये दयाळूपणाचा समावेश स्त्री आणि पुरुष दोघांनीही सारख्याच प्रमाणात केला आहे. जपान आणि तैवानमध्ये मात्र स्त्रियांपेक्षा पुरुषांनी दयाळूपणावर भर दिला आहे. फक्त इस्त्राएल नायजेरिआ आणि फ्रान्समध्ये स्त्रियांनी पुरुषांपेक्षा अधिक प्रमाणात दयाळूपणच्या बाजूने कौल दिला आहे. मात्र कोणत्याही संस्कृतीमध्ये उभयलिंगी व्यक्तींनी दयाळूपणाला १३पैकी ३च्या खाली उतरवला नाही.

दयाळूपणा हा व्यक्तिमत्वाचा चिरकाळ टिकणारा गुणधर्म आहे आणि त्यात अनेक घटक अंतर्भूत आहेत. पण त्या सगळ्यांची गोळाबेरीज काढली तर दयाळूपणा म्हणजे साधनसंपत्तीची बांधिलकी, मुलांबद्दल कणव, जोडीदाराची गरज आधी भागविण्याची इच्छा आणि स्वत:ची ताकद आणि प्रयत्न (फक्त स्वत:च्या स्वार्थासाठी, स्वत:चे ध्येय साधण्यासाठी उपयोगात न आणता) जोडीदाराचे ध्येय साधण्यासाठी उपयोगात आणणे. एवढ्या गोष्टी ह्या गुणवैशिष्ट्याने सूचित होतात. दुसऱ्या शब्दात सांगायचे तर दयाळूपणा म्हणजे स्वत:ची ताकद आणि साधनसंपत्ती नि:स्वार्थपणे आपल्या जोडीदारासाठी खर्च करण्याची माणसाची कुवत आणि इच्छा.

दयाळूपणाचा अभाव असेल तर स्वार्थीपणा, बांधिलकीची अक्षमता किंवा अनिच्छा आणि जोडीदारालाच ह्या गोष्टीची किंमत मोजावी लागण्याची शक्यता इतक्या गोष्टी संभवतात. नवविवाहितांच्या एका पाहाणीत पुरुषाचे स्वयंमूल्यांकन, त्यांच्या पत्नीचे त्याच्या संबंधीचे परीक्षण, स्त्री आणि पुरुष मुलाखतकाराचा त्याच्यासंबंधीचा अंदाज ह्यावरून दयाळूपणाचा अभाव असेलेल (निर्दय) नवरे शोधून काढले आणि मग त्यांच्या बायकांच्या त्यांच्याबदलच्या तक्रारींचा अभ्यास केला. अशा निर्दय पुरुषांबद्दल त्यांच्या बायकांची अशी तक्रार होती की ते शाब्दिक आणि शारीरिक अशा दोन्ही प्रकारे त्रास देतात – मारतात, थोबाडीत देतात, त्यांच्यावर

थुंकतात. निर्दय पुरुष आपण बायकोमुळे खालच्या दर्जावर आलो आहोत असा कांगावा करून बायकोची मते मूर्खपणाची किंवा सामान्य आहेत असे ठरवतात. ते स्वार्थी असतात आणि एकत्रित साधनसामुग्रीवर आपला ताबा ठेवतात. ते अविवेकी असतात. काहीही घरकाम करीत नाहीत. ते बेजबाबदार असतात. कबूल केलेले काहीही देत नाहीत. त्यांचे विवाहबाह्य संबंध असतात. एकपत्नीव्रती असणे ह्यांना शक्य नाही किंवा त्यांची इच्छा नाही. निर्दय माणसे स्वत:पुरतीच विचार करतात. त्यापेक्षा अधिक विचार करायला त्यांना फार कष्ट पडतात.

पुनरुत्पादनासाठी अत्यंत महत्त्वाच्या असणाऱ्या घटकांपैकी लैंगिक संबंध ही गोष्ट स्त्री देऊ शकते. स्वाभाविकच स्त्रीजवळ अशी मानसिक यंत्रणा असते की ती सहजासहजी कोणालाही अविचाराने ही गोष्ट देऊ इच्छित नाही. ही महत्त्वाची गोष्ट दिल्याबद्दल ती पुरुषांकडून त्या प्रमाणात प्रेम, प्रामाणिकपणा आणि दयाळूपणा ह्या बांधिलकी दर्शविणाऱ्या गोष्टींची खात्री करून घेते. जुळवून घेण्याच्या पुनरुत्पादनाच्या क्रियेत तिची बाळे नीट जगावीत व वाढावीत म्हणून प्रेम व दयाळूपणा ह्या गोष्टींमुळे स्त्रीला साधनसामुग्रीची बांधिलकी पुरुषापासून मिळवता येते.

**जेव्हा स्त्री सत्ताधारी असते –**

स्त्रीच्या अबला म्हणून असलेल्या भूमिकेपेक्षा ती जेव्हा अधिक शक्तिवान असते तेव्हा तिची पुरुषाच्या निवडीसंबंधी वेगळी भूमिका असते. पुरुषप्रधान संस्कृतींत स्त्रीला सत्ता आणि संपत्तीपासून दूरच ठेवले जाते आणि पुरुषच सत्तेवर असतात. साहजिकच स्त्री आपल्यापेक्षा सत्ता संपत्ती, स्थान आणि कमावण्याची अधिक क्षमता असलेल्या पुरुषाची निवड करते. पुरुष साधनसंपत्तीचा विचार जोडीदाराची निवड करताना करीत नाहीत. कारण सगळ्या संपत्तीवर त्यांच्याच ताबा असते. शिवाय स्त्रीजवळ स्वत:ची मालमत्ता नसतेच.

पश्चिम आफ्रिकेतल्या कामेरूनमधल्या बकवारी समाजाकडे पाहिले तर वरील विवेचनाबाबत शंका यावी अशी परिस्थिती आहे. स्त्रीजवळ खरीखुरी सत्ता असेल तर काय होऊ शकेल हे इथे अनुभवता येते. बकवारी स्त्रीजवळ स्वत:ची मालमत्ता असते. त्यामुळे तिला आर्थिक आणि वैयक्तिक सत्ता असते. शिवाय पुरुषांपेक्षा स्त्रियांची संख्या अगदीच कमी आहे. स्वत: मेहनत करून आणि बागायतीमधून स्त्रिया ही संपत्ती मिळवतातच, शिवाय तात्पुरत्या लैंगिक संबंधातूनही पैसा मिळवतात. हाही एक किफायतशीर धंदा आहे. १०० स्त्रियांमागे २३६ पुरुष असे प्रमाण इथे आहे. ह्या असंतुलीत प्रमाणाने बाहेरून पुरुषांचे लोंढेच्या लोंढे मळ्यात काम करण्यासाठी येत असतात. ह्या टोकाच्या विषमतेमुळे जोडीदार निवडण्यासाठी फार मोठे स्वातंत्र्य स्त्रीला मिळू शकते. म्हणून इथे स्त्रियांजवळ पुरुषांपेक्षा भरपूर पैसा आहे आणि निवडीसाठी भरपूर पुरुष उपलब्ध आहेत. असे असूनही बकवारी स्त्रीला मालमत्ता असलेलाच नवरा हवा असतो. आपल्या नवऱ्याकडून पुरेशा प्रमाणात आधार मिळत नाही अशी तक्रार ह्या स्त्रिया सदैव करीत

असतात. अपुरी आर्थिक मदत हेच कारण बरेचदा घटस्फोटांमागे असते. अधिक पैसा पुरवू शकेल आणि अधिक हुंडा देऊ शकेल असा माणूस दृष्टिपथात आला तर बकवारी स्त्री आपला नवरा बदलते. पूर्वीपासून चालत आलेल्या समजुतींप्रमाणे अधिक मालमत्तेच्या पुरुषाला प्राधान्य देणे शक्य असेल तेव्हा त्या तेच करतात. वरकडी करणारी आर्थिक सत्ता हातात असली तरी जोडीदार निवडीमागचे आर्थिक मालमत्तेचे सूत्र वरचढच राहाते.

अमेरिकेतील व्यावसायिक आणि आर्थिकदृष्ट्या यशस्वी स्त्रियासुद्धा पुरुषाच्या साधनसामुग्री महत्त्व देतात. नवविवाहितांच्या एका पाहाणीत त्यांच्या पगारावरून आणि उत्पन्नावरून आर्थिकदृष्ट्या यशस्वी असलेल्या स्त्रियांनी केलेली निवड ही कमी पगार व उत्पन्न असलेल्या म्हणजेच आर्थिकदृष्ट्या निम्नस्तरावर असलेल्या स्त्रियांपेक्षा वेगळ्या होत्या. ह्या यशस्वी स्त्रिया वार्षिक ६०,००० डॉलर्स मिळवीत होत्या आणि काहींना तर एक लाख डॉलर्स मिळत होते. ह्या स्त्रिया उच्चशिक्षित होत्या, त्यांचेजवळ व्यावसायिक पदव्या होत्या आणि स्वत:चा मानमरातब होता.तरीही त्यांच्यापेक्षा दुय्यम दर्जाच्या ज्या स्त्रिया होत्या त्यांच्यापेक्षाही व्यावसायिक पदव्या, उच्च सामाजिक स्थान, उत्तम बुद्धिमत्ता आणि भरपूर उंची, स्वतंत्र, आत्मविश्वास ह्या गुणांना त्यांनी जोडीदार निवडताना फार महत्त्व दिले.स्पष्टच सांगायचे तर त्या दुय्यम स्त्रियांपेक्षा भरपूर उत्पन्न असलेला जोडीदारच हवा असा आग्रह धरला.मायकेल वाइडरमेन आणि एलिझाबेथ ऑलजिअर ह्या मानसशास्त्रज्ञांनी केलेल्या एका वेगळ्यात पाहाणीत कॉलेजमध्ये शिकत असलेल्या ज्या विद्यार्थिनींना शिक्षणानंतर भरपूर पैसा मिळवता येण्याची अपेक्षा आहे, त्यांनी स्वत:ला कमी उत्पन्नाची अपेक्षा करणाऱ्या स्त्रियांपेक्षा आर्थिक बाजूला अधिक महत्त्व दिले. व्यावसायिक दृष्ट्या यशस्वी स्त्रिया म्हणजे डॉक्टर व वकील स्त्रिया ह्या जोडीदाराच्या कमाईच्या शक्यतेवर अधिक भर देतात. याउलट कमी उत्पन्न गटातले पुरुष अधिक उत्पन्न गटातल्या पुरुषांइतकेच जोडीदाराच्या मालमत्तेला महत्त्व देतात. म्हणजेच, स्त्रीला सत्ता नाही म्हणून ती विशिष्ट पद्धतीने वागते हे गृहीतक खोटे तर ठरतेच पण सरळसरळ विरोधात जाते.

समाजरचनेत स्त्रीला सत्तास्थानांपासून दूर ठेवलेले आहे आणि पुरुष सगळ्या आर्थिक नाड्या ठेवतात हे सत्य आहे. पण ह्या सिद्धान्ताने खालील गोष्टींचा खुलास होऊ शकत नाही की –

——— पुरुष दुसऱ्या पुरुषाना सत्तेपासून दूर ठेवण्याचा –
——— (कमीतकमी स्त्रियांना जेवढे दूर ठेवतात तेवढी तरी — ) प्रयत्न करतात का?
——— साधनसंपत्तीवर तावा ठेवण्याच्या पुरुषांच्या मूळ वृत्तीचा खुलासा होत नाही.
——— स्त्रियांना स्वत:च साधनसंपत्ती मिळवता यावी असा मजबूत धिप्पाड बांधा का विकसित झाला नाही.
——— पुरुषांची जोडीदारासंबंधीची आवड कायमच गूढ, अज्ञात राहिली.

विकासाच्या मानसशास्त्रात ह्या सगळ्यांचा एकत्रित विचार केला गेला. स्त्रीच्या जोडीदार निवडीला आपण योग्य ठरावे म्हणून इतर पुरुषांना दूर सारून स्वत: मालमत्तेचा ताबा घेण्याचा आटोकाट प्रयत्न पुरुष करीत राहिले. माणसाच्या विकासाच्या इतिहासात ज्या पुरुषांना साधनसंपत्ती जमवता आली नाही, त्यांना जोडीदाराला आकर्षित करता आले नाही. गेली हजारो वर्षे पुरुषाचे बलदंड शरीर आणि उच्च स्थान हीच सर्वसाधारणपणे स्त्रियांच्या निवडीची सूत्रे ठरून गेलेली आहेत.

**स्त्रियांचे अनेक प्राधान्य विषय –**

स्त्रियांना काय हवे असते हे उकलण्यासाठी आता बरीचशी सामुग्री आपण जमा केलेली आहे. स्त्रिया ज्याला जोडीदार म्हणून निवडणार त्याचेबद्दल विचाराने, दूरदर्शीपणे, विवेकीपणे विचार करूनच त्याची निवड करतात. कारण त्यांना पुनरुत्पादनाच्या संदर्भात अत्यंत महत्वाच्या अशा बाबी पुरुषाला द्यायच्या असतात. ह्या गोष्टी अविचाराने उधळता येत नाहीत. पूर्वजस्त्रियांना निवड चुकली तर पुनरुत्पादनाच्या दृष्टीने ते फार महाग पडत असे – मारहाण, अन्नाची टंचाई, रोगराई, मुलांना मारहाण, आणि सोडून देणे ह्या गोष्टींचा धोका असे; पण समजा निवड उत्तम ठरली तर पोषक आहार, संरक्षण आणि पितृत्वाची जबाबदारी ह्या गोष्टी मुलांना भरपूर प्रमाणात मिळतात. कायमस्वरूपी जोडीदारांना कल्पनाही नसते असा साधनसंपत्तीचा खजिना ते बाळगून असतात. ज्याच्याजवळ भरपूर साधनसंपत्तीचा स्त्रोत आहे अशा जोडीदाराची निवड करणे ही अतिशय गुंतागुंतीची आणि अवघड गोष्ट आहे. प्रत्येक गुणवैशिष्ट्याला डझनावरी टोकाचे पर्याय असतात आणि ते प्रत्येक प्रकारच्या साधनसंपत्तीशी अशा प्रकारे जोडले गेलेले असतात की त्याचा उपयोग स्त्रीला अस्तित्वाची समस्या सोडविण्यासाठी होतो.

कायमस्वरूपी जोडीदारामध्ये स्त्रिया साधनसंपत्ती शोधतात हे कदाचित योग्यच असेल. तूर्तास असणाऱ्या, पुढे मिळू शकणाऱ्या संपत्तीच्या सूचना ज्यातून मिळतात अशा वैशिष्ट्यांवर ही निवड अवलंबून राहाते, कारण उपलब्ध संपत्ती नेहमीच खुल्या स्वरूपात दिसतेच असे नाही. महत्त्वाकांक्षा, दर्जा, बुद्धिमत्ता आणि वय ह्या संपत्तीच्या खुणा दर्शविणाऱ्या वैशिष्ट्यांकडे उपलब्ध पैशांपेक्षा त्या अधिक आकर्षित होतात. ह्या गुणवैशिष्ट्यांचे स्त्रिया काळजीपूर्वक परिशीलन करतात. कारण ह्याच गुणातून पुरुषाचे महत्त्व ठरवता येते. पुरुषांमध्ये नुसते गुण असून भागत नाही. असे गुण असणारे पुरुष कधीकधी तात्पुरत्या लैंगिक संबंधावर समाधान मानतात आणि स्त्रीला बांधिलकीच्या समस्येला तोंड द्यावे लागते. प्रेम आणि प्रामाणिकपणा ह्या दोन गोष्टींनी बांधिलकीचा प्रश्न सुटू शकतो. प्रामाणिकपणामुळे पुरुष बांधिलकी सांभाळू शकेल हे लक्षात येते. प्रेमामुळे हा पुरुष ह्या विशिष्ट स्त्रीशी बांधला गेला आहे हे लक्षात येते.

पूर्वीच्या काळी स्त्रियांना प्रेम आणि बांधिलकी देणारा पण ज्याला दुसरे सहज लोळवू शकतील असा जोडीदार मिळाला तर फारच अवघड होत असेल. अशक्त, लहानखुऱ्या

पुरुषाबरोबर राहाण्यामध्ये इतरांनी त्यांच्या मालमत्तेचा नाश करण्याचा धोका होता. उंच, मजबूत, क्रीडाकुशल पुरुष पूर्वीच्या काळी स्त्रियांना संरक्षण देत असत. त्यामुळे त्यांची मालमत्ता सुरक्षित राहू शकत असे. ज्या स्त्रियांनी निवड करताना जोडीदाराच्या ताकदीचा आणि सत्तेचाही विचार केला त्या अस्तित्वाच्या स्पर्धेत आणि पुनरुत्पादनाच्या स्पर्धेत अधिक यशस्वी झाल्या.

जर नवरा आजारी पडला, मेला किंवा जोडपे अनुरूप नसेल तर संपत्ती, बांधिलकी आणि संरक्षण असूनही स्त्रीला फार फायदा होत नाही. पुरुषाच्या आरोग्याला स्त्रिया फार महत्त्व देतात, कारण त्यामुळे त्यांना दीर्घकाळपर्यंत ह्या सुविधा तो पुरवू शकणार असतो. त्याची इच्छा आणि मार्ग ह्यांचा मागोवा ज्या स्त्रिया घेतात त्या दोघे मिळून एखादी गोष्ट करण्यात यशस्वी होतात. हजारो वर्षांपूर्वी आमच्या पूर्वजस्त्रियांना अस्तित्वासाठी जे प्रश्न सोडवावे लागले त्याच्याशी आजच्या स्त्रियांचे प्रश्नही अगदी मिळते जुळतेच आहेत. पूर्वज पुरुषांना मात्र अगदी वेगळ्याच स्वरूपाच्या समस्यांना जुळवून घेण्याच्या क्रियेत तोंड द्यावे लागले. ह्या परिस्थितीत ह्या पूर्वज पुरुषांनी त्याकाळच्या स्त्रियांकडे जोडीदार म्हणून कोणत्या दृष्टीने पाहिले असा थोडा वेगळा विचार आपण पुढल्या लेखात करू.

---

निसर्ग हा सुंदर बनण्यासाठी कीर्तीदायी आणि अस्थिरता अशा प्रवृत्ती दाखवितो, निसर्गातील गोष्टी खरोखरच कीर्तीदायी (Glorious) असतात. परंतु त्यातला जो अस्थिरतेचा भाग आहे, त्याबद्दलचे स्पष्टीकरण आवश्यक आहे.

निसर्गाची सौंदर्याकडे जाणारी प्रवृत्ती मला काही वेळा अस्वस्थ करते, याचे कारण निसर्ग हा मुळातच भावना नसलेला, कठोर, आणि भीडमुर्वत न ठेवणारा आहे, हे मला एक जीवशास्त्रज्ञ म्हणून ज्ञात आहे. एखादे बालक थांबते, आणि उताण्या पडलेल्या झुरळाला, कीटकाला, पुन्हा पालथे धरून, पायावर उभे करण्याकरता आपला वेळ खर्च करते. या निरागस भावनेची बरोबरी करील असे निसर्गात फारच थोडे आहे. निसर्गात 'जंगल'चाच कायदा जारी आहे. सर्व प्राण्यांचे एकमेकावरोबर अखंड युद्ध चालू असते. ज्ञात असलेल्या सर्व प्राण्यांपैकी किमान दहा टक्के हे बांडगुळाप्रमाणे जीवन कंठणारे, प्राणी आहेत. या दुसऱ्यांचे शोषण करणाऱ्या प्राण्यांचा एकमेव उद्योग, 'आपल्या यजमानांना' त्रास देणे, त्यांना कमकुवत बनविणे, आणि त्यांना विद्रुप करणे हाच आहे. दूरचित्रवाणीवर अत्यंत काळजीपूर्वक चाळणी लावल्यानंतर प्रक्षेपित होणारा निसर्ग, हा रोमँटिक असतो. या दृष्यातून एक हिंस्त्र व पाशवी सत्य लपविलेले असते. हे सत्य कोणते? या पृथ्वीतलावरील जवळ जवळ सर्वच प्राणी आपल्याशिवाय इतरांच्या भीतीच्या छायेत सतत वावरतात. ही त्यांची भीती वाजवीच असते. अथवा त्यांच्याकडे पाहुणे म्हणून आलेले बांडगुळेवजा प्राणी एक गोष्ट निश्चितच करतात. या बांडगुळांचे यजमान हळूहळू मृत्यू पावून, आपल्या उदारतेची किंमत चुकती करतात. **–लिआल वॉटसन**

# समाजशास्त्र व इतिहास

## कहाणी साखरेची

सौ. सुमती जोशी

### पाश्चात्त्य देशात

प्रबोधन काळाची सुरुवात झाली आणि जगाचा चेहरामोहराच बदलला. विद्या, कला यांचे पुनरुज्जीवन झाले. विज्ञान तंत्रज्ञानात मानवाने प्रगती केली. दळणवळणाची अतिप्रगत साधने उपलब्ध झाली आणि मानवाने जगाला गवसणी घालण्यास सुरुवात केली. माणसाच्या जीवनपद्धतीत आणि राहणीमानात आमूलाग्र बदल घडून आला. विज्ञान तंत्रज्ञानाला वेठीला धरून आपले जीवन अधिकाधिक सुखदायक व स्वास्थकारक करण्याचा मानवाचा सतत प्रयत्न चालू राहिला. अनेक अन्नपदार्थांची प्रादेशिकता संपुष्टात आली. दळणवळणाच्या गतिमान साधनांमुळे जगाच्या कानाकोपऱ्यात होणारे अन्नपदार्थ जगाच्या पाठीवर कोठेही सहजी उपलब्ध होऊ लागले. सुदृढ प्रकृती, उत्तम आयुरारोग्य या ढोवळ उद्देशांबरोबर कित्येकदा रसनेची तृप्ती करण्याकरता माणूस कित्येक खाद्यपदार्थ दैनंदिन जीवनात वापरू लागला. माणूस हा सवयीचा गुलाम असतो. याची प्रचीती अल्पकाळात मानवाला आली. काही खाद्यपदार्थांनी मानवाचा कब्जा घेतला. चहा, कॉफी, साखर, कोको यासारख्या पदार्थांचा माणूस गुलाम झाला. एके काळी अनोळखी आणि अज्ञात असलेल्या चहा, कॉफीशिवाय माणसाचा 'दिवस' सुरू होईनासा झाला. मानवी मेंदू उत्तेजित करण्यासाठी. मनाला प्रसन्नता आणण्यासाठी आणि शरीर तरतरीत होण्यासाठी चहा कॉफीसारखी पेये अत्यावश्यक झाली. हे सर्व कसे घडून आले याचे समाजशास्त्रीय दृष्टिकोनातून सिंहावलोकन करणे हे चहा पिण्याइतकेच उत्तेजक ठरेल!

### मध्ययुग

इ. स. ५०० ते १४५३ या प्रदीर्घ काळाचे पाश्चिमात्य ऐतिहासिक दृष्ट्या दोन भाग पडतात. इ. स. ५०० ते ११०० मध्ययुगीन काळाचा पूर्वार्ध! सहाशे वर्षाच्या या काळात कला, विज्ञान, तंत्रज्ञान यासारख्या कोणत्याच क्षेत्रात मानवाने फारशी प्रगती केली नाही. म्हणून तर त्याला "डार्क अेजेस" काळोखा काळ म्हणतात. इ. स. ११०० ते १४५३ हा मध्ययुगीन काळाचा उत्तरार्ध. स्वतंत्र राज्ये, व्यापार उदीम यांची वाढ, शहरीकरण, एकाधिकारशहांना प्राप्त झालेली प्रचंड सत्ता आणि त्या अनुषंगाने येणारे अधिकार, सत्तेसाठी होणारी चढाओढ आणि ती सत्ता मिळवण्यासाठी होणारी युद्धे हे या काळाचे वैशिष्ट्य! मध्ययुगाच्या उत्तरार्धात पाश्चात्त्य जगतातील जनसामान्यांवर चर्चचा प्रचंड पगडा होता. तेथे धार्मिक सत्ता ही महासत्ता बनू लागली होती. साहाजिकच धर्मगुरू "पोप" यांना एखाद्या राजासारखे अधिकार प्राप्त झाले होते. वारंवार होणारी



अनुक्रमणिका

धर्मयुद्धे, धार्मिक यात्रांची महती, नव्याने उभारली जाणारी चर्चेस आणि त्या अनुषंगाने दिल्या जाणाऱ्या शिष्यवृत्या यासारख्या अनेक गोष्टी तत्कालीन जनमानसावरील चर्च आणि धार्मिकतेच्या प्रभावाची प्रचीती देतात.

**प्रबोधनकाळ**

मध्ययुगाच्या अस्ताबरोबर प्रबोधनयुगाची पहाट या पृथ्वीच्या पश्चिमेकडील अर्धगोलात ज्ञानाचा प्रकाश घेऊन अवतरली. चौदाव्या शतकाच्या अखेरीस आणि पंधराव्या शतकाच्या सुरूवातीला इटलीमधील 'फ्लॉरेन्स' येथे प्रबोधनयुगाची सुरुवात झाली. पंधराव्या शतका–अखेरीनंतरच्या काळात फ्लॉरेन्सबरोबर रोम,व्हेनिस या शहरांचे महत्त्व वाढत गेले. या काळाला 'प्रभावी प्रबोधनकाळ (हाय रेनिसान्स) असेही संबोधतात. लिओनार्दो दि व्हिन्सी आणि मायकेल अँजेलो या दोघांची गणना 'प्रबोधनकाळाचे प्रतिनिधी' म्हणून होऊ लागली. प्रबोधनकाळातील सर्व संकल्पना इटलीच्या सरहद्दी ओलांडून पश्चिम युरोपमध्ये पोचल्या. सुमारे शतकभर ही प्रक्रिया चालू होती. ड्यूरर, इरॅस्मस, मॉतेन, शेक्सपिअर यासारख्या धुरिणांवर प्रबोधनकाळाचा परिणाम झाला. इटलीतील पंधराव्या शतकातील मानवतावाद्यांना आपण प्रबोधनयुगाचे प्रतिनिधी असल्याचा सार्थ अभिमान वाटत असे. इटालियन द्वीपकल्पाची कीर्ती दिगंत पसरविण्यास त्यांनी हातभार लावला. या काळात प्रामुख्याने सांस्कृतिक क्रांती घडून आली. इ. स. १४५३ साली दुसऱ्या मॅहोमेठच्या (Mahomet ) टर्किश टोळ्यांनी कॉन्स्टंटिनोपलवर कब्जा मिळवला आणि इस्लाम युरोपच्या प्रवेशद्वारापाशी येऊन ठेपला. आता मात्र युरोपला आपल्या अस्तित्वाची जगाला जाणीव करून देण्याची गरज भासू लागली. अन्य देशवासियांपेक्षा सांस्कृतिक दृष्ट्या तत्कालीन युरोप अग्रेसर होता. आपल्या या मूल्यांचा प्रचार व प्रसार करण्यासाठी युरोपीय लोक वेगळ्या दृष्टीने विचार करू लागले. तुर्कांचा विजय हा इतिहासाला वेगळे वळण लावणारा ठरला.

प्रबोधनकाळ म्हणजे नुसता कला आणि संकल्पना या क्षेत्रांतील सौंदर्यदृष्टीत प्रगती करणारी चळवळ नव्हती. या काळात मोठ्या प्रमाणावर आर्थिक पुनरुज्जीवनही झाले. हजारो वर्षापूर्वी आपल्या पूर्वजांनी घालून दिलेल्या पायंड्याप्रमाणे युरोपियनांनी आचरण करण्यास सुरूवात केली. पश्चिमेकडील मर्यादित क्षितिजापलीकडे युरोपियनांनी आपली दृष्टी वळवली.

सोळाव्या शतकापूर्वी दुष्काळ, पूर, भूकंप, ज्वालामुखी, रोगराई यासारख्या निसर्गाच्या कोपामुळे जीवितवित्त हानी होत असे. प्रबोधनकाळानंतर मात्र काही प्रमाणात या नैसर्गिक आपत्तींना यशस्वीपणे तोंड देता येऊ लागले. जन्म, मृत्यू, रोगांची संक्रमणे यांची नोंद ठेवली जाऊ लागली. पृथ्वीवरील लोकसंख्या हळूहळू वाढू लागली आणि या साऱ्यांच्या उदरभरणाची सोय करणे आवश्यक झाले. अधिक प्रमाणात अन्नपदार्थ मिळविण्याची, ते टिकविण्याची आणि त्यापासून तऱ्हतऱ्हेचे पदार्थ तयार करण्याच्या पद्धतींची निकड भासू लागली. माणसाच्या

आयुर्मर्यादेत लक्षणीय वाढ झाली.

मध्ययुगाच्या अखेरपर्यंत 'हेरिंग' मासे पकडणे आणि त्यांचा व्यापार करणे हा डचांचा प्रमुख व्यवसाय होता. त्यांत त्यांनी भरपूर पैसा कमावला होता. आता प्रबोधकाळात हेरिंग माशांच्या संख्येत लक्षणीय घट झाल्यामुळे उदरनिर्वाहासाठी दुसरा काहीतरी व्यवसाय शोधणे डचांना अपरिहार्य झाले होते. नेमक्या याच वेळी इटलीतील जिनोआ, व्हेनिस आणि फ्रान्समधील प्रॉव्हिन्स या भागातील व्यापारी भूमध्यसामुद्रिक प्रदेशात आपले आसन बळकट करून बसले होते. या व्यापाऱ्यांशी स्पर्धा करणे किंवा उद्योगधंद्यावर वर्चस्व मिळवणे डचांना क्रमप्राप्त झाले होते. मध्यंतरीच्या काळात पोर्तुगीज खलाशी अटलांटिकच्या किनाऱ्या किनाऱ्याने प्रवास करीत होते आणि आपल्या अस्तित्वाची जाणीव करून देत होते. भूमध्यसामुद्रिक प्रदेश हे व्यापाराचे फार मोठे केंद्र असल्यामुळे या प्रदेशाभोवती युरोपीय उद्योजक आणि व्यापाऱ्यांची दाटी झाली होती. अमर्याद दर्यासुद्धा या मंडळींना थिटाच वाटू लागला. त्यामुळे कोणीतरी या प्रदेशापासून दूर जाऊन नवीन भूमीचा शोध घेणे आवश्यक झाले होते.

प्रबोधनयुगात अन्नपाण्याच्या गरजेइतके द्रव्य प्रत्येक व्यक्तीला मिळावे अशी आर्थिक स्थित्यंतरे चालू होती. आधुनिक विज्ञानाने नवनवीन तंत्रज्ञान दिले. यंत्रे आणि कारखाने यांचे शहरातील प्रमाण वाढले. रोजगार देणाऱ्या या नवीन स्थानाकडे खेड्यातील लोकांचे लोंढे येऊ लागले आणि लोकसंख्येच्या दृष्टीने शहरे विस्तारली. शेतकी उत्पादनात घट झाल्यामुळे लोकांना आपल्या आहारात बदल करावा लागला. वनस्पतिजन्य प्रथिनांपेक्षा प्राणिजन्य प्रथिने मिळवण्याकडे या शहरी माणसांचा कल दिसू लागला. त्यामुळे मासेमारी आणि गुरे पाळण्याच्या व्यवसायाला प्रोत्साहन मिळाले. मांस व मासे टिकविण्यासाठी आणि त्यापासून खाद्यपदार्थ तयार करण्यासाठी मीठ मसाल्याची अधिकाधिक गरज भासू लागली "पदार्थ टिकवण्यासाठी वापरले जाणारे पदार्थ" अशी मसाल्याच्या पदार्थाची व्याख्या आहे. त्यानुसार 'साखर' हाही एक प्रकारे मसाल्याचा पदार्थच होय! पण साखर वापरणे हा त्याकाळात अरबांचा मक्ता होता. यंत्रयुगामुळे युरोपियनांच्या हातात पैसा खेळू लागला आणि हा महत्त्वाचा खाद्यपदार्थ घेणे युरोपियनांना परवडू लागले. साखरेच्या वापराबाबत युरोपियनांनी अरबांना केव्हाच मागे टाकले!

युरोपीय सातत्याने मोठमोठ्या सागरी सफरी काढत असत. अशा सफरीतून साखर आणि मसाल्याचे पदार्थ मिळवणे हे दक्षिण युरोपियनांचे ध्येय होते तर उत्तर युरोपियनांना हेरिंग्ज मासे आणि व्हेल माशांपासून मिळणारे तेल यांची आत्यंतिक गरज होती. अरब आणि अन्य मुसलमानांशी आर्थिक बाबतीतील चुरस हा सुद्धा या सफरीमागील अंतस्थ हेतू होता. युरोपियनांना लागणारे मीठ, मसाल्याच्या पदार्थासारखे खाद्यपदार्थ अतिपूर्वेकडील देशांकडून मिळवणे आणि आपल्या मायभूमीतून वैशिष्ट्यपूर्ण वस्तूंची मागणीनुसार निर्यात करणे या समुद्रसफरीमुळे शक्य होत असे. युरोपमधील प्रत्येक देशातील बंदरात आपली कार्यालये थाटून संपूर्ण आयात निर्यात

व्यापार सांभाळणारे व्यापारी हे सर्वात जास्त 'धूर्त' होते. या व्यापारातील जास्तीत जास्त 'मलिदा' या बोक्यांनी खाल्ला!

या संभवनीय व्यापाराचा स्वत:च्या फायद्यासाठी उपयोग करून घेण्यात पोर्तुगीज अग्रेसर होते. पोर्तुगीजांना धूर्त, धोरणी आणि चाणाक्ष राज्यकर्ते लाभले. साहसी आणि निर्भय दर्यावर्दी त्यांच्यापाशी होते! पैशाकरता काम करणाऱ्या भाडोत्री दर्यावर्दींचीही त्यांना वानवा नव्हती. साहाजिकच पोर्तुगालच्या राजाला युरोपचा पहिला किराणामालाचा व्यापारी होण्याचा बहुमान मिळाला. स्पॅनिश हे पोर्तुगीजांचे शेजारी! त्यांनी अत्यंत तत्परतेने शेजाऱ्यांचे अनुकरण केले. अन्य युरोपीय देशही या व्यापारात सहभागी झाले आणि कमीअधिक प्रमाणात यशस्वी झाले.

**ख्रिस्तोफर कोलंबस आणि नवे जग**

इ.स. १४४२ च्या सुमारास स्पेनमधील कॅस्टिलियन राजदरबाराने अरबांना दहशत बसवली होती. इ. स. १४६९ साली मध्य. स्पेनमधील कॅस्टिलची राजकन्या इसाबेला हिचा विवाह स्पेनमधील ॲरॅगॉन या विभागाचा प्रमुख 'फर्डिनांड' याच्याशी झाला. कॅस्टिल आणि ॲरॅगॉन या दोन विभागांचे एकत्रीकरण होऊन अखंड स्पेनची निर्मिती झाली. याचवेळी इटलीतील 'जिनोआ' येथे एक धाडसी स्पॅनिश दर्यावर्दी सुसंधीची वाट बघत होता. त्याचे नाव होते ख्रिस्तोफर कोलंबस! युरोपच्या पश्चिमेकडे अटलांटिक महासागर पार करून गेल्यास पुन्हा एकदा भारतात पोचता येईल आणि पृथ्वी गोल आहे या महत्त्वाच्या सिद्धान्ताला पुष्टी मिळेल असे धाडसी विचार त्याच्या मनात घोळू लागले अर्थात अशा योजना अंमलात आणणे राजाश्रयाशिवाय अशक्य होते. स्पेनचा राजा फर्डिनांड आणि राणी इसाबेला यांच्याकडून कोलंबसने अर्थसहाय्य मिळवले. तीन छोट्या बोटी घेऊन हा साहसी दर्यावर्दी समुद्रसफरीवर निघाला. इ. स. १४९२ साली त्याला करिबीअन बेटांचा (वेस्ट इंडीज) शोध लागला. इ. स. १४९३ ते १५०४ या कालखंडात त्याने एकूण तीन सफरी केल्या. इस १४९८ साली दक्षिण अमेरिका आणि मेक्झिको या भूमीवर त्याने पहिले पाऊल टाकले. कोलंबसने 'नव्या जगाचा' शोध लावून युरोपला व साऱ्या जगाला उपकृत करून ठेवले.

या सफरीवर निघताना कोलंबसने मार्को पोलोचे पुस्तक आणि इसवी सनाच्या पहिल्या शतकातील निसर्गतज्ज्ञ प्लीनीचे 'भूगोल' हे पुस्तक बरोबर घेतले होते. आपल्या या प्रदीर्घ आणि यशस्वी समुद्रपर्यटनातील सूक्ष्म निरीक्षणांवरून अनेक बारीक सारीक नोंदी कोलंबसने या पुस्तकाच्या समासामध्ये केल्या होत्या. या नोंदीत सोने आणि मसाल्याचे पदार्थ हे दोन शब्द समानार्थी शब्दासारखे वापरले असून त्यांचे उल्लेख अनेक वेळा येतात. 'वेस्ट इंडीज' या बेटांचा शोध लागल्यावर तर कोलंबसला स्वर्ग दोन बोटे उरला होता. आनंदातिशयाने त्याने आपल्या सफरीचा प्रणेता आणि पुरस्कर्ता स्पॅनिश राजा फर्डिनांड याला उद्देशून पत्र लिहिले.

"मला दाट लोकवस्ती असलेल्या अनेक बेटांच्या समूहाचा शोध लागला आहे. इथली

पर्वतराजी नयनमनोहर आहे. हजारो जातीच्या वनस्पतींनी ही पर्वतराजी सुशोभित झाली आहे. विस्तीर्ण पात्र असलेल्या अनेक नद्या आपले संजीवन घेऊन खळाळून वाहात आहेत. त्यांच्या पात्रांत छुप्या सुवर्णाचा साठा आहे. या बेटावर अनेक मसाल्याचे पदार्थ मुबलक प्रमाणात आहेत. सोने आणि इतर अनेक धातूंच्या खाणींची या बेटावर रेलचेल आहे. महाराज, आपल्याला लागेल तितके सोने मी आपल्याकरता आणीन. मसाल्याचे पदार्थ कापूस, गम, रेझिन्स असे अनेक पदार्थ मी मायदेशी घेऊन येईन.''

या पत्रातील भाषा उत्साहाने रसरसलेल्या आणि विजयोन्मादाने धुंद झालेल्या दर्यावर्दीला शोभेशी आहे. तसेच त्यांत राजाबद्दल प्रेम आणि आपुलकीची भावना आहे.

वेस्ट इंडिज बेटावर सोन्याच्या खाणी असल्या तरी या खलाशांची सोन्याची तहान भागवण्याइतक्या निश्चितच नव्हत्या. शिवाय खाणीतील सोने मिळवणे सहजसाध्य नव्हते. याउलट वनस्पतीजन्य पदार्थ मिळवणे सोपे होते. वृक्षराज आपल्या पानाफुलाफळांचा नजराणा घेऊन सज्ज असतात. कोणीही यावे आणि हा नजराणा हस्तगत करावा. युरोपवासीयांना या नजराण्याची चाहूल लागली. नवीन जगतातील टॉमेटो कोको यासारख्या युरोपियनांना अनोळखी असणाऱ्या पदार्थांमुळे युरोपियनांच्या आहारात आमूलाग्र बदल होणार होता. हे अपरिचित पण उत्कंठावर्धक खाद्यपदार्थ मिळवण्यासाठी अनेक युरोपीय देशांत चुरस आणि सत्तास्पर्धा निर्माण होणार याबद्दल कोणाच्याही मनात संदेह नव्हता. अशा चुरशीची झलक आपण मसाल्याच्या पदार्थांच्या इतिहासात पाहिलीच आहे.

या अनुकूल परिस्थितीचा युरोपीय धर्मपीठांनी पुरेपूर फायदा उठवला. धर्मपीठाचा जनमानसावरील पगडा लक्षात घेऊन सहावा पोप अलेक्झांडर याने ३ मे १४९३ रोजी स्पॅनिश आणि पोर्तुगीजांनी शोधलेल्या या 'नवीन जगात' वसाहती करणे हे आपले कर्तव्य आहे असे प्रतिपादन केले. येथे नुसत्या वसाहती करून भागणार नाही तर शेतकरी आणि बागाईतदारांनी हा प्रदेश लागवडीखाली आणला पाहिजे आणि याद्वारे कॅथलिक धर्माचा प्रचार आणि प्रसार तेथे केला पाहिजे असेही मत त्यांनी व्यक्त केले. या हेतूमुळे येथे वसाहती करण्यास आलेल्या युरोपियनांना नैतिक आणि धार्मिक अधिष्ठान प्राप्त झाले. त्या देशातील स्थानिक लोकांना कॅथलिक धर्माची शिकवण द्यावी. ही 'देवाज्ञा' युरोपियनांनी शिरोधार्य मानली. पण त्या शिकवणीच्या बदल्यात स्थानिकांना गुलामासारखे वागवण्यास सुरुवात केली. युरोपियनांची मसाल्याच्या पदार्थांची गरज भारत, श्रीलंका, इंडोनेशिया इत्यादी अतिपूर्वेकडील देशांकडून भागली होती. त्यामुळे मसाल्याच्या पदार्थांपेक्षा या नवीन जगतात होणाऱ्या इतर अन्नपदार्थांवर त्यांना आपले लक्ष केंद्रित करावयाचे होते. नवीन प्रदेशांतून या पदार्थांचे जास्तीत जास्त उत्पादन मिळवण्यासाठी त्यांना कमीत कमी पैशात, किंबहुना 'फुकट' उपलब्ध होणारे वेठबिगार हवे होते. एतद्देशीय, अडाणी, अशिक्षित, गरीब लोक या धूर्त आणि कावेबाज युरोपियनांच्या बेताला

बळी पडले. ख्रिश्चन धर्माची तत्त्वे प्रश्नोत्तरांच्या स्वरूपांत स्थानिकांना शिकवण्याचा उपक्रम युरोपियनांनी सुरू केला. अनेकांना ख्रिश्चन धर्माची दीक्षा दिली. परंतु आपले कुटिल कारस्थान तडीस नेण्यासाठी वठवलेले हे सोंग होते. धर्माच्या नावाखाली स्थानिक कामगार 'विनामूल्य' मिळवण्यात युरोपीय यशस्वी झाले. 'पैसा मिळवणे' हा एकमेव स्वार्थी उद्देश या वसाहती स्थापण्यामागे होता. या स्वार्थाबरोबर सहजच जाता जाता दुसऱ्याचा फायदा करून देता आला तर करावा, एतद्देशियांना सुशिक्षित, सुसंस्कृत करावे अशी सुतराम इच्छा युरोपियनांच्या मनात नव्हती. या उलट कित्येक स्थानिकांची निर्दय युरोपियनांनी क्रूर हत्या केली आणि नाश झालेल्या मानवी संपत्तीची भरपाई आफ्रिकेतील निग्रो गुलामांच्या रूपाने केली.

या नवीन भूमीवरील साखर, चहा, कॉफी, कोको आणि इतर अनेक पदार्थ मिळवण्यासाठी युरोपियनांमध्ये स्पर्धा सुरू झाली. पोटभर सुग्रास अन्न सेवन केल्यावर माणूस तृप्त होतो. आणि 'पुरे' म्हणतो म्हणून आपल्याकडे अन्नदानाचे महत्त्व सांगितले आहे. परंतु वित्तेषणा, सत्तेषणा या इतक्या वाईट प्रवृत्ती आहेत की तिथे माणसाला तृप्ती नाही, समाधान नाही. उलट त्याबद्दलची मानवाची हाव ही सतत वाढती असते; हा सर्वसाधारण नियम आहे. त्यानुसार चहा, कॉफी, साखर, कोको या 'नवीन गरजा' भागवण्यासाठी आणि जास्तीत जास्त पैसा मिळवण्यासाठी धडपड सुरू झाली. त्यातूनच रंगेबिरंगी, मनोवेधक, मानवी स्वभावाच्या अनंत रंगछटांचे दर्शन घडवणारी एक दीर्घकथा निर्माण झाली. या कथेची प्रस्तावना मात्र शेकडो वर्षापूर्वीच लिहिली गेली होती.

प्राचीन भारतीय संस्कृतीने जगाला काही महत्त्वाच्या देणग्या दिल्या. शून्य ही त्यातील एक! शून्याच्या आगमनाने मानवी व्यवहार आमूलाग्र बदलला. नित्याच्या मानवी व्यवहारावर ठसा उमटवणारी दुसरी देणगी म्हणजे "साखर"! भारतीय संस्कृतीने जगाला दिलेली ही गोड देणगी. कालचक्र अखंड असते. प्राचीन प्रगत संस्कृती कालौघात अप्रगत दिसू लागल्या. अर्वाचीन संस्कृती निर्माण झाल्या. पण साखरेने मिळवलेले स्थान अजून तरी अढळ आहे. या साखरेमुळे समाजकारण, राजकरण घडले. मानवी स्वास्थ्याच्या विकृतीचे तसेच कल्पकतेचे कितीतरी पैलू उघड झाले. साखरेने जागतिक राजकारणात बरेच मीठ कालवले आहे. अजूनही महाराष्ट्रात राजकारणाला साखरेची कडूगोड झालर आहे, हा सर्व इतिहासाचा पट नजरेसमोरून जाऊ लागला म्हणजे प्रगती ही एकदिशीय नसून चक्रासारखी आहे असे वाटू लागते. या चक्राचा केंद्रबिंदू असतो मानवी स्वभाव. या मानवी स्वभावाला साखरेच्या पाकात घोळवले तरी तो बदलत का नाही हे दाखवणाऱ्या साखरेची कथा वाचकांना उद्बोधक वाटेल.

**पांढरे मीठ**

उसापासून मिळणाऱ्या पांढऱ्या स्फटिकांना 'पांढरे मीठ' म्हणत असत, असे जर कोणी आपल्याला सांगितले तर त्या व्यक्तीच्या शहाणपणाबद्दल आपल्याला संशय येऊ लागेल. परंतु

मध्ययुगीन काळात ऊसापासून तयार होणाऱ्या पांढऱ्या स्फटिकांना युरोपमध्ये खरोखरीच "पांढरे मीठ" असे संबोधत असत. मध्ययुगात समुद्राच्या पाण्यापासून तयार होणारे मीठ त्यातील अशुद्ध द्रव्यामुळे काळपट रंगाचे दिसत असे. या करड्या रंगाच्या मिठापेक्षा वेगळे म्हणून साखरेला "पांढरे मीठ" असे सोयीस्कर नाव दिले गेले.

चिनी लोक अनेक विद्या व कला यात पारंगत असत. इतर अनेक कलांप्रमाणे उसापासून साखर तयार करण्याची पद्धत मुळात आम्हीच शोधली असा त्यांचा दावा होता. चीनमधील Koung - tong कुआँग टाँग म्हणजेच सध्याचे 'कँटन'. येथे प्राचीन काळापासून चिनी लोक ऊसापासून साखर बनविण्याचा व्यवसाय करीत असत. परंतु ऐतिहासिक पुरावे पाहाता ही कला त्यांनी भारतीयांकडून प्रयत्नपूर्वक आत्मसात केली होती असे दिसून येते. इसवी सनाच्या सातव्या शतकांतील निसर्गतज्ज्ञ Su - Kung सु-कुंग याच्या 'नॅचरल हिस्टरी' या ग्रंथात पुढील विधान आढळते, "बादशहा Tai - Hung तै-हुंग याने आपल्या कारागिरांना Lyu ल्यू (भारताचे तत्कालिन चिनी नाव) येथे विशेषत: Mo-Ki -To मो किटो (बंगालचे चिनी संबोधन) येथे उसापासून साखर बनविण्याची कला अवगत करण्यासाठी पाठविले." "इसवी सनाच्या सातव्या शतकांत श्रीहर्ष राजाच्या राजवटीत साखर तयार करण्याची कृती शिकण्यासाठी चिनी प्रतिनिधी आले होते" असा उल्लेख भारतीय इतिहासातही आढळतो. उभय देशांच्या इतिहासातील या नोंदी एकमेकांना पूरक तर आहेतच. पण 'उसाची जन्मभूमी भारतच आहे' याचा पुरावा ठरावा अशा आहेत.

**प्राचीन भारतीय नोंदी**

प्राचीन काळापासून भारतातील अनेक राज्यात, विशेषत: सिंध, बंगाल आणि गंगा नदीच्या खोऱ्यांत उसाचे उत्तम पीक येत असे. प्राचीन काळातील साखरेच्या लिखित पुराव्यांचा वेध घेतला तर आपण रामायणकाळ आणि ऋग्वेदापर्यंत येऊन पोहोचतो. ऋग्वेदात उसाचा उल्लेख आढळत नाही. त्यात पाच प्रकारचे फळांचे रस 'पेय' म्हणून वापरीत असत अशी नोंद असली तरी 'उसाच्या रसाचा' त्यात समावेश नाही. परंतु रामायणात मात्र 'उसाचा रस' हे लोकांचे आवडते पेय होते अशी नोंद आढळते. वस्तूविनिमय (बार्टर सिस्टिम) पद्धतीत उसाचा उपयोग तांदूळ व इतर आवश्यक तृणधान्ये मिळवण्यासाठी करीत असत. रामायणात (इ. स. पूर्व १२०० वर्षे) राजाने दिलेल्या मेजवानीची सविस्तर वर्णने आढळतात. "भोजनाच्या तयारीत अनेक मधुर पदार्थ आणि चावण्यासाठी उसाचे करवे ठेवले होते." म्हणजे रामायणकाळात शेतकरी उस पिकवीत असत हे निश्चित ! गौतम बुद्धाचे पूर्वज 'गुड' या साखरेच्या प्रदेशांतून आले होते अशीही नोंद काही आख्यायिकांत आढळते. या ठिकाणी 'गुड' हे नाव बंगाल प्रांतासाठी वापरले होते.

ऋग्वेदात अनुल्लेखलेला ऊस अथर्ववेदात (इ. स. पूर्व ८०० वर्षे) वेगवेगळ्या संदर्भात समाविष्ट केलेला दिसतो. अथर्ववेदांतील एका प्रार्थनेत "हा इक्षुदंड मी परमेश्वरचरणी अर्पण

करतो.'' असे म्हटले आहे. ''ऊस चोखून खावा म्हणजे उसाची गोडी शोषता येते. उसाच्या दाट रसाला फणिता असे म्हणतात. या फणितापासूनच गूळ आणि शर्करा तयार होते'' अथर्ववेदातील ही माहिती भारतीयांच्या प्रगतीचा आलेख दर्शवितात. इ. स. पूर्व आठशे वर्षापासून भारतीयांना ऊस पिकवता येत होता आणि त्यापासून गूळ आणि साखर मिळवण्याची कृती त्यांनी सिद्ध केली होती.

इ. स. पूर्व ३०० साली कौटिल्याने 'अर्थशास्त्र' हा ग्रंथ संपन्न केला. या ग्रंथात विविध विषयांची माहिती कौटिल्याने ग्रंथित केली आहे. त्यांत मोहरी आणि ऊस या पिकांची समग्र माहिती आढळते. उसाच्या रसापासून गूळ, फणिता, खांड, खांडसरी, मत्स्यांदिका (माशांच्या अंड्याप्रमाणे दिसणारे साखरेचे स्फटिक) आणि शर्करा अशा अनेक प्रकारची साखर तयार करतात अशी नोंद कौटिल्याने केली होती. इ. स. पूर्व ५० साली पातंजलीच्या महाभाष्यात शर्करेचे वारंवार उल्लेख येतात. सुश्रुताने बारा जातीच्या उसाची नोंद करून ''ऊस चावून खाणे आरोग्याला हितकारक असल्याचा सल्लाही दिला होता.'' ''उसाचा ताजा रस, तो रस आटवल्यावर तयार होणारा दाट पाक आणि साखर यात औषधी गुणधर्म आहेत.'' अशी टिप्पण्णी सुश्रुताने केली होती. चरकसंहितेत सर्व प्रकारच्या साखरेचे उल्लेख पुन्हा: पुन्हा केलेले आढळतात.

**पर्शिया आणि भूमध्यसामुद्रिक प्रदेश**

इ. स. पूर्व ५५० ते ४८६ या काळात पर्शियामध्ये 'डेरिअस' हा पराक्रमी राजा होऊन गेला. व्यापाराची भरभराट, पर्शियामधील अंतर्गत प्रांतांना जोडणाऱ्या रस्त्याचे जाळे आणि सिंधु नदीच्या खोऱ्यात केलेले अचानक आक्रमण ही त्याच्या कारकिर्दीतील काही वैशिष्ट्ये ! पर्शियन सैनिकांना सिंधु नदीच्या खोऱ्यात ''बांबूसारख्या दिसणाऱ्या आणि मधमाशांच्या मदतीशिवाय मध देणाऱ्या वनस्पतींचा'' शोध लागला. अर्थातच मायदेशी परतताना त्यांनी ती वनस्पती आपल्याबरोबर नेली. आपल्या मातृभूमीत त्या वनस्पतीची व्यापारी तत्त्वावर लागवड करून त्यापासून साखरेचे उत्पादन सुरू केले. म्हणजे डेरिअस राजाच्या कारकीर्दीत भारतातील ऊस आणि उसापासून साखर तयार करण्याचे तंत्रज्ञान पर्शियामध्ये पोचले होते. शेजारी राष्ट्रांना हे तंत्रज्ञान अवगत नसल्यामुळे 'उसापासून साखर' ही पर्शियनांची मक्तेदारी बनली. अशी साखर ते निर्यात करू लागले.

इ. स. पूर्व चौथ्या शतकात घोड्यांनी ओढलेल्या कॅरॅव्हॅन नावाच्या गाड्यातून व्यापारी प्रवासाला निघत. या बंदिस्त गाडीत केलेल्या वैशिष्ट्यपूर्ण रचनेमुळे आणि सोयीसुविधांमुळे व्यापाराच्या उद्देशाने निघालेले प्रवासी कॅरॅव्हॅनमध्ये रहात असत. पर्शियापर्यंत पोचलेला हा गोड बांबू मध्यूपर्वेकडील सर्व देशात पोचविण्याचे श्रेय कॅरॅव्हॅनमधील व्यापाऱ्यांना दिले पाहिजे. अल्पावधीत सिंधु नदीपासून काळ्या समुद्रापर्यंत आणि सहारा वाळवंटापासून पर्शियाच्या सामुद्रधुनीपर्यंत सर्व प्रदेशांत उसाची लागवड होऊ लागली. या गोड बांबूच्या

रसाला अथवा दाट पाकाला 'मसाल्याचा पदार्थ' असेच संबोधत असत; कारण 'पदार्थ टिकवण्याचा' महत्त्वाचा गुणधर्म त्यात होता. इतर मसाल्याच्या पदार्थांच्या तुलनेत त्याची किंमत मात्र जास्त असे. इसवीसनापूर्वीच्या काही शतकात सध्याच्या सिरीया आणि लेबॅनॉन या प्रदेशात फोनेशियन लोक रहात असत. हे प्रगत लोक उत्तम दर्जाचे दागदागिने, हस्तीदंती वस्तू, तऱ्हेतऱ्हेचे कापड बनविण्यात अग्रेसर होते. आशिया, आफ्रिका, स्पेन इत्यादि सर्व देशांशी फोनेशियन लोकांनी व्यापारी संबंध प्रस्थापित केले होते. फोनेशियन आणि इजिप्शियन गोड बांबूच्या पाकाचा उपयोग औषधात करीत असत. "ऑफिसिनेल" म्हणजे औषधात वापरावयाची वनस्पती. म्हणून तर उसाचे शास्त्रीय नाव 'सॅकॅरम ऑफिसिनॅरम" !

**ग्रीस व रोम**

ॲरिस्टॉटल हा ग्रीक तत्त्वज्ञ आणि शास्त्रज्ञ इ. स. पूर्व ३८४ ते ३२२ या काळात होऊन गेला. प्लेटोच्या या शिष्याने अथेन्सच्याजवळ 'लिसिअम' ही शैक्षणिक संस्था स्थापन केली. ॲरिस्टॉटलनंतर थिओफ्रेटस याची लिसिअमचा प्रमुख म्हणून नेमणूक झाली. थिओफ्रेटसने आपल्या वनस्पतीशास्त्रीय निबंधात केलेली पुढील नोंद नमूद करण्यासारखी आहे. तो म्हणतो, "एकूण तीन प्रकारचे मध आढळतात. पहिल्या प्रकारचा मध फुलांतून मिळतो. दुसऱ्या प्रकारचा मध दवबिंदूंपासून मिळतो; तर तिसऱ्या प्रकारचा मध बांबूसारख्या वनस्पतीतून वाहातो." इसवी सनापूर्वीच्या चौथ्या शतकात भारतातील 'इक्षुदंड' ग्रीसपर्यंत पोचल्याचा हा दाखलाच होता !

जगज्जेता अलेक्झांडर (इ. स. पूर्व ३५६ ते ३२३) हा सुद्धा ॲरिस्टॉटलचा शिष्य. याने पर्शिया, सिरिया, मेसापोटेमिया हे प्रदेश पादाक्रांत करून 'अलेक्झांड्रिया' हे व्यापारी बंदर वसविले आणि पूर्वेकडे पंजाब, सिंधु नदीच्या खोऱ्यापर्यंतच्या प्रदेशावर आपले साम्राज्य प्रस्थापित केले. यावेळी त्याच्या अधिकाऱ्यांपैकी Narchus 'नार्कस' या अधिकाऱ्याने बांबूतून वाहणाऱ्या मधाची माहिती मिळवली आणि नोंदवून ठेवली; ती माहिती अशी : "आपण ज्याला बांबूतून वाहणारा मध' असे म्हणतो तो मध म्हणजे 'ऊस' या वनस्पतीचा रस असतो. या मधुर रसाचे बाष्पीभवन करून स्फटिकयुक्त पांढरी साखर मिळवतात. ही साखर कोरडी असते. परंतु दमट हवामानामुळे आणि ग्रीसला पोचेपर्यंत प्रवासात बराच कालावधी गेल्यामुळे हे स्फटिक चिघळतात. त्यामुळे ही साखर दाट पाकाच्या स्वरूपात आपल्याला मिळते. या पाकाचे बाष्पीभवन करून पुन्हा साखरेचे स्फटिक मिळवता येतात किंवा हा पाक आंबवून मद्य तयार करता येते." प्रदेश पादाक्रांत करणे हा युद्धाचा प्रमुख हेतू असला तरी त्यामुळे दोन भिन्न संस्कृतींचा संकर होतो. या संकराचे विविध पैलू असतात. त्यापैकी नवीन पिकांची ओळख हा पदर येथे न्याहाळता येतो.

डायोस्कोराइडस् हा ऑगस्टचा समकालीन. तो म्हणतो, "सॅकॅरम नावाचा घन स्वरूपातील मध भारत आणि अरेबिया येथील बांबूसारख्या वनस्पतीत आढळतो. हा पदार्थ

मिठासारखा दिसतो आणि तोंडात टाकल्यावर विरघळतो. निसर्गतज्ज्ञ प्लीनी, स्ट्रॅबो, सेनेका, ल्यूकन, गॅलन या सर्वांनी डायोस्कोराइड्सच्या नोंदी खऱ्या असल्याचे म्हटले आहे. 'सॅकॅरम' या शब्दाच्या व्युत्पत्तीचा शोध घेतला तर आपण साखरेच्या 'शर्करा' या संस्कृत नावापर्यंत येऊन पोहोचतो. 'शर्करा' या संस्कृत शब्दाचे ग्रीक व लॅटिन स्वरूपात रूपांतर होऊन 'सॅकॅरम' हा शब्द तयार झाला असे इतिहासकारांच्या नोंदींवरून लक्षात येते. साखरेचे अर्थात् पर्यायाने उसाचे मूळ स्थान भारतच असल्याचा हा आणखी एक सबळ पुरावा ! इसवीसनाच्या पहिल्या शतकांतील निसर्गतज्ज्ञ प्लीनी आपल्या 'नॅचरल हिस्टरी' या ग्रंथात उसापासून साखर तयार करण्याची कृती लिहितो आणि त्यापुढे 'साखर फक्त औषधाकरता वापरतात'' अशी पुस्तीही जोडतो. डायोस्कोराइड्स् आणि गॅलनच्या म्हणण्याप्रमाणे औषधाचे वजन जितके ग्रॅम, तितक्या ग्रॅम वजनाची चांदी ही त्या औषधाची किंमत असे. औषधे चांदीच्या तुलनेत किती महान होती किंवा औषधांच्या तुलनेत चांदी किती स्वस्त होती याचा अंदाज आपल्याला वरील विधानावरून येतो.

व्हेरो हा तर प्लीनीच्या आधीच्या शतकातील निसर्गतज्ज्ञ (इ. स. पूर्व ११६ ते २७) त्याने आपल्या **De re rustica** दि री रस्टीका या ग्रंथात 'उसाचे झाड' कसे दिसते. त्याचे हुबेहुब वर्णन केले आहे. शिवाय पर्शियन लोकांची उसापासून साखर मिळवण्याची पद्धतही वर्णिली आहे. पाश्चिमात्यांना 'भारतीय साखर' ही उच्च दर्जाची आणि मौल्यवान वाटत असे. ल्यूकान याने तर गंगेकाठच्या भारतीयांना ''बांबुसारख्या दिसणाऱ्या कमकुवत वनस्पतीचा मधुर रस प्राशन करणारे'' असे विशेषण बहाल केले होते. 'साखर म्हणजे एक महागडे औषध' किंवा ''श्रीमंत व सत्ताधाऱ्यांना परवडेल अशी चैनीची वस्तू म्हणजे साखर'' असा समज युरोपीय समाजात रूढ होता. साखरेभोवती अद्भुत्तेचे वलय होते. वाळवंटापलीकडील प्रदेशातून कॅरॅव्हॅनमधून भुमध्यसामुद्रिक प्रदेशातील बंदरात येणाऱ्या या अद्भुत अन्नपदार्थाबद्दल युरोपियनांच्या मनात विलक्षण आकर्षण निर्माण झाले होते. सर्व युरोपीय देशवासियांकडून साखरेला मागणी येऊ लागली. साखरेच्या व्यापाराचे हे विस्तारणारे क्षेत्र लक्षात घेऊन इटलीतील व्यापाऱ्यांनी इ. स. ९६६ साली व्हेनिस बंदरात साखरेची वखार (कोठी) बांधली. पूर्वेकडील देशांतून अरबांनी आणलेल्या साखरेचे 'साठवण' करणे या कोठीमुळे सोयीचे झाले. ही साखर मध्य युरोप, काळा समुद्र, स्लाव देश व अन्य युरोपीय देशांना पुरवली जाऊ लागली. साखरेबरोबर सिल्कचे उंची कापड, इस्तीदंती व चंदनी कलाकुसरीच्या वस्तू, मसाल्याचे पदार्थ अरबांकडून स्वस्त दराने खरेदी करणे आणि या सर्व वस्तू युरोपीय देशांना चढ्या किंमतीने विकणे या व्यवहारावर व्हेनिसची आर्थिक मदार होती. ही अर्थव्यवस्था व्हेनिसमधील व्यापाऱ्यांना फलदायी ठरली. आर्थिकदृष्ट्या व्हेनिसची भरभराट झाली.

**सोन्याची खाण**

अरब व्यापारी अत्यंत हुशार आणि धूर्त. युरोपियनांची साखरेची आवड त्यांनी जोखली. पूर्वेकडील देशातून साखर आयात करण्यापेक्षा आपणच साखरेचे कारखाने काढावेत असे धोरण त्यांनी अवलंबिले. ग्रीसच्या दक्षिणेकडे असलेल्या भूमध्य सामुद्रिक प्रदेशातील क्रीट किंवा कँडी या बेटावर इ. स. एक हजारच्या सुमारास उसापासून साखर तयार करण्याचा कारखाना अरबांनी काढला. अरबी भाषेत कंडी (Qandi) म्हणजे साखरेचे स्फटिक, म्हणून या कारखान्याला सोईस्कर नाव दिले ''कंडी''. मधाचा साठा असेल तिथे माशांना आमंत्रण नको ! त्या तेथे जमणारच ! दुर्मिळ, महाग आणि अद्‌भुत साखरेच्या उत्पादनामुळे धर्मयोद्धे या प्रदेशाकडे आकर्षिले जात. ऊस उत्पादन करणारे आसपासचे सर्व प्रदेश आपल्या अधिपत्याखाली आणण्यासाठी अरबांनी तेथे स्वाऱ्या केल्या. पराक्रमी अरबांनी पर्थियावर विजय मिळवला. आपल्या अमलाखाली असलेल्या सर्व प्रदेशात मोठ्या प्रमाणावर उसाची लागवड केली. ज्या ज्या ठिकाणी उसाची लागवड यशस्वी झाली त्या त्या ठिकाणी अरबांनी साखरेचे कारखाने काढले. अरबांच्या दृष्टीने 'साखर' ही जणु सोन्याची खाण ठरली. साखरेच्या उद्योगांतून अरबांनी खूप पैसे मिळवले.

अरबांनी आणखी एक प्रकारची साखर निर्माण करण्याचे तंत्र अवगत केले. साखरेला थोडी उष्णता दिली की ती हळूहळू विरघळते. अशी साखर चिकट व चॉकलेटी रंगाची दिसते व तिला उत्तम स्वाद असतो. ही 'खमंग' साखर म्हणजेय 'कॅरॅमल' : अरब या साखरेला कुरत- अल- मिल म्हणजे "मधुर मिठाचा गोळा" या नावाने संबोधित असत. यावरून इसवी सनाच्या दहाव्या शतकापर्यंत तरी साखरेला ''पांढरे मीठ'' म्हणण्याचा प्रघात होता असे आपल्या लक्षात येते. अरबांच्या जनानखान्यांतील स्त्रिया या दाट चॉकलेटी, चिकट पाकाचा उपयोग आपल्या शरीरावरील नको असलेली लव काढण्यासाठी करीत असत. आधुनिक काळातही याच तत्त्वाचा उपयोग करून काही कंपन्या सौंदर्यप्रसाधने बनवितात आणि स्त्रिया आपले शरीरसौंदर्य वृद्धिंगत करण्यासाठी या प्रसाधनांचा वापर करतात.

संपूर्ण भूमध्यसामुद्रिक प्रदेशात साखरेचा सुवास दरवळला होता. फ्रान्सचा राजा ९ वा लुई हा धर्मयुद्धाच्या निमित्ताने भूमध्यसामुद्रिक प्रदेशात गेला असता 'जॉइनव्हिल' हा सरदार त्याच्याबरोबर होता. त्याने आपल्या आत्मचरित्रात "फिक्कट रंगाच्या बांबूसारख्या दिसणाऱ्या वनस्पतीच्या रसापासून साखर हा पदार्थ तयार करतात." असे म्हटले होते.

**जकातकर आणि साखर**

तेराव्या शतकाच्या अखेरीस इ. स. १२९१ साली सिरीयामधील युरोपियनांची सत्ता संपुष्टात आली. त्यानंतर युरोपियनांनी सिरीयाजवळील सायप्रस बेटावर आपले लक्ष केंद्रित केले. संबंध सायप्रस बेटावर उसाची लागवड करण्यात आली. ऊस आणि त्यापासून तयार

होणारी साखर सायप्रसच्या उत्कर्षाचे प्रमुख साधन बनली. पंधराव्या शतकात सायप्रस बेटावरून हजारो क्विंटल साखर निर्यात होऊ लागली. सायप्रसमधील राजघराण्यापेक्षा साखरेचे उत्पादक आणि व्यापारी यांच्याकडे अधिक संपत्तीचा साठा असे. सायप्रसची अखेरची सम्राज्ञी – अखेरच्या ल्युसिग्नन राजाची पत्नी कॅथरिन हिचे माहेरही अशाच साखरसम्राटांपैकी एक होते !

भूमध्यसामुद्रिक प्रदेशातील आर्थिक उलाढाल प्रामुख्याने मसाल्याच्या पदार्थांच्या व्यापारावर अवलंबून असे हे आपण मसाल्याच्या पदार्थांच्या इतिहासात पाहिले. अर्थात् या मसाल्याच्या पदार्थात साखरेला अग्रस्थान होते. या पदार्थांच्या किमती चढ्या असल्या तरी ग्राहकांची मुळीच कमतरता नव्हती. हे सर्व पदार्थ घेऊन शेकडो बोटी भूमध्यसामुद्रिक प्रदेशात आणि युरोपीय बंदरात येत असत आणि टनावारी आणलेले हे पदार्थ चुटकीसरशी विकले जात. अनेक युरोपीय व्यापारी घाऊक दराने या पदार्थांची खरेदी करीत आणि मग ते पदार्थ इंग्लंड व उत्तर युरोपीय देशांपर्यंत विक्रीसाठी नेत. या खुष्कीच्या मार्गावर अनेक ठिकाणी जकातकर भरावा लागे. प्रत्येक देशाच्या सीमारेषेवरील जकातकर वसूल करणारे अधिकारी भ्रष्ट असत. 'एवढा उंची माल' जकात नाक्यावरून पुढे जाऊ दिल्याबद्दल त्या उंची मालाचा काही हिस्सा या लोभी अधिकाऱ्यांना द्यावा लागे. या सर्वामुळे आधीच महाग असलेल्या पदार्थांच्या किंमती गगनाला जाऊन भिडत असत. या त्रासाला कंटाळून युरोपियनांनी अटलांटिकामधून उत्तर युरोपीय देशांपर्यंत पोचण्याचा सागरी मार्ग शोधला आणि व्यापाऱ्यांना तो पसंत पडला. हा मार्ग दूरचा असला तरी त्यामुळे जकातकर भरण्याच्या कटकटीतून व्यापाऱ्यांची सुटका होत असे. या नवीन सागरी मार्गात ब्रूगज Bruges हे बेल्जियममधील शहर साखर आणि मसाल्याच्या पदार्थांच्या व्यापाराचे प्रमुख केंद्र बनले. पोर्तुगीज व्यापाऱ्यांनी पोर्तुगालजवळच्या मदिरा बेटावर साखरेचे भरपूर उत्पादन करण्यास सुरुवात केली होती. ही साखर निर्यात करून पोर्तुगीजांना युरोपच्या पश्चिम किनाऱ्यावरील आपले वर्चस्व टिकवायचे होते. त्यामुळे हे पोर्तुगीज व्यापारी ब्रूगज् या व्यापारी केंद्राला वरचेवर भेट देत.

युरोपीय देशात बाराव्या शतकापासून साखरेवरील या जकातकराची लेखी नोंदणी होऊ लागली. साखरेवर 'लेंद' या नावाने जकातकर बसविला होता. दक्षिण फ्रान्समधील नॉरबॉन या बंदरातील इ. स. ११५३ सालच्या नोंदणी पुस्तकात तसा उल्लेख आढळतो. सागरी मार्गाने आणलेल्या साखरेवर प्रति क्विंटल आठ दीनार तर खुष्कीच्या मार्गाने आणल्यास प्रतिक्विंटल १४ दीनार असा जकातकर आकारला जाई. इ. स. १२२८ साली म्हणजे जवळ जवळ पाऊणशे वर्षानंतर मार्सिलीस येथेही साखरेवर कर बसविण्यात आला. या कराचा दर साखरेच्या प्रतीवर अवलंबून असे.

**फ्रान्समधील साखरेचे दर**

भारतात साखर जरी स्वस्त असली तरी युरोपमध्ये साखर चांदीच्या भावाने विकली जात असे. तेराव्या शतकातील फ्रान्समधील ऐतिहासिक नोंदी याची साक्ष देतात. इ. स. १२७३ साली सॅव्होईच्या काउंटेसने लिहिलेल्या घरखर्चात एक पौंड साखरेला दोन सोन्याच्या साऊस आणि पाच चांदीचे दीनार एवढी किंमत मोजावी लागे असा उल्लेख आढळतो. 'बर्गडी' ची काउंटेस माहू – दि – आर्सॉ ही पाचव्या फिलिपची सासू' आपल्या जावयाला आणि प्रजाजनांना आपण किती गरीब झालो आहोत, आपली आर्थिक स्थिती किती दयनीय झाली आहे हे पुन: पुन्हा पटवून देत असे. न जाणो, सातत्याने 'बडबड' करण्यासाठी लागणारी कार्यशक्ती तिला साखरेच्या सेवनानेच मिळत असावी ! या 'गरीब' बिचाऱ्या काउंटेसने इ. स. १२९९ साली साखरेच्या पंधरा गोणी खरेदी केल्या. आणि या प्रत्येक साखरेच्या गोणीची किंमत अवघी तितक्याच वजनाच्या चांदीइतकी होती !

फ्रान्सचा राजा ले बॉ याला लंडनमध्ये नजरकैदेत ठेवले होते. आपल्या दयनीय परिस्थितीचे रडगाणे तो नेहमीच गात असे. नजरकैदेत असतानासुद्धा स्वत:साठी हजारो स्टर्लिंग पौंड किमतीचे मसाल्याचे पदार्थ त्याने खरेदी केले होते हा इतिहास आपण पाहिलाच आहे. या मसाल्याच्या पदार्थांबरोबर शेकडो पौंड किंमतीच्या साखरेची साठवण केली होती. राजासारखे 'विलासी' आयुष्य जगणाऱ्या ले बाँ प्रती किंचितशीसुद्धा खेदाची भावना वाचकांच्या मनात डोकावणे अशक्य आहे.

'सातवा चार्लस्' या फ्रान्सच्या राजाची कारकीर्द तशी महत्त्वाची याच्या राजवटीत (इ. स. १४२२ ते ६१) उत्तर फ्रान्सचा बराचसा भाग ब्रिटीश अधिपत्याखाली होत्या. त्यावेळी 'जोन ऑफ आर्क' या पराक्रमी महिलेमुळे फ्रान्सच्या लष्करात आमूलाग्र बदल झाले. फ्रेंचांनी ब्रिटिशांच्या ताब्यातील उत्तर फ्रान्सचा भाग स्वतंत्र केला आणि शंभर वर्षे चाललेल्या युद्धाची अखेर समाप्ती झाली. या विजयी राजाच्या सन्मानार्थ इजिप्तच्या बादशहाने १ क्विंटल (१०० किलो) साखरेची भेट पाठवली होती. साखरेचा सर्वात मोठा व्यापारी 'जेकस कोईर' याच्याशीसुद्धा राजाचे मैत्रीचे संबंध होते अशी नोंद इतिहासकारांनी केली होती. व्यवहारात साखरसम्राटांना अनभिषिक्त राजांचा दर्जा दिला जाई.

**साखर व प्रकार**

पिठी साखर, बुरा साखर, पत्री किंवा साधी खडी साखर आणि वेगवेगळ्या आकाराच्या स्फटिकांनी युक्त साधी साखर. साखरेचे हे प्रमुख प्रकार आपल्या नित्य परिचयाचे. इसवी सनाच्या तेराव्या आणि चौदाव्या शतकात युरोपियनांनी विविध प्रकारची साखर निर्माण केली. सोने या एकाच मौल्यवान धातूचे बहुढंगी अलंकार – प्रत्येकाचा घाट, नक्षीकाम, कलाकुसर आणि चमक आगळी वेगळी असली तरी मुळात ते सोनेच ! त्याप्रमाणे एका साखरेची अनेक रूपे – प्रत्येकाचा रंग, रूप, आकार आणि उपयोग वैशिष्ट्यपूर्ण तरी मुळातील

'गोडी' तीच! किंवा शास्त्रीय भाषेत मांडावयाचे तर रंग, रूप, रस, गंध वेगळे असले तरी रासायनिक दृष्ट्या ती सुक्रोजच !

बारीक दळलेल्या पांढऱ्या शुभ्र साखरेचे शंकूच्या आकाराचे कडक तुकडे म्हणजेच "लोफ किंवा रॉक शुगर." साखरेचा वापर प्रामुख्याने औषधात होत असल्यामुळे औषधे तयार करणाऱ्यांनी साखरेच्या विविध रूपांना मजेशीर नावे बहाल केली. युरोप आणि मध्य आशिया यांना जोडणाऱ्या सागरी मार्गावरील 'कॅफा' हे एक फ्रेंच बंदर. तसेच पाम जातीच्या पानांना फ्रेंच भाषेत 'कॅफाज' असे म्हणत. या कॅफाजपासून हस्तकौशल्याने तयार केलेली सुबक परडी म्हणजे 'कॅफीन'. 'कॅफा बंदरातील 'कॅफीन' मध्ये ठेवलेले साखरेचे खडे.' म्हणून त्या साखरेला कॅफेतिन् **Caffetin** किंवा कॅफ्तन् **Caften** असे नाव पडले.

पांढऱ्याशुभ्र साखरेचे चटकन मोडतील असे तुकडे म्हणजे कॅसन **(Casson)** साखर. सोळाव्या शतकात कॅसन या शब्दाचे रूपांतर कॅसनेड असे झाले. चटकन तुटणारी म्हणून 'क्रॅक' शुगर असेही त्या साखरेचे 'गुण निदर्शक' नाव तिला प्राप्त झाले. सायप्रस, ऱ्होड्स आणि बॅबिलॉन या ठिकाणची क्रॅक शुगर उत्तम दर्जाची असे. कॅनडामधील मॉन्ट्रिअलचा शोध अजून युरोपला लागायचा होता. पण मृत समुद्राच्या किनाऱ्यावर मॉंट्रिअल नावाचे सिरीयन बंदर होते. येथील 'मॉंट्रिअल क्रॅक शुगर' इसवीसनाच्या चौदाव्या व पंधराव्या शतकात युरोपमध्ये प्रसिद्ध होती. आज मात्र क्रॅक, ब्राऊन शुगर ही नावे मादक द्रव्यांना दिली आहेत.

**Muscarrat** मस्कॅरॅट हे साखरेचे नाव तसे फसवेच ! मस्क म्हणजे कस्तुरी. या साखरेला कस्तुरीचा जरासुद्धा वास नसे. परंतु ती कस्तुरीसारखी 'दुर्मिळ' होती. इजिप्तमध्ये खास बॅबिलॉनच्या सुलतानाकरता या साखरेचे उत्पादन करीत असत. एखादी वस्तू जितकी दुर्मिळ, तितका तिच्या चोरट्या व्यापाराचा संभव अधिक ! व्हेनिसमधील व्यापारी चोरट्या पद्धतीने ही साखर इटलीत आयात करीत. इटालियनांनी अत्यंत बारीक दळलेल्या पांढऱ्याशुभ्र अशा या साखरेचे **Mucchera** 'मुचेरा' असे नामकरण केले होते. **Cypre** सायप्र किंवा **Chypre** चायप्र ही लालसर रंगाची निकृष्ट दर्जाची साखर. या साखरेच्या पाण्याचा उपयोग प्राचीन काळी एनिमा देण्यासाठी करीत असत. कमी दर्जाची ही साखर इतर साखरेच्या तुलनेत खूपच स्वस्त असे. औषध तयार करून विकणारे काहीही विकल्प मनात न आणता निर्लज्जपणे औषधात ही साखर मिसळीत. साहजिकच त्यांना मिळणाऱ्या नफ्याचे प्रमाण निश्चितच अधिक होई ! म्हणजे रोग्यांच्या रोगनिवारणापेक्षा 'स्वार्थ' अधिक बलवत्तर असे. मनुष्यस्वभाव हा स्थलकालातीत असतो हेच खरे !

संत्र्याच्या फोडीच्या आकाराच्या आंबटगोड लिमलेटच्या गोळ्या लहानथोर सर्वांनाच प्रिय. 'कँडी' या गावी प्रथम तयार करण्यात आल्या म्हणून त्यांचे नाव पडले कँडी. पंधराव्या शतकात अजून कृत्रिम इसेन्स निर्माण करण्याचे ज्ञान विकसित झालेले नसल्यामुळे नैसर्गिक

फळाफुलांचे रस व अर्क वापरून 'कँडीज' तयार करीत. पंधराव्या शतकातील औषधनिर्मात्यांकडे पाच प्रकारच्या कँडी असत. साध्या कँडीज, गुलाब, व्हायोलेट, लिंबू आणि काळ्या मनुका. या विविध कँडीज लोकप्रिय असत.

उत्तर आफ्रिकेतील बर्बर गावाहून आयात केलेली बर्बरी साखर आणि अगदी बारीक दळलेली पॅनेल साखर असेही साखरेचे काही प्रकार युरोपमध्ये आढळत. आणि सर्वात शेवटचा लोकप्रिय प्रकार म्हणजे साधी साखर – 'ब्लँक ऑफिसिनेल'. ऑफिसिनेल या नावात सूचित केल्याप्रमाणे फक्त औषधांमध्येच वापरली जाण्याची मर्यादा या साखरेने केव्हाच ओलांडली होती आणि सर्वसामान्य माणसाच्या रोजच्या आहारात तिने 'अढळस्थान' पटकावले होते !

**प्रयोगशील पोर्तुगीज**

पोर्तुगीज लोक जसे धाडसी दर्यावर्दी. तसेच ते प्रयोगशील, वृक्षप्रेमी. भारत आणि इतर पूर्वेकडील देश आणि युरोप यांच्या दळणवळणाचे सागरी मार्ग शोधून या दोन्ही खंडातील वैशिष्ट्यपूर्ण वृक्षांची देवाणघेवाण करण्यात पोर्तुगीज आघाडीवर होते. देशोदेशींच्या अनेक भाज्या आणि फळांचा प्रचार व प्रसार करण्याचे श्रेय प्रामुख्याने पोर्तुगीजाना द्यावे लागते. फळे आणि भाज्यांच्या इतिहासात आपण याचा आढावा घेतला आहे. भारतातील उसाच्या पिकाची ओळख पोर्तुगीजांना झाली होती आणि साऱ्या जगातील साखरेचे वाढते महत्त्व त्यांनी दूरदर्शीपणाने जाणले होते. प्रयोगशील पोर्तुगीजांनी आपल्या अधिपत्याखाली असलेल्या प्रदेशात उसाची लागवड करण्यास सुरुवात केली. उसाच्या पिकाला नुसती ओलसर सुपीक जमीन असून भागत नाही. त्याबरोबर प्रचंड उष्णतासुद्धा लागते आणि शेतात उत्तम वायुजीवन व्हावे लागते, हे अभ्यासाने पोर्तुगीजांच्या लक्षात आले होते. स्पेन, प्रॉव्हिन्स (फ्रान्स), सिसिली, इटली या ठिकाणी उसाचे पीक घेण्याचा प्रयत्न युरोपियनांनी केला होता. परंतु तो अयशस्वी ठरला. स्पेनच्या पूर्व किनाऱ्याजवळील मेजोरका, मायनॉर्का, इबीझ आणि फॉर्मेंटस ही चार बेटे व इतर लहान सात बेटे यांच्या समूहाला 'बॅलरिक बेटे' (Balearic island) या नावाने संबोधतात. यापैकी काही बेटांवर ऊस वाढविण्याचा यशस्वी प्रयत्न अरबांनी केला होता. 'मदिरा' हा अटलांटिक महासागरातील बेटांचा समूह. इ. स. १४१९ साली पोर्तुगीजांनी या बेटांचा शोध लावला आणि त्या बेटांवर आपला अम्मल प्रस्थापित केला. येथील हवामान उसाच्या पिकाला अनुकूल असल्यामुळे पोर्तुगीजांनी या बेटांवर उसाची यशस्वी लागवड केली. पोर्तुगीजचा राजपुत्र हेन्री याच्या सहकार्यामुळे या बेटांवर उसाचे उत्तम पीक येऊ लागले. यापूर्वी पोर्तुगीजांना ऊस लेव्हेंट मधून आयात करावा लागत असे. (प्राचीन काळी भूमध्यसामुद्रिक प्रदेशांतील पूर्वेकडील काही बेटे व देश यांना एकत्रितपणे लेव्हेंट असे म्हणत असत) उसाच्या बाबतीतले हे परावलंबित्व आता संपले होते. उसाच्या बाबतीत पोर्तुगीज स्वतंत्र झाल्यामुळे साखरेच्या उत्पादनातून होणाऱ्या नफ्याचे

प्रमाणही खूप वाढले. गिनीच्या सामुद्रधुनीत असलेल्या बेटसमूहाची 'साओ टोम' ही राजधानी. आपल्या अमलाखाली असलेल्या या प्रदेशात पोर्तुगीजांनी साखरेचे कारखाने उभारले. मदिरात तयार झालेला ऊस या ठिकाणी आणू लागले. साखरेची निर्यात करणे पोर्तुगीजांना आता शक्य झाले.

### क्रौर्याची कमाल

पंधराव्या शतकाच्या अखेरीस सर्व जगाचा चेहरामोहराच बदलून टाकणारी एक घटना घडली. ख्रिस्तोफर कोलंबस हा धाडसी स्पॅनिश खलाशी 'नवीन जगात' पोचला. इ. स. १४९२ साली कोलंबसाने 'हिस्पॅनिओला' बेटाचा शोध लावला. हिस्पॅनिओला हे अटलांटिक महासागरांतील वेस्ट इंडिज बेटांपैकी एक बेट असून आता त्याचे 'हैती' आणि 'डॉमिनिकन रिपब्लिकन' असे दोन भाग पडतात. इ. स. १५०६ साली पेट्रो – डि – अरांका या स्पॅनिश तरुणाने हिस्पॅनिओला बेटावर उसाची लागवड केली. या बेटावरील हवामान उसाच्या पिकाला इतके मानवले की अवघ्या एका दशकात संपूर्ण बेटावर उसाची लागवड करण्यात आली. अनेक स्पॅनिश लोकांनी हिस्पॅनिओलात वसाहती केल्या. स्पॅनिशांच्या या कर्तत्रगारीचे कौतुक करताना एक गोष्ट आपल्याला नजरेआड करता येणार नाही. स्वत:चा स्वार्थ साधण्यासाठी स्पॅनिशांनी क्रौर्याची परिसीमा गाठली. हिस्पॅनिओलातील मूळ लोकांची निर्घृण हत्या केली. आणि उरलेल्या कित्येकांना गुलाम म्हणून वाढविले. उसाच्या शेतात आणि साखरेच्या कारखान्यात लागणारा कामगारांचा प्रश्न या गुलामांच्या रूपाने स्पॅनिशांनी सोडविला. साखरेच्या उद्योगात स्पेनचा बादशहा पाचवा चार्लस् यांच्याकडे अलोट संपत्तीचा ओघ सुरू झाला. याच पैशातून राजाने स्पेनची राजधानी मॅद्रिद आणि मध्य स्पेनमधील टेम्स नदीकाठी वसलेला टोलेडो या ठिकाणी भव्य राजवाडे बांधले.

### व्हेनेशियन व्यापारी

व्हेनिसमधील इटालियन व्यापारांचासुद्धा 'साखरेच्या जागतिक व्यापाराच्या' दृष्टीने अभ्यास चालू होता. तुर्कस्थानातील लोकांनी प्राचीन काळापासून चालवलेल्या साखरेच्या कारखान्यांचा व्हेनेशियन व्यापाऱ्यांनी बारकाईने अभ्यास केला आणि त्या कारखान्यातील पुरातन यंत्रांना आधुनिक तंत्रज्ञानाची जोड दिली. कारखान्यात बऱ्याच सुधारणा घडवून आणल्या. परंतु या कारखान्यांना उसाचा पुरवठा करणाऱ्या मुसलमानांनी कॅथलिक आणि अमेरिकन व्यापाऱ्यांची एकाधिकारशाही मोडून काढण्यासाठी इटालियन व्यापाऱ्यांना साखरेच्या किंमती कमी ठेवण्यास भाग पाडले.

वेस्ट इंडिज बेटांवर तयार होणारा ऊस अटलांटिक पार करून युरोपमध्ये आणणे अनेक दृष्टीनी गैरसोयीचे होते. या लांबच्या प्रवासात कापलेला ऊस कडसर होऊन कुजत असे. शिवाय उसाच्या मोळ्या बोटीतील फार जागा व्यापत असल्यामुळे ऊस युरोपमध्ये आणणे अत्यंत खर्चिक होऊ लागले. या सर्वांवरील उपाय म्हणून पोर्तुगीज आणि स्पॅनिशांनी

वेस्ट इंडीज, कॅनरी बेटे आणि मदिरा येथे साखरेचे कारखाने सुरू केले.

**डचांची जागरुकता**

मसाल्याच्या पदार्थांच्या उत्पन्नात आणि व्यापारात आपले वर्चस्व कायम ठेवण्यासाठी डचांनी मारलेल्या कोलांट्या उड्या आपण मसाल्याच्या पदार्थाच्या इतिहासात न्याहाळल्या आहेत. धाडसी, महत्त्वाकांक्षी डच ऊस व साखरेच्या बाबतीत 'स्वस्थ' राहणे शक्यच नव्हते! पूर्वेकडील ज्या देशांवर डचांची सत्ता होती त्या सर्व देशांतील उसाच्या उत्पादनावर डचांनी आपले लक्ष केंद्रित केले. या उत्पादनात उच्चांक प्रस्थापित करता यावा म्हणून हरतऱ्हेचे उपाय योजले. वेस्ट इंडिजमधील काही बेटेसुद्धा डचांनी हस्तगत केली होती. आपल्या मालकीच्या या बेटांवरही त्यांनी उसाची लागवड केली. पूर्वेकडील देशात तयार झालेली साखर दक्षिण चीन आणि फॉर्मोसा या दोन बंदरातून निर्यात करू लागले. डचांनी तयार केलेल्या साखरेचे १८ ते २० पौंड वजनाचे खडे पाम वृक्षाच्या पानात गुंडाळून विकत असत. प्राचीन कॅफटन साखरेप्रमाणे या साखरेला 'पाम शुगर' असे नाव देत. ही साखर उत्कृष्ट दर्जाची असून तिला 'व्हायोलेट'चा सुगंध असे. इतर साखरेच्या तुलनेत डचांची साखर स्वस्त आणि मस्त असे.

अशा तऱ्हेने साखरेच्या उत्पादनात पोर्तुगीज, स्पॅनिश, व्हेनेशियन, डच व्यापाऱ्यांत प्रचंड चुरस निर्माण झाली. साखरेचे उत्पादन प्रचंड वाढले. या वाढीव उत्पन्नाचा लाभ सामान्य जनतेला मिळाला. साखरेचे भाव उत्पादनाच्या व्यस्त प्रमाणात असल्यामुळे साखरेचे भाव उतरले. परिणामत: साखरेचा खपही वाढला. इ. स. १५७२ साली भूगोलतज्ज्ञ ऑर्टेलियस याने आपल्या लेखनात साखरेविषयी केलेली नोंद उल्लेखनीय आहे. ऑर्टेलियस म्हणतो, "पूर्वी साखर फक्त औषधे तयार करून विकणाऱ्यांकडेच मिळत असे आणि साखरेचा उपयोग फक्त रुग्णांकरता करण्यात येई. परंतु आता साखर सर्व किराणामालाच्या दुकानात मुबलक प्रमाणात विकली जाते. एके काळी 'रोगावरील इलाज' म्हणून वापरली जाणारी साखर आता "अन्न" म्हणून वापरली जाऊ लागली आहे."

**फ्रेंचांची आघाडी**

युरोपीय देशांच्या या सत्तास्पर्धेत फ्रेंच बरेच मागे पडले होते. डच, स्पॅनिश, पोर्तुगीजांनी आपल्या मालकीच्या प्रदेशात ठिकठिकाणी उसाची यशस्वी लागवड केली होती. त्यांच्या अनुभवाचा फायदा उशिरा का होईना पण फ्रेंचांनी घेतला. इ. स. १६४० साली जीन ऑबर्ट या फ्रेंचांच्या ताब्यात असलेल्या वेस्ट इंडीज बेटांवर उसाची लागवड करण्यास सुरुवात केली. अवघ्या पाव शतकात फ्रेंचांनी उसाच्या उत्पादनात आघाडी मारली. याबाबत कोल्बर्ट या (इ. स. १६१९ ते ८३) या चौदाव्या लुईच्या (इ. स. १६६५ ते ८३) अत्यंत पराक्रमी व हुशार प्रमुख अधिकाऱ्याने समाधानाचे उद्‌गार काढले होते. तो म्हणतो, "वेस्ट इंडिजमधील फ्रेंच कॉलनीतून भरपूर साखर फ्रान्समध्ये पाठवतात. यापूर्वी फ्रान्सला परदेशातून

साखर आयात करावी लागत होती. तोच फ्रान्स आता साखर निर्यात करू लागला आहे ही अत्यंत आनंददायी गोष्ट आहे.''

वेस्ट इंडीजमध्ये तयार झालेला ऊस अटलांटिक पार करून फ्रान्समध्ये आणणे अत्यंत गैरसोयीचे आणि अव्यवहार्य होते. फ्रान्सच्या किनाऱ्यावरील बंदरात असलेल्या साखरेच्या कारखान्यांना 'कच्चा माल' पुरवणे आवश्यक होते. या दोन्ही गोष्टींचा मेळ फ्रेंचांनी उत्तमरीतीने घातला. वेस्ट इंडीजमध्ये तयार झालेल्या उसाचा रस काढून त्यावर रासायनिक प्रक्रिया करून तो काकवीसारखा 'दाट' करीत असत. असा दाट रस फ्रान्समधील कारखान्यात पाठवीत आणि तेथे त्यापासून साखर तयार करीत.**Bordecus** बोर्डेकस या फ्रान्सच्या पश्चिम किनाऱ्यावरील बंदरी साखरेचे एकूण २६ कारखाने होते. त्याच किनारपट्टीवरील **La Rochelle** ला रोशेल, **Nantes** नेंतीज येथे तसेच दक्षिण किनाऱ्यावरील **Marseille** मार्सिल, **Toulon** तुलाँ इत्यादि ठिकाणी साखरेचे कारखाने होते. या सर्व ठिकाणच्या साखरेच्या उत्पादनामुळे फ्रान्सने त्या प्रांतात आघाडी मारली. फ्रेंच राज्यक्रांती झाली त्यावेळी संपूर्ण युरोपला लागणाऱ्या साखरेच्या पाचवा हिस्सा साखर एकट्या 'बॉर्डेकस' येथून पुरवली जाई.

अमेरिकेचा शोध लागल्यावर सतराव्या शतकात युरोप आणि अमेरिका यामध्ये व्यापार करणाऱ्या देशोदेशींच्या व्यापारी कंपन्या उदयास आल्या. लवकरच या कंपन्यांना एक प्रकारची प्रतिष्ठा प्राप्त झाली. 'परदेशी वस्तू' वापरणे ही आपल्याकडे श्रीमंती डौल दर्शविण्याची पद्धत मानली जाते. त्याप्रमाणे अमीर उमराव, खानदानी तसेच नवोदित श्रीमंतांच्या दृष्टीने या कंपन्यांचे समभाग मोठ्या प्रमाणावर खरेदी करणे हे प्रतिष्ठेचे लक्षण समजले जाऊ लागले.

अठराव्या शतकात कॉफी आणि कोको या दोन पेयांची साऱ्या जगाला ओळख झाली. सर्वसाधारणपणे ठराविक चालीरीती आणि वागण्याच्या पद्धती समाजात खोलवर रुजलेल्या असतात. अठराव्या शतकात कॉफी, कोको आणि साखर यापासून बनविलेली उत्कृष्ट चॉकलेट्स्, केकस, पेस्ट्रीज, कुकीज यासारख्या तोंडाला पाणी सुटणाऱ्या चविष्ट पदार्थांचा अंमल सुरू झाला. चहा, कॉफी, कोको यासारख्या पेयांनी समस्त मानवजातीवर अधिराज्य गाजविण्यास सुरुवात केली. या पेयांना जाती, देश, भाषा, लिंग, संस्कृती या कशाचेच कुंपण पडले नाही. अर्थातच त्यामुळे साखरेचा जागतिक स्तरावरील वापर तिपटीने वाढला.

एकोणिसावे शतक मानवजातीच्या इतिहासाच्या दृष्टीने क्रांतीकारी ठरले. या शतकात सर्वच आघाड्यांवर मानवाने झपाट्याने प्रगती केली. उसाबरोबर ''बीट'' या अन्नसंचयी भूमिगत मुळापासून माणूस साखर तयार करू लागला. साहजिकच उसाच्या साखरेचे भाव कमी झाले. वेस्ट इंडीज बेटांवरील सर्व आर्थिक डोलारा प्रामुख्याने साखरेवरच उभारलेला असल्यामुळे तो कोसळण्याची शक्यता निर्माण झाली. अटलांटिक महासागरातील फ्रेंचांच्या

मालकीच्या बंदरांबाबत नव्याने विचार करण्याची गरज भासू लागली.

**गुलामगिरी आणि साखर**

साऱ्या जगावरील साखरेचे साम्राज्य अवघे दोन शतके टिकले. पण या दोन शतकात अनेक ठिकाणी बऱ्याच अनिष्ट आणि मानवी हक्कांची पायमल्ली करणाऱ्या प्रथा राबवल्या गेल्या. त्याचा इतिहास पाहणे अगत्याचे ठरेल.

वेस्ट इंडिज, अमेरिका व इतर अनेक बेटावर उसाचे विक्रमी पीक येऊ लागले आणि जागोजागी उसापासून साखर तयार करणाऱ्या कारखान्यांचे जाळे त्या प्रदेशात पसरले. मोठमोठ्या युरोपीय जमीनदारांनी आर्थिक गुंतवणुकीच्या दृष्टीने साखरेच्या कारखान्यांसाठी व उसाच्या शेतीसाठी जमिनी खरेदी केल्या. या आर्थिक गुंतवणूकीचा भरपूर मोबदला आपल्याला मिळाला पाहिजे अशी त्या जमीनदारांची अपेक्षा असणे स्वाभाविक होते. या धंद्यात पुरेसा नफा कमवायचा असेल तर कामगारांना त्यांच्या श्रमाच्या मोबदल्यात योग्य तेवढे वेतन देणे परवडत नसे. साखर तयार करणाऱ्या उद्योजकांना ज्या अनेक समस्यांना तोंड द्यावे लागले त्यातील सर्वात मोठी समस्या कामगारांची होती. फ्रेंचांच्या कॉलनीत स्थायिक झालेले लोक प्रामुख्याने Vendee वेंदी किंवा Saintonge सेंतों येथील घट्टेकट्टे शेतकरी होते. स्पॅनिशांच्या वसाहतीत प्रामुख्याने अँड्युलेशियन शेतकरी किंवा हद्दपारीची शिक्षा झालेले अथवा चोर, दरोडेखोर अशा लोकांचा भरणा होता. मायदेश आणि कुटुंबीयांपासून दूर आलेल्या त्यातील काही स्पॅनिश व फ्रेंच तरुणांनी आपणहून उकळत्या उसाच्या रसाच्या धगीजवळ काम करावयाची तयारी दर्शविली असली तरी या कष्टाच्या कामाबद्दल भरपूर मोबदल्याची त्यांची अपेक्षा होती. नफ्याकडे लक्ष ठेवणारे मालक ती अपेक्षा पूर्ण करण्यास असमर्थ ठरत. अशा लोकांच्या टोळ्या आपणहून काम करणाऱ्या कामगारांना फितवीत आणि साखरेच्या कारखान्यात काम करण्याचा करार मोडण्यास भाग पाडीत. त्यातल्या त्यात जे स्वभावाने गरीब असत, ते साधेपणाने शेतावर आणि कारखान्यात काम करीत. परंतु वृद्धापकाळापर्यंत त्यांची मजल क्वचितच जात असे. उष्ण हवामान, साथीचे रोग, गरिबी, निकृष्ट आहार, दारूचे व्यसन या दुष्टचक्रामुळे त्यांना अकाली मृत्यू येत असे. फ्रेंच, स्पॅनिश, पोर्तुगीज, डच वसाहतीत आणि नवीन जगतात सगळीकडे हीच परिस्थिती होती. या वसाहतदारांना शेती करणे, गुरे पाळणे इत्यादी कामांसाठी मजूर मिळत नसत व्यवहारात लागणाऱ्या नित्याच्या साध्या साध्या गोष्टी त्यांना युरोपमधून प्रचंड किंमत देऊन आयात कराव्या लागत. म्हणूनच उद्वेगाने युरोपीय लोक म्हणत, "एक छोटीशी अमेरिकन वसाहत पोसण्यासाठी युरोपमधील एक संपूर्ण प्रांत विकसित करावा लागतो."

या वसाहतींमधून जर नफा कमवायचा असेल तर कामगारांच्या या समस्येवर तोडगा काढणे आवश्यक होते. त्यासाठी अमेरिकेतील मूळ रेड इंडियन्सकडून जबरदस्तीने काम

करून घेतले जाई. त्यांचा छळ केला जाई. परंतु या ॲबॉरिजिन्समुळे हा प्रश्न सुटणार नव्हता. गुलाम आणून त्यांना राबवणे हा त्या समस्येवरील एकच जालीम उपाय होता. आता जरी हा मार्ग आपल्या अंगावर शहारे आणणारा असला तरी त्याकाळी त्या परिस्थितीत आणि समाजमनाच्या विशिष्ट चौकटीत गुलामांकडून कष्टाची कामे करवून घेणे हे एकच कामगारांच्या समस्येचे उत्तर होते. आता त्या सर्व वसाहतदारांना गुलाम हवे होते आणि असे शेकडो गुलाम त्यांनी आफ्रिकेच्या किनारपट्टीवरील प्रदेशातून मिळवले.

कोकेनसारख्या अमली पदार्थांमुळे अनेक कुटुंबे उद्ध्वस्त झालेली आपण पाहातो. अनेक व्यक्तींचे जीवन या व्यसनामुळे विकृतावस्थेप्रत गेलेले आपल्याला आढळते. पण सतराव्या आणि अठराव्या शतकांतील युरोपियनांच्या साखरेच्या तीव्र अभिलाषेमुळे घडून आलेल्या अनर्थाच्या तुलनेत कोकेनमुळे घडून येणारा अनर्थ नगण्य आहे. सुरुवातीच्या काळात कोकेनच्या निर्मितीत गुलामानाच कामाला जुंपले होते. मग साखरेच्या उत्पादनाकरता गुलामाना राबविल्यास त्यात काय गैर आहे असा प्रश्न सर्वसामान्यांच्या मनात रुंजी घालीत. परंतु गुलामांकडून काम करून घेण्यापुरता हा प्रश्न मर्यादित राहिला नाही. उसाच्या शेतात काम करण्यासाठी स्वस्तात किंबहुना फुकटात मजूर मिळवण्याच्या स्वार्थी हेतूने खोटारड्या भोंदू धर्मीयांनी म्हणजेच पर्यायाने ख्रिश्चन धर्मपीठानी गुलामगिरीला उघड उघड मान्यता दिली. आणि लाचखाऊ परंतु कायदेशीर वागण्याचा आव आणणाऱ्या सरकारने राजरोसपणे गुलामगिरीला प्रोत्साहन दिले. उसापासून साखर निर्मितीच्या प्रक्रियेत असंख्य लोकांचे अपहरण करण्यात आले. अपहरण केलेल्या या व्यक्तींना जबरदस्तीने ढोरमेहनत करण्यास भाग पाडले आणि त्यापैकी कित्येकांची क्रूरपणे हत्या करण्यात आली. सध्याच्या युगातील कोकेनसारख्या मादक पदार्थांच्या व्यापारासाठी यासारख्या पशुतुल्य गोष्टी केल्या जात नाहीत.

खरोखर युरोपमधील गुलामगिरीची पाळेमुळे खूप खोलवर गेलेली आढळतात. इ. स. पूर्व ४९५ ते ४२९ या काळात अथेन्समध्ये पेरिक्लीज हा पराक्रमी राजा होऊन गेला. त्याने अथेन्समध्ये सुवर्णयुग आणले. पण त्याच्या राजवटीत दोन तृतीयांश रहिवाशी गुलाम होते हे आपणाला विसरता येणार नाही. ज्युलियस सिझरच्या (इ. स. पूर्व १०० ते ४४) काळात इटलीमधील निम्मे रहिवासी गुलाम होते ही गोष्ट नजरेआड करण्यासारखी निश्चितच नाही. रोमन साम्राज्यात गुलामांची अवस्था अत्यंत दयनीय झाली होती. रोम पाहून पर्यटकांना वाटेल, "वा ! रोम किती भव्य आणि रम्य होते !" परंतु तेथील अनियंत्रित सत्तेची स्तुती करण्याऐवजी तेथील गुलामांच्या प्रथेबद्दल सांत्वनच करावयास हवे ! रोमची भव्यता आणि मोठेपणा हा वरवरचा मुलामा असून त्याच्या मुळाशी कुंटणखाना, डुकराचे अड्डे यासारख्या वस्तीत आढळणारा गलिच्छपणाच अधिक होता ! युरोपमधील मोठमोठी साम्राज्ये जसजशी अस्तंगत झाली तसतशी गुलामगिरीची प्रथा उताराला लागली. सरंजामशाहीत तिची जागा दास्यत्वाने घेतली. इ. स. १४३२ साली पोर्तुगालच्या हेन्रीने तसेच स्पेनचा राजा पाचवा

चार्लस् याने पुन्हा एकदा गुलामगिरीची बीजे पेरली. तो इतिहास आपण पूर्वी पाहिलाच आहे.

हेन्री हॉबहाऊसने आपल्या "सीड्स ऑफ चेंज" या पुस्तकात आफ्रिकेत गुलामांची सुरुवात कशी झाली त्याबद्दल नोंदी केल्या आहेत. इ. स. १४४३ साली पोर्तुगालचा राजपुत्र हेन्रीच्या कप्तानाने कृष्णवर्णीय अरब आणि मुसलमान यांच्या समूहाला ताब्यात घेतले. त्यांच्याबद्दल हॉबहाऊस म्हणतो,

"अरब आणि निग्रो मातापित्यांची ही अपत्ये आणि त्यांच्याबरोबरचे काही मुसलमान मोठ्या अभिमानाने सांगत की आमचा जन्म अभिमानास्पद उच्च कुळांत झालेला असल्यामुळे तुम्ही आम्हाला करारांनी बद्ध करू शकत नाही. आफ्रिकेतील विशिष्ट जातीजमातीतील माणसे गुलाम म्हणून शोभतात. आपल्या स्वातंत्र्याचा बळी देऊन गुलामगिरी पत्करण्यास ती तयार असतात." तेव्हापासून आधुनिक काळातील गुलामगिरीची सुरुवात झाली. अमेरिकेच्या आधी आफ्रिका आणि दक्षिण युरोप यांच्यामध्ये गुलामांचा व्यापार सुरू झाला. भविष्यात घडून येणाऱ्या आफ्रिका आणि अमेरिकेतील गुलामांच्या व्यापाराची ती मुहूर्तमेढ होती.

याच हॉबहाऊस महाशयांनी अमेरिकेतील गुलामगिरीचे वर्णन करताना म्हटले आहे, "साखरेच्या उत्पादनासाठी योजण्यात आलेली गुलामगिरी ही अगदी वेगळ्या प्रकारची होती. व्यापारी तत्त्वावर उत्पादन करावयाच्या ऊस या एकाच पिकासाठी मोठ्या प्रमाणावर गुलामगिरी करण्याची ही पहिलीच वेळ होती. एवढेच नव्हे तर आफ्रिकेतील एका विशिष्ट जातीजमातीतील लोकांना गुलाम म्हणून वापरण्याचीसुद्धा ही पहिलीच वेळ होती."

गुलामांचा व्यापार हे एक प्रकारचे व्यसन होते. साखरेच्या उत्पादनावर अवलंबून असणाऱ्या अर्थव्यवस्थेचे उन्नयन करण्याच्या हेतूने आफ्रिकेतून नवीन जगतात गुलामांची आयात केली होती. जनमानसातील साखरेची आसक्ती इतकी प्रबळ होती की त्यापायी हजारो वर्षे चालत आलेल्या ख्रिश्चन धर्मातील तत्त्वांना तिलांजली देण्यात आली. अत्यंत विनम्र म्हणून मिरवणाऱ्या समाजातील संस्थांनी मानवी क्रौर्याचा हा आविष्कार उघड्या डोळ्यांनी पाहिला आणि अविश्वसनीय, पशुतुल्य निंद्य वर्तनाचा शांतपणे स्वीकार केला. गुलामगिरीचे संपूर्ण उच्चाटन झाल्यावर अनेक विचारवंतांनी या वर्तनाबद्दल अमेरिकनांची निर्भर्त्सना केली आहे. वर्नर सॉम्बर्ट (Werner Sombart) म्हणतो, "जगातील सर्व जातीजमातीमधील लोक आपल्यासाठी झिजले, श्रमले. त्यांच्या जिवावर आपण श्रीमंत झालो. आपण आपल्या स्वार्थाकरता पाचही खंडातील माणसांचा बळी दिला."

बर्नार्डिन-डी-सॅन पिअर यांचेही मत विचारप्रवृत्त आणि अंतर्मुख करणारे आहे ते म्हणतात, "कॉफी आणि साखर ही युरोपच्या आनंदाकरता आवश्यक आहेत की नाहीत हे मला माहीत नाही. पण मी हे निश्चितपणाने सांगू शकतो की ऊस आणि कॉफी या दोन्ही झाडांमुळे जुन्या आणि नव्या – दोन्ही जगतात दुर्भाग्य आणले आहे." खरोखर शेकडो

वर्षांतील युद्धामुळे झालेल्या अनर्थापेक्षा जास्त नुकसान मानवाच्या साखर व परदेशी वस्तूंबद्दलच्या लोभामुळे झाले आहे. या साखरेपायी इतका अश्रूपात या पृथ्वीतलावर झाला आहे की त्यामुळे साखरेची गोडीसुद्धा नष्ट झाली असावी.

**बीटपासून साखर**

बीटमध्ये खूप प्रमाणात साखर असते ही गोष्ट इ. स. १५७५ साली ऑलिव्हर दि सिरस या फ्रेंच तरुणाच्या लक्षात आली. त्याने केलेली नोंद याची साक्ष देते. तो म्हणतो, "बीट हे एक प्रकारचे मूळ असून ते इटलीमधून आपल्या देशात झाले आहे. याचा रस स्वयंपाकात वापरला तर साखरेच्या पाकासारखी चव लागते शिवाय त्या रसाला चित्ताकर्षक किरमिजी रंगसुद्धा असतो." परंतु या सिरसच्या विधानाकडे कोणी फारसे लक्षच दिले नाही. सिरस आणि त्याचा शोध दुर्लक्षित, उपेक्षित तर राहिलाच, पण युरोपसुद्धा पावणेदोन शतके बीटापासून तयार होणाऱ्या उत्तम दर्जाच्या साखरेला मुकला.

सुमारे पावणेदोन शतकानंतर इ. स. १७४५ साली जर्मन केमिस्ट अँड्रीज मार्ग्रफ **Andreas Marggraf** याने प्रायोगिक तत्त्वावर जर्मनीत होणाऱ्या अनेक वनस्पतींवर साखर मिळवण्याच्या हेतूने अनेक रासायनिक प्रयोग केले. अखेर या प्रयत्नांना यश आले. बीटापासून साखर मिळवण्यात मार्ग्रफ यशस्वी झाला. त्यानंतर इ. स. १७८६ साली मार्ग्रफचा शिष्य अचार्ड **(Achard)** याने सिलेशिया येथे बीटापासून **(Beta Vulgaris)** (बीट व्हलगॅरीस) साखर तयार करण्याचा कारखाना काढला. ही साखर पांढरी शुभ्र करण्याचे तंत्रही अचार्डला अवगत असल्यामुळे युरोपियनांना ही साखर पसंत पडली. इंग्लिश लोकांना या शोधाचा सुगावा लागला. "आपण एका स्वतंत्र बेटावर राहतो. परदेशातून साखर मिळवताना आपली कुठे नाकेबंदी झालीच तर बीटपासून साखर करण्याची पद्धत आपल्याला फारच उपयुक्त ठरेल या स्वार्थी हेतूने इंग्रजांनी या तरुण रसायनशास्त्रज्ञाला इंग्लंडला येण्याचे आमंत्रण दिले. बीटपासून साखर करण्याचा कारखाना इंग्लंडमध्ये सुरू करण्याविषयी त्याचे मन वळविले. त्याकरता त्याला भरघोस मानधन देण्याचे आश्वासन दिले. परंतु या मानी तरुणाने स्पष्ट नकार दिला. वित्तेषणा आणि लोकेषणा या आमिषांना तो भुलला नाही.

लीविग **Liebig** हा एक सुप्रसिद्ध फ्रेंच रसायनतज्ज्ञ. वेस्ट इंडिजमधील फ्रेंच वसाहतदार उसापासून साखर तयार करून फ्रान्सला पाठवीत होते. फ्रान्सने जर बीटपासून साखर तयार करण्यास सुरुवात केली तर वेस्ट इंडिजमधील फ्रेंच कॉलनीची अर्थव्यवस्था संपूर्णपणे कोलमडेल अशी त्याला भीती वाटत असावी. "बीटपासून साखर तयार करणे हे मूर्खपणाचे नसले तरी अविवेकीपणाचे ठरेल" असे मत लीबीगने व्यक्त केले आणि आपला निषेध नोंदवला.

एकोणिसाव्या शतकाच्या प्रारंभी नेपोलियनच्या काळात अमेरिका व युरोप यामधील वाहतूक खंडित झाल्यामुळे फ्रान्समध्ये साखरेचा पुरवठा होईना. अवघ्या तीन शतकापूर्वी साखर फक्त औषधात वापरीत असले तरी आता युरोपियनांचे साखरेशिवाय पान हलेनासे झाले. नाक दाबले की तोंड उघडते. त्याप्रमाणे कोंडीत सापडल्यामुळे साखरेच्या बाबतीत स्वावलंबी होण्यासाठी ठोस पावले उचलणे फ्रेंचांना आवश्यक झाले. नेपोलियनने बत्तीस हजार हेक्टर जमिनीत बीटची लागवड करण्याची आज्ञा दिली. इ. स. १८१३ साली पासी Passy येथे बीटपासून साखर तयार करण्याचा कारखाना काढला. उत्कृष्ट दर्जाच्या टनावारी साखरेचे उत्पादन पासी येथे होऊ लागले. इतरांनी या कृतीचे अनुकरण केले. साखरेचे अधिकाधिक उत्पादन करण्यासाठी फ्रेंच सरकारने एक आकर्षक योजना जाहीर केली. "जी व्यक्ती दहा टन साखरेचे उत्पादन करील त्या व्यक्तीला चार वर्षे कोणत्याही स्वरूपाचा कर द्यावा लागणार नाही" असे फ्रेंच सरकारने जाहीर केले. अर्थात या योजनेचा सुयोग्य परिणाम झाला. आता बीटपासून इतक्या प्रचंड प्रमाणात साखर तयार होऊ लागली की तिचे दर उसाच्या साखरेपेक्षा कमी झाले. वेस्ट इंडिजची बेटे, ब्राझील इ. देशांची अर्थव्यवस्था उसाच्या साखरेवर अवलंबून असल्यामुळे त्या देशांच्या अर्थकारणाला फार मोठा तडा गेला. इतिहासातील साखरेच्या एका मोठ्या अंकावर पडदा पडला.

**अन्य वनस्पतींपासून साखर**

बीट आणि ऊस याखेरीज अन्य झाडांपासूनसुद्धा थोड्या प्रमाणात साखर काढता येते. मेपलच्या झाडाच्या रसापासून साखर काढतात. मेपलचे झाड हे कॅनडाचे राष्ट्रीय चिन्ह आहे. मेपलच्या झाडापासून काढलेल्या पाकाशी अनेक दंतकथा निगडित आहेत. खजूर आणि अंजीर या दोन फळांत भरपूर साखर असते. इ. स. १८०८ मध्ये फर्मेंतिअे या पदार्थतज्ज्ञाने द्राक्षापासून साखर करावी अशी कल्पना मांडली. युरोपीय जनतेला पार्मेंतिअेच्या कल्पकतेबद्दल आदर होता. बटाट्याचे महत्त्व त्यानेच तर लोकांना पटवून दिले होते. हा सर्व वृत्तांत बटाट्याच्या इतिहासात जाणून घेतल्याचे वाचकांच्या स्मरणात असेल. पार्मेंतिअेच्या सूचनेचे अतिशय उत्साहाने स्वागत केले. तरीसुद्धा त्याकाळी या कल्पनेचा पाठपुरावा नेटाने केला गेला नाही. सुमारे सव्वा शतकानंतर दुसऱ्या महायुद्धाच्या काळात उसाच्या साखरेला पूरक म्हणून पुन्हा एकदा द्राक्षापासून साखर काढण्याचा प्रयत्न झाला.

**साखर एक व्यसन**

तंबाखू, अफू व इतर मादक पदार्थांचे व्यसन व्यक्तिगत आरोग्याला धोकादायक असते. व्यसनाधीन व्यक्तींच्या व्यसनमुक्तीसाठी वैद्यकीय व्यावसायिक, मनसोपचारतज्ज्ञ आणि सामाजिक कार्यकर्ते प्रयत्नांची पराकाष्ठा करतात. परंतु सर्व जगभर पसरलेल्या एका व्यसनाकडे मात्र समाजाचे संपूर्ण दुर्लक्ष झालेले आढळते. त्याबद्दल फारशी चर्चासुद्धा होत नाही. ते आहे साखरेचे व्यसन. – गोड पदार्थांचे अतिसेवन. सर्व मानवजातीला लागलेले हे

व्यसन इतके प्रभावी आहे की त्यापासून आपली सुटका करून घेणे जवळजवळ अशक्य आहे.

रासायनिक दृष्ट्या साखर म्हणजे सुक्रोज. याचा रासायनिक फॉर्म्युला आहे $C_{12}H_{22}O_{11}$. मानवी आहारातील 'साखर' हा अत्यावश्यक पदार्थ नाही. या साखरेचे उत्पादन सुरू होण्यापूर्वी हजारो वर्षे मानवी आहार साखरेशिवायसुद्धा परिपूर्ण होता. आहारशास्त्रीय दृष्ट्या इतर खाद्यपदार्थातून आपल्याला मिळणार नाही असा कोणताही अन्नघटक अथवा जीवनसत्त्व साखरेत नसते. साखरेशिवाय आपण चौरस व समतोल आहार घेऊ शकतो. साखरेचे मधुर पदार्थ खाणे ही एक प्रकारची तल्लफ आहे. ही तल्लफ भागविण्यासाठी युरोपियनांनी गुलामांचा व्यापार करणाऱ्या व्यापाऱ्यांशी संगनमत करून विद्वत्जनांनी सांगितलेली आदर्श तत्त्वे धुळीत मिळवली होती. इ. स. अठराशेच्या सुमारास इंग्लंडमध्ये आयात केलेला प्रत्येक साखरेचा कण गुलामांच्या घामातून तयार झाला होता.

सौम्य प्रमाणात हे व्यसन लागलेल्या व्यक्ती सतत गोड पदार्थ खाणेच पसंत करतात. पण गोड खाण्याचे व्यसन आटोक्याबाहेर गेलेल्या काही व्यक्तींचा समावेश 'बुलेमिया' हा मानसिक विकार जडलेल्या रुग्णांमध्ये करतात. हे मनोरुग्ण अतिगोड पदार्थ अमर्याद प्रमाणात खातात. आणि मग उलट्या करतात किंवा जुलाबाच्या गोळ्या घेऊन अतिसाराने शरीराबाहेर टाकतात. अर्थात कोणताही मार्ग अवलंबला तरी पुन्हा भरपूर गोड पदार्थ खाता यावेत हा एकमेव उद्देश त्या कृतीमागे असतो. या व्यक्तीला असे गोड पदार्थ खाल्ल्यावर तात्पुरता उत्साह वाटतो. परंतु नंतर मात्र मानसिक विषण्णता येऊन त्या व्यक्तीच्या मनात अपराधीपणाची भावना प्रबळ होते. अनेकदा साखरेचे हे व्यसन संयुक्त स्वरूपाचे असते. उदा. साखर व कॉफी, साखर आणि चहा. समाजातील बहुतेक व्यक्ती संयुक्त व्यसनाधीन झालेल्या असतात.

हानिकारक पदार्थाच्या आहारी गेलेल्या व्यक्तीनी जर त्या पदार्थाचा त्याग करायचा ठरवला तर ते कित्येकदा विनाशकारी ठरते. उदा. साखरेचे व्यसन लागलेल्या व्यक्तीमध्ये काय होते ते पाहू या. गोड पदार्थाच्या अतिसेवनामुळे शरीराला जास्तीत जास्त उष्मांक मिळतात. या उष्मांकाची शरीराला गरज नसल्यास त्या पदार्थांचे चरबीत रूपांतर होते व ती शरीरात साठवली जाते. देहाचा हा वाढता पसारा आटोक्यात ठेवण्यासाठी अशा व्यक्ती वजन कमी करण्याच्या गोळ्या घेतात. या गोळ्यांमुळे येणारी विषण्णता घालविण्यासाठी निद्रा आणि गुंगी आणणाऱ्या गोळ्या घेतात. म्हणजे साखरेच्या व्यसनातून सुटका करून घेण्याकरता अशा व्यक्तीना औषधाच्या शृंखलानी बद्ध व्हावे लागते. मद्य आणि तंबाखू या खालोखाल मानवी देहाला घातक ठरणारे हे साखरेचे व्यसन आहे. या व्यसनापासून पूर्ण मुक्ती मिळवता आली नाही तरी 'गोड खाण्यावर नियंत्रण ठेवणे' हे निश्चितच प्रयत्नसाध्य आहे.

---



अनुक्रमणिका

फ्रांझ काफ्का
(१८८३-१९२४)

जागतिक वाङ्मयात स्वतःचे घराणे निर्माण करणारा
जर्मन कथा-कादंबरीकार.

विसाव्या शतकातील
या महान साहित्यिकाचा परिचय करून देणारा
मराठीमधील पहिला ग्रंथ

# थोडाबहुत काफ्का

शकु नी. कनयाळकर

१८८३-१९१८ या कालखंडातील काफ्काचा जीवनवृत्तांत.
'द ट्रायल' या कादंबरीचा संक्षिप्त अनुवाद.

चरित्रपट, वाङ्यसूची इ. आर्टपेपरवरील ५२ छायाचित्रे
एकूण पृष्ठे २६० + ४ + १६

मूळ किंमत रु. २००
'नवी क्षितिजे' च्या वर्गणीदारांना सवलतीची किंमत रु. १२०

त्वरित संपर्क साधा

**नाना जोशी**

४ अ, सोमणनगर, क्रांतीवीर भाई बालमुकुंद मार्ग, मुंबई ४०००१२



अनुक्रमणिका

